अंक १३

ॐ

# संस्कृत-स्वयं-शिक्षक

( संस्कृत भाषेचें अध्ययन करण्याचा सोपा उपाय )

## त्रयोदशो भागः ।

Sa. 4#

SAT

लेखक

श्रीपाद दामोदर सातवळेकर,

स्वाध्याय-मण्डल, किल्ला-पारडी ( जि. सुरत )

चतुर्थ आवृत्ति.

शके १८७२, सन १९५०

# क्रियापद-विचार.

कोणत्याही भाषेचें वाक्य पूर्ण करावयाचें असल्यास त्या भाषेतील पदांचें ज्ञान चांगलें असावें लागतें. संस्कृत भाषेचें ज्ञान होण्याकरितां जी कांहीं निरनिराळ्या विचारांची माहिती असावी लागते, ती माहिती वाचकांना झालीच आहे. आतां या भागापासून पुढील सहा भागापर्यंत या संस्कृतमधील क्रियापदांची माहिती करून द्यावयाची आहे. या भागांत गणाच्या धातूंचीं रूपें कशीं बनतात, तें सांगितलें जाईल. प्रथम गणाचे नेहमीं लागणारे सर्व धातु या भागांत दिले असून त्या धातूंपासून क्रियापद, नाम व विशेषण यांचीं निरनिराळीं रूपें कशीं बनवितां येतात, त्याची अगदीं सोपी रीतही सांगितली आहे. म्हणून प्रथम गणाच्या धातूंचीं रूपें कशीं बनवावीं, त्यांचा अभ्यास वाचकांना या पुस्तकावरून सहज करतां येईल.

वाचक जर या धातुविचाराच्या सहा पुस्तकांचा अभ्यास नीट लक्षपूर्वक करतील, तर त्यांना क्रियापदाचें आवश्यक ज्ञान चांगलें होऊं शकेल. किंबहुना जे संस्कृतमधील धातु या रूपांची चांगली माहिती करून घेतील, त्यांना संस्कृत भाषा फारच थोड्या श्रमानें व सुलभतेनें समजूं लागेल, यांत शंका नाहीं. कारण संस्कृत भाषा ही यौगिक अर्थात् धातूंपासून बनलेली भाषा असल्यामुळें, ज्याला धातूंची चांगली माहिती झालेली असते त्याला या भाषेत चांगलेंच प्राविण्य संपादन करतां येतें म्हणून वाचकांनी या धातुविचाराच्या प्रकरणाचा उत्तम अभ्यास करावा

"लेखक"

---

मुद्रक आणि प्रकाशक
वसंत श्रीपाद सातवळेकर B. A
भारत मुद्रणालय, स्वाध्याय-मंडळ,
'आनंदाश्रम' किल्ला-पारडी. (जि. सूरत)

ॐ

# संस्कृत–स्वयं–शिक्षक.

## त्रयोदशो भागः ।

## पाठ १

### प्रथम गणाचे धातु.

संस्कृत भाषेंत मूळ धातु हजारों आहेत. या धातूंपासून अनेक क्रियापदें आणि धातुसाधितें व निरनिराळीं नामें बनवितां येतात. हा धातुविचार अत्यंत मनोरंजक असून, त्याचा निरुक्तशास्त्राशीं फारच निकट संबंध आहे. या धातु-विचाराच्या प्रकरणाचें अध्ययन चांगलें झालें, तर संस्कृत भाषेचें ज्ञान चांगलें होईल; इतकेंच नव्हे, तर गीर्वाण भाषेचे जे शब्द इतर निरनिराळ्या भाषांत गेलेले आहेत, त्यांचाही बोध होऊं शकेल.

आद्य ऋषिमुनींनी हा धातुपाठाचा संग्रह करून ठेवला आहे. हा मानवजाती-वर त्यांचा मोठाच उपकार झाला आहे. नाहीतर भाषेच्या विस्ताराचा पत्ता कोणा-लाही लागणें शक्य नव्हतें.

संस्कृतमधील हजारों धातूंचीं रूपें निरनिराळ्या प्रकारांनीं बनत असतात. प्रत्येक प्रकारच्या धातूंचा एक एक गण बनविलेला आहे. अशा तऱ्हेनें एकंदर धातूंचे दहा गण केले आहेत. या दहाही गणांची ओळख वाचकांना पुढील भागां-सून करून दिली जाईल. या भागांत फक्त प्रथम गणाच्याच ( पहिल्या गणा-च्याच ) धातूंचा विचार केला आहे; कारण या गणाचे धातु पुष्कळ असून, त्यांचीं रूपें बनविण्याची रीतही सोपी आहे.

## धातुरूपांचे मुख्य भेद.

धातूंच्या रूपांचे मुख्य भेद दोन आहेत – "१ परस्मैपद आणि २ आत्मनेपद" प्रत्येक गणाच्या धातूंपैकीं काही धातूंचीं रूपें परस्मैपदाप्रमाणे होतात, तर कांहींचीं फक्त आत्मनेपदाप्रमाणेंच होतात. या शिवाय धातूंचा आणखी एक वर्ग आहे, त्याला "उभयपदी" असें म्हणतात या वर्गांतील धातूंचीं रूपें प्रथम सांगितलेल्या दोन्ही रीतींप्रमाणें होतात म्हणजे त्यांचीं रूपें परस्मैपदाप्रमाणें व आत्मनेपदाप्रमाणे दोन्ही रीतींनी होत असतात

या पुस्तकांत पहिल्यानें प्रथम गणाचे "परस्मैपदी" धातु दिले जातील नंतर "आत्मनेपदी" दिले जातील व त्यानंतर "उभयपदी" धातु देण्यात येतील अशा तऱ्हेनें धातुविचाराच्या प्रकरणामध्यें वाचकाचा सहज प्रवेश होईल

## काळ-विचार.

क्रियापदाचा विचार करीत असतांना काळाचा विचारही करावा लागतो काळ चा क्रियापदाशीं फारच महत्वाचा संबंध आहे क्रियापदांच्या कित्येक रूपां वरून "भूतकाळ" चा बोध होतो, कित्येकांवरून "वर्तमानकाळ" चा बोध होतो व कित्येक रूपें "भविष्यकाळ" दर्शवितात जसें—

१ भूतकाळ = अभवत् = झाला
२ वर्तमानकाळ = भवति = आहे
३ भविष्यकाळ = भविष्यति = होईल



# पाठ २

क्रियापदाच्या काळांच्या रूपांशिवाय आज्ञा, संदेह, संकेत इत्यादि मनोभाव दाखविणारी रूपेंही निरनिराळी होत असतात. मराठीमध्येंसुद्धा अशा तऱ्हेची निरनिराळी रूपें होत असतात. तो करतो, त्याने केलें, तो करील, त्याने करावें, त्याने केलें पाहिजे, इत्यादि प्रकारचीं अनेक रूपें प्रत्येक भाषेंतून होतच असतात. त्याचप्रमाणे संस्कृतमध्येंही अशीं रूपें होत असतात. या रूपांचे एकंदर दहा वर्ग केले आहेत, या दहा वर्गांना "दहा लकार" म्हणतात. संस्कृत व्याकरणाचे प्रसिद्ध आचार्य पाणिनी मुनि यांनी या दहा लकारांचीं नावें पुढीलप्रमाणे दिलीं आहेत–

१ लट्, २ लिट्, ३ लुट्, ४ लृट्, ५ लेट्, ६ लोट्, ७ लङ्, ८ लिङ्, ९ लुङ्, १० लृङ्, । यांपैकी पांचव्या लेट्चीं रूपें फक्त वेदामध्येंच येत असतात, इतर संस्कृत ग्रंथांतून त्यांचा प्रयोग आढळत नाहीं.

या दहा लकाराच्या रूपांचा उपयोग पुढीलप्रमाणे होतो–

१ लट् ( वर्तमान काळ ) = या वर्गाच्या रूपांनी वर्तमानकाळच्या क्रियेचा बोध होतो. जसें "भवति" = होतो.

२ लिट् (भूतकाळ ) = अनद्यतन परोक्ष भूतकाळ = अर्थात् जी क्रिया आज झाली नाहीं व बोलणाऱ्याच्या समोरही झाली नाहीं, त्या क्रियेचा अर्थ या वर्गाच्या रूपांवरून होत असतो. जसें "बभूव" = झाला.

३ लुट् = ( भविष्यकाळ ) = अनद्यतन भविष्यकाळ = अर्थात् ज्या रूपांवरून आजच्या भविष्यकाळाचा बोध होत नाहीं, तीं रूपें या वर्गाचीं होत. जसें "भविता" = पार पुढे होणार.

४ लृट् = ( भविष्यकाळ ) = या वर्गाच्या रूपांवरून सामान्य भविष्यकाळाच्या रूपाची क्रिया दाखविली जाते. जसें– "भविष्यति"=होईल.

५ लेट् = ( या वर्गाच्या रूपाचा प्रयोग वेदामध्येंच होत असतो. इतर संस्कृत ग्रंथांतून याचीं रूपें आढळत नाहींत. "लिङ्" वर्गाच्या रूपाचा जो अर्थ दर्शविण्याकरितां उपयोग केला जातो, तोच अर्थ या वर्गाच्या रूपांनीं वेदामध्यें दाखविला जातो. )

वरील धातूंमध्यें ( १ ) मूळ प्रथम धातु, ( २ ) नंतर त्याचा अर्थ, ( ३ ) त्यानंतर त्याचें वर्तमानकाळचें ( लट्‌चें ) रूप व त्यानंतर ( ४ ) त्याचें भविष्य काळचें ( लृट्‌चें ) रूप या क्रमानें धातु, अर्थ व रूपें दिलीं आहेत. यावरून वाचकांना या धातूंचीं रूपें सहज बनवितां येतील. आतां यांचा वाक्यांमध्यें उपयोग करा—

## संस्कृत–वाक्यानि ।

१ मनुष्यः नगरे अटति । २ अश्वौ ग्रामात् बहिः यत्र कुत्र अपि अटतः । ३ मार्जाराः तव गृहे अटन्ति । ४ कः तत्र भ्रमति ? ५ त्वं देवं कदा अर्चिष्यसि ? ६ सः तं अवति । ७ वीरः जनपदं अवति । ८ रामभद्रः नगरं न गमिष्यति । ९ यथा देवदत्तः आत्मानं अवति, तथा भूमित्रः न अवति । १० कथं स वृक्षः एजति ? वायुना स वृक्षः एवम् एजति । ११ स पूजां अर्हति ।

## मराठी वाक्यें.

१ मनुष्य नगरांत भटकतो. २ ( दोन ) घोडे गावाच्या बाहेर कोठें तरी भटकतात. ३ मांजरें तुझ्या घरांत फिरतात. ४ कोण तेथें नेहमीं जातो ? ५ तूं देवाची केव्हां पूजा करशील ? ६ तो त्याचें रक्षण करतो. ७ वीर देशाचें रक्षण करतो. ८ रामभद्र नगराला जाणार नाहीं ९ ज्याप्रमाणें देवदत्त आपलें रक्षण करतो, त्याप्रमाणें भूमित्र आपलें रक्षण करीत नाहीं. १० तें झाड कसें हालतें ? वाऱ्यानें तें झाड असें हालतें. ११ तो पूजेला योग्य आहे.

वाचकांनी अशा तऱ्हेनें धातूंच्या रूपांचा वाक्यांत उपयोग करावा.



# पाठ ४

## प्रथम गणाच्या परस्मैपदाचीं रूपें.

कृष् ( नांगरणें )

वर्तमान काळ ( लट् )

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| १ प्र० पु० | कर्षति | कर्षतः | कर्षन्ति |
| २ म० पु० | कर्षसि | कर्षथः | कर्षथ |
| ३ उ० पु० | कर्षामि | कर्षावः | कर्षामः |

भविष्यकाळ ( लृट् )

| | | | |
|---|---|---|---|
| १ प्र० पु० | कर्क्ष्यति | कर्क्ष्यतः | कर्क्ष्यन्ति |
| २ म० पु० | कर्क्ष्यसि | कर्क्ष्यथः | कर्क्ष्यथ |
| ३ उ० पु० | कर्क्ष्यामि | कर्क्ष्यावः | कर्क्ष्यामः |

## संस्कृत–वाक्यानि ।

१ कृषकः हलेन भूमिं कर्षति । २ कृषीवलौ भूमिं कर्षतः । ३ कृषीवलाः भूमिं कर्षन्ति । ४ त्वं कदा भूमिं कर्क्ष्यसि ? ५ यदा त्वं भूमिं कर्क्ष्यसि, तदा अहं न कर्क्ष्यामि । ६ श्वः वयं सर्वे भूमिं कर्क्ष्यामः ।

## मराठी वाक्यें.

१ शेतकरी नांगराने जमीन नांगरतो. २ ( दोन ) शेतकरी जमीन नांगरतात. ३ ( सर्व ) शेतकरी जमीन नांगरतात. ४ तू आपली जमीन केव्हां नांगरशील ? ५ जेव्हां तू आपली जमीन नांगरशील, तेव्हां मी नांगरणार नाहीं. ६ उद्यां आपण सर्वजण जमीन नांगरूं.

## प्रथमगण परस्मैपदी धातु

आतां पुढील धातु पाठ करा–

कठ् = ( दुःखात राहणें ) कठति, कठिष्यति
कण् = ( दुःखानें रडणें ) कणति, कणिष्यति
कर्द् = ( वाईट शब्द बोलणें ) कर्दति, कर्दिष्यति
कित् = ( रोगा निवारणें, रोग दूर करणें ) चिकित्सति,
चिकित्सिष्यति
कित् = ( इच्छा करणें ) केतति, केतिष्यति
कुच् = ( संकोच करणें ) कुचति, कुचिष्यति
कुञ्च् = ( संकुचित होणें, लहान होणें ) कुंचति, कुंचिष्यति
कुंठ् = ( पंगू बनणें ) कुंठति, कुंठिष्यति
कुंथ् = ( दुःख सहन करणें ) कुंथति, कुंथिष्यति
कूज् = ( अस्पष्ट शब्द करणें ) कूजति, कूजिष्यति
कूल् = ( झाकणें ) कूलति, कूलिष्यति
कृष् = ( नांगरणें ) कर्षति, कर्क्ष्यति
क्रंद् = ( रडणें, पुकारणें ) क्रंदति, क्रंदिष्यति
क्रम् = ( चालणें ) क्रामति, क्रमिष्यति
क्रीड् = ( खेळणें ) क्रीडति, क्रीडिष्यति
क्रुश् = ( रडणें, ओरडणें ) क्रोशति, क्रोक्ष्यति
क्वथ् = ( शिजविणें ) क्वथति, क्वथिष्यति
क्षर् = ( स्रवणें ) क्षरति, क्षरिष्यति
क्षि = ( नाश पावणें ) क्षयति, क्षयिष्यति।

याचीं रूपें पूर्वी सांगितल्याप्रमाणें करा.

---

# पाठ ५

## संस्कृत–वाक्यानि ।

१ स पुरुषः तत्र किमर्थं रुणति ? २ वैद्यः तस्य रोगं चिकित्सति, अत स तत्र रुणति । ३ तत्र वैद्यौ क रोगं चिकित्सतः ? ४ तत्र तस्य ज्वरं वैद्यौ चिकित्सतः । मम पुत्रः ज्वरेण पीडितः, अतः वैद्यौ मं इदानीं चिकित्सतः । ५ यथा स तत्र कूजति, तथा एव त्वं अत्र कूजसि । ६ यथा स बालकः रुदति, तथैव त्वं अपि रुदसि । ७ त्वं किं तेन सह इदानीं न क्रीडसि ? ८ सर्वे बालका तत्र इदानीं क्रीडन्ति । ९ यूयं सर्वे छात्रा कदा क्रीडिष्यथ ? १० तव धर्मपत्नी इदानीं किमर्थं क्वथति ?

## मराठी वाक्यें.

१ तो पुरुष त्या ठिकाणीं कशाकरिता रडतो ? २ वैद्य त्याच्या रोगाची परीक्षा करीत आहे, म्हणून तो रडत आहे. ३ तेथें ( दोन ) वैद्य कोणत्या रोगाची चिकित्सा करतात ? ४ तेथें त्याच्या ज्वराची दोन वैद्य चिकित्सा करतात. माझा मुलगा ताप न आजारी आहे, म्हणून दोन वैद्य त्याची आता तपासणी करतात. ५ ज्याप्रमाणे तो तेथे शब्द करतो, त्याचप्रमाणे तू येथे शब्द करतोस ६ ज्या प्रमाणे तो बालक रडतो, त्याप्रमाणेच तूंही रडतोस ७ तूं का त्याच्या बरोबर आता खेळत नाहीस ? ८ सर्व मुलें तेथे आता खेळतात ९ तुम्ही सर्व शिष्य केव्हां खेळाल ? १० तुझी धर्मपत्नी कोणाकरिता शिजविते ?

अशा तऱ्हेने वाचकाला वाक्यें तयार करता येतील, आता पुढें उपसर्गांची थोडीशी माहिती दिली आहे, ती पहा—

## उपसर्ग.

धातु अर्थात् क्रियापद याच्या पूर्वी येऊन क्रियेचा अर्थ जे बदलतात, ते उपसर्ग होत हे उपसर्ग एकंदर बावीस आहेत. ते हे—

प्र, परा, अप, सम्, अनु, अव, निस्, निर्, दुस्, दुर्, वि, आ, नि, अधि, अपि, अति, सु, उत्, अभि, प्रति, परि व उप. या उपसर्गांचा अर्थ पुढीलप्रमाणें आहे—

१ प्र = अधिकता, उत्कर्ष; २ परा = उलट; ३ अप = दूरपणा-वियोग; ४ सम् = एक होणें; ५ अनु = अनुकूल, अनुसार; ६ अव = खाली; ७ निस् = हीनता; ८ निर् = हीनता; ९ दुस् = दुष्टता; १० दुर् = दुर्गति; ११ वि = विशेष, विरोध, भिन्नता; १२ आ = अली कडे, १३ नि = खाली करणें, १४ अधि = वर, १५ अपि = पुढें १६ अति = अतिशय; १७ सु = उत्तम; १८ उद् = उंच वर; १९ अभि = सम्मुख; २० प्रति = लौटणें, उलटें होणें; २१ परि = सर्वत्र २२ उप = जवळ, अधिक.

या उपसर्गांचे अर्थ याहूनही पुष्कळ होत असतात; परन्तु येथें दिलेले अर्थ जरी वाचकांच्या लक्ष्यात राहतील, तरीसुद्धा त्यांचें कार्य चालू शकेल. आतां धातूंना हे उपसर्ग लागले असता त्यांचा अर्थ कसा बदलतो, तें पहा—

भू = असणें ( भूत = झालेला ) याचीं रूपें पहा—

प्रभू = वाढणें ( प्रभव–जन्म, प्रभाव = शक्ति; प्रभु = मालक )

पराभू = पराभव करणें. ( पराभव = अपजय )

अपभू = दूर राहणें ( अपभूति = पराजय, नाश )

संभू = एक होणें, जन्म घेणें. ( संभव=उत्पत्ति; संभूति =ऐक्य, उत्पत्ति )

अनुभू = अनुभव करणें ( अनुभव = अनुभव )

विभू = वैभवयुक्त होणें ( विभव = धन, ऐश्वर्य )

आभू = उपस्थित होणें; ( आभूति = शक्ति, व्यापकता )

अतिभू = सर्वांपेक्षा अधिक वाढणें ( = अतिभवनं सर्वांपेक्षा मोठें होणें )

उद्भू = उत्पन्न होणें ( उद्भव = उत्पत्ति )

अभिभू = पराभव करणें ( अभिभव = पराभव )

परिभू = पराभव करणें ( परिभव = पराभव, अपमान )

बाकीचे उपसर्ग भू धातूच्या पाठीमागे बहुधा लागत नाहींत. इतर निर्, - त्या धातूंना ते लागून त्यांची रूपें कशीं बनतात, तें वाचकांना पुढें कळून येईलच. या ठिकाणीं वरील निरनिराळे उपसर्ग एकाच धातूला लागले असतां त्या धातूचे अर्थ कसे निरनिराळे होतात, तें वाचकांना सहज समजून येईल. आतां या उपसर्ग-पूर्वक क्रियापदाचा वाक्यांत कसा उपयोग केला जातो, तें पहा—

१ सः पुरुषः विचिकित्सति = तो पुरुष विशेष शंका घेतो.
( कित्–चिकित्सति । वि कित् – विचिकित्सति )

२ ते सर्वे तत्र संक्रीडन्ति । = ते सर्व तेथे उत्तम खेळतात.
३ बालकाः तत्र संक्रन्दन्ति । = मुलें तेथें रडतात.
४ त्वं किमर्थं एवं आक्रोशसि ? = तूं कां असा आक्रोश करतोस ?
५ नारदः नारायणं अभ्यर्चति । = नारद नारायणाची पूजा करतो.

अशा तऱ्हेने धातूंच्या पूर्वी उपसर्ग लागून रूपें बनत असतात, ते त्या धातूंचा निरनिराळा अर्थ दर्शवूं शकतात. याप्रमाणे एका लहानशा धातूचेच अनन्त शब्द संस्कृतमध्यें बनत असतात. वाचक धातूंच्या व उपसर्गांच्या संबंध्याचा याप्रमाणे जर विचार करतील, तर या रूपांची प्रक्रिया त्यांना फारच लौकर समजूं लागेल; कारण उपसर्ग असलेले शब्द मराठीमध्येंसुद्धा आहेत, म्हणून त्यांच्या अर्थांची कल्पना करण्यास फारसे श्रम पडणार नाहींत.

# पाठ ६

## भूतकाल ( लङ् )

ज्या भूतकालाच्या योगाने आजचा समय दाखविला जात नाहीं, त्या ( अन० द्यतन ) भूतकालाकरितां " लङ् " नावाच्या भूतकालाचीं रूपें धातूपुढें प्रयुक्त होत असतात. ' भू ' धातूचीं या भूतकालाचीं रूपें पुढीलप्रमाणे होतात—

### अनद्यतनभूते लङ् ।

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | अभवत् | अभवताम् | अभवन् । |
| म० | अभवः | अभवतम् | अभवत । |
| उ० | अभवम् | अभवाव | अभवाम । |

१. तत्र ह्यः किं अभवत् ? = तेथे काल काय झालें ?

२. तत्र ह्यः किमपि न अभवत् = तेथे काल काहींही झालें नाहीं.

३. ते सर्वे वीराः शत्रून् पराभवन् = त्या वीरांनी शत्रूंचा पराभव केला.

४. यदा स उदभवत् तदा त्वं कुत्र अभवः = जेव्हां तो उत्पन्न झाला, तेव्हां तू कोठे होतास ?

मागील धड्यांत सांगितलेले उपसर्ग भूतकालाच्या रूपांच्या पाठीमागेंच लागत असतात या गोष्टीकडे वाचकांनी लक्ष्य द्यावें; उदाहरणार्थ पहा—

पर + अभवत् = पराभवत् ( पराभव केला )

वि + अभवत् = व्यभवत् ( वैभवयुक्त झाला. )

सं + अभवत् = समभवत् ( उत्पन्न झाला. )

या ठिकाणीं उपसर्ग व क्रियापदाचें रूप यांचा जो संधि केलेला दिसत आहे, तशा तऱ्हेचे संधि संस्कृत भाषेंत नेहमी केले असतात. परन्तु वेदांमध्ये हे उपसर्ग बहुधा निराळेच लिहिले आहेत. आतां खालीं धातु दिले आहेत, त्यांचा वाचकांनी चांगला अभ्यास करावा. तिसरें रूप म. धड्यांत सांगितलेल्या भूतकालाचें आहे.

## प्रथम गण, परस्मैपदी धातु

खाद् = ( भक्षण करणें ) – खादति, खादिष्यति, अखादत्
गद् = ( बोलणें ) – गदति, गदिष्यति, अगदत्
गम् = ( जाणें ) – गच्छति, गमिष्यति, अगच्छत्
गर्ज् = ( गर्जना करणें ) – गर्जति, गर्जिष्यति, अगर्जत्
गर्व् = ( गर्व करणें ) – गर्वति, गर्विष्यति, अगर्वत्
गल् = ( गिळणें ) – गलति, गलिष्यति, अगलत्
गुप् = ( रक्षण करणें ) – गोपायति, गोपायिष्यति, अगोपायत्
गै = ( गाणें, सांगणें ) – गायति, गास्यति, अगायत्
ग्रंथ् = ( ग्रंथन करणें, संदर्भ जोडणें ) – ग्रथति, ग्रंथिष्यति, अग्रंथत्
घुष् = ( प्रसिद्ध करणें ) – घोषति, घोषिष्यति, अघोषत्
घृष् = ( घर्षण करणें ) – घर्षति, घर्षिष्यति, अघर्षत्
चर् = ( चालणें ) – चरति, चरिष्यति, अचरत्
चर्च् = ( विवाद करणें ) – चर्चति, चर्चिष्यति, अचर्चत्
चर्व् = ( चावणें ) – चर्वति चर्विष्यति, अचर्वत्
चल् = ( चालणें ) – चलति, चलिष्यति, अचलत्
चित् = ( जाणणें ) – चेतति, चेतिष्यति, अचेतत्
चिंत् = ( चिंतन करणें ) चिंतति, चिंतिष्यति, अचिंतत्
चुम्ब् = ( चुंबन घेणें ) = चुंबति, चुंबिष्यति, अचुंबत्।
चूष् = ( पिणें ) = चूषति, चूषिष्यति, अचूषत्।
छद् = ( आच्छादन करणें ) – छदति छदिष्यति, अच्छदत्।
जप् = ( जप करणें ) = जपति, जपिष्यति, अजपत्।
जम् = ( खाणें ) = जमति, जमिष्यति, अजमत्।
जल्प् = ( बडबडणें ) = जल्पति, जल्पिष्यति, अजल्पत्।

## संस्कृत-वाक्यानि ।

१. [redacted] पुरुषः फलं खादति । अहं मोदकं नैव खादिष्यामि । त्वं फलानि कदा अखादः ? ते सर्वे मानवाः फलानि समखादन् ।

२. तत्र यः वदति, स एव स मनुष्यः । त्वं तेन सह किं अवदः ? सर्वे परस्परं समवदन् । यथा स वदति तथा युवां वदिष्यथः किम् ?

३. आकाशे मेघः गर्जति । यथा स गर्जिष्यति, तथा कः गर्जितुं समर्थः भवति ?

४. रामः लक्ष्मणेन सह समगच्छत् । त्वं केन सह तत्र आगच्छः ? यथा रावणः अगर्वत् तथा न रामः ।

५. त्वं इदानीं किं घोषसि ? यदा सः तत्र एतत् घोषिष्यति तदा त्वं किं करिष्यसि ? स पुरुषः तत्र तदा किं अघोषत् ।

६. [redacted] कुत्र चलसि ? स किं न संचलति ? त्वं तं किमर्थं अनुसरसि ? यदा स अचलत् तदा त्वं किं अचलः ?

७. त्वं इदानीं किं चिंतसि ? स तदा किं चिंतिष्यति ? अहं किं अचिंतम् । ते बालकाः किमपि न अचिंतन् ।

८. त्वं किं जपसि ? त्वं तं मन्त्रं कदा जपिष्यसि ? यदा त्वं अजपः तदा तेन किं कृतम् ?

९. अहं इदानीं जमामि । स नैव इदानीं जमिष्यति । त्वं कदा अजमः ? तौ तत्र श्वः जमिष्यतः । ते सर्वे सदैव जमिष्यन्ति ।

## मराठी वाक्यें.

१. तो पुरुष फळ खातो, मी लाडू नाहीं खाणार; तूं फळ केव्हां खाल्लेंस ? त्या सर्व माणसांनी फळें खाल्लीं.

२. तेथे जो बोलतो, तोच तो मनुष्य. तूं त्याच्याबरोबर काय बोललास ? सर्व आपआपसांत बोलले. जसें तो बोलतो, तसें तुम्ही ( दोघे ) बोलाल काय ?

३. आकाशांत मेघ गडगडतो. ज्याप्रमाणे तो गडगडेल, त्याप्रमाणे गर्जना करण्यास कोण समर्थ आहे ?

४. राम लक्ष्मणाबरोबर गेला. तूं कोणाबरोबर तेथें गेलास ? ज्याप्रमाणे लक्ष्मणानें गर्व केला, त्याप्रमाणे रामानें नाहीं ( गर्व केला ).

५. तूं आतां कशाची घोषणा करतोस ? जेव्हां तो तेथें याची घोषणा करील, तेव्हां तूं काय करशील ? तो पुरुष तेथें तेव्हां कशाची घोषणा करील ?

६. तूं कोठे चालतोस ? तो कां नाहीं चालला ? तूं त्याच्या कां पाठीमागे चालतोस ? जेव्हां तो चालला, तेव्हां तूं का नाहीं चाललास ?

७. तूं आतां काय विचार करतोस ? तो तेव्हां काय विचार करील ? मी काय विचार केला ? त्या बालकांनी कांहींही विचार केला नाहीं.

८. तूं काय जप करतोस ? तूं त्या मंत्राचा जप करशील ? जेव्हां तूं जप केलास, तेव्हां त्यानें काय केलें ?

९. मी आतां खातों. तो नाहींच आतां खाणार. तूं केव्हां खातोस ? ते (दोघे) तेथें उद्यां भोजन करतील. ते सर्व तेथेंच भोजन करतील.

## सूचना

याचप्रमाणे संस्कृत वाक्यांचीं मराठी वाक्यें व मराठी वाक्यांचीं संस्कृत वाक्यें बनवून, आपला अभ्यास वाढवावा.

---×---

## पाठ ७

### प्रथम गण, परस्मैपदी धातु.

जि = ( जिंकणें ) जयति, जेष्यति, अजयत् ।
जॄ = ( जीर्ण होणें ) जरति, जरिष्यति, अजरत् ।
ज्वर् = ( ज्वर येणें ) ज्वरति, ज्वरिष्यति, अज्वरत् ।
ज्वल् = ( जळणें ) ज्वलति, ज्वलिष्यति, अज्वलत् ।
तक्ष् = (लहान करणें, तासणें ) तक्षति, तक्षिष्यति, अतक्षत् ।
तप् = ( तप करणें ) तपति, तपिष्यति, अतपत् ।
तर्ज् = ( निंदा करणें ) तर्जति, तर्जिष्यति, अतर्जत् ।
तुड् = ( तोडणें ) तुडति, तुडिष्यति, अतुडत् ।
तॄ = ( तरणें ) तरति, तरिष्यति, अतरत् ।
तेज् = ( पालन करणें ) तेजति, तेजिष्यति, अतेजत् ।
त्यज् = ( त्याग करणें ) त्यजति, त्यजिष्यति, अत्यजत् ।
दल् = ( शोकणें ) दलति, दलिष्यति, अदलत् ।
दंश् = ( दंश करणें ) दंशति, दंशिष्यति, अदंशत् ।
दंस् = ( तोडणें ) दंसति, दंसिष्यति, अदंसत् ।
दह् = ( दहन करणें ) दहति, दहिष्यति, अदहत् ।
दा = ( देणें ) यच्छति, दास्यति, अयच्छत् ।
दृश् = ( पाहणें ) पश्यति, द्रक्ष्यति, अपश्यत् ।
दृंह् = ( वाढणें ) दृंहति, दृंहिष्यति, अदृंहत् ।
दृ = ( भिणें ) दरति, दरिष्यति, अदरत् ।
द्रु = ( जाणें ) द्रवति, द्रोष्यति, अद्रवत् ।
ध्मा = ( फुंकणें ) धमति, ध्मास्यति, अधमत् ।
ध्यै = ( विचार करणें ) ध्यायति, ध्यास्यति, अध्यायत् ।
ध्वन् = ( शब्द करणें ) ध्वनति, ध्वनिष्यति, अध्वनत् ।

३. आकाशांत ढग गडगडतो. ज्याप्रमाणे तो गडगडेल, त्याप्रमाणे गर्जना करण्यास कोण समर्थ आहे ?

४. राम लक्ष्मणाबरोबर गेला. तूं कोणाबरोबर तेथे गेलास ? ज्याप्रमाणे रावणाने गर्व केला, त्याप्रमाणे रामाने नाहीं ( गर्व केला ).

५. तूं आता कशाची घोषणा करतोस ? जेव्हा तो तेथें याची घोषणा करील, तेव्हा तूं काय करशील ? तो पुरुष तेथें तेव्हा कशाची घोषणा करील ?

६. तूं कोठे चालतोस ? तो कां नाहीं चालत ? तूं त्याच्या कां पाठीमागे चालतोस ? जेव्हा तो चालला, तेव्हा तूं का नाहीं चाललास ?

७. तूं आता काय विचार करतोस ? तो तेव्हा काय विचार करील ? मी काय विचार केला ? त्या बालकानी काहींही विचार केला नाहीं.

८. तूं काय जप करतोस ? तूं त्या मंत्राचा जप करशील ? जेव्हा तूं जप केलास, तेव्हा त्याने काय केले ?

९. मी आता खातों. तो नाहींच आता खाणार. तूं केव्हा खाशील ? ते (दोघे) तेथे सदा भोजन करतील. ते सर्व तेथेच भोजन करतील.

## सूचना

वाचकांनी याप्रमाणे संस्कृत वाक्यांचीं मराठी वाक्यें व मराठी वाक्यांचीं संस्कृत वाक्यें बनवून, आपला अभ्यास वाढवावा.



# पाठ ७

## प्रथम गण, परस्मैपदी धातु.

जि = ( जिंकणें ) जयति, जेष्यति, अजयत्।
जॄ = ( जीर्ण होणें ) जरति, जरिष्यति, अजरत्।
ज्वर् = ( ज्वर येणें ) ज्वरति, ज्वरिष्यति, अज्वरत्।
ज्वल् = ( जळणें ) ज्वलति, ज्वलिष्यति, अज्वलत्।
तक्ष् = ( लहान करणें, तासणें ) तक्षति, तक्षिष्यति, अतक्षत्।
तप् = ( तप करणें ) तपति, तपिष्यति, अतपत्।
तर्ज् = ( निंदा करणें ) तर्जति, तर्जिष्यति, अतर्जत्।
तुड् = ( तोडणें ) तुडति, तुडिष्यति, अतुडत्।
तॄ = ( तरणें ) तरति, तरिष्यति. अतरत्।
तेज् = ( पालन करणें ) तेजति, तेजिष्यति, अतेजत्।
त्यज् = ( त्याग करणें ) त्यजति, त्यजिष्यति, अत्यजत्।
दल् = ( फोडणें ) दलति, दलिष्यति, अदलत्।
दंश् = ( दंश करणें ) दंशति, दंशिष्यति, अदंशत्।
दंस् = ( तोडणें ) दंसति, दंसिष्यति, अदंसत्।
दह् = ( दहन करणें ) दहति, दहिष्यति, अदहत्।
दा = ( देणें ) यच्छति, दास्यति, अयच्छत्।
दृश् = ( पाहणें ) पश्यति, द्रक्ष्यति, अपश्यत्।
दृंह् = ( वाढवणें ) दृंहति, दृंहिष्यति, अदृंहत्।
दृ = ( भिणें ) दरति, दरिष्यति, अदरत्।
द्रु = ( जाणें ) द्रवति, द्रोष्यति, अद्रवत्।
ध्मा = ( फुंकणें ) धमति, ध्मास्यति, अधमत्।
ध्यै = ( विचार करणें ) ध्यायति, ध्यास्यति, अध्यायत्।
ध्वन् = ( शब्द करणें ) ध्वनति, ध्वनिष्यति, अध्वनत्।

## संस्कृत वाक्यानि ।

१. रामः तत्र जयति । त्वं तस्मिन् युद्धे जेष्यसि वा न ? अर्जुनः युद्धे अजयत् ? कर्णः किमर्थं न अजयत् ?

२. सर्वे प्राणिनः जरन्ति । योगी एव योगबलेन न जरति । कथं योगी न जरति, इति त्वं जानासि किम् ?

३. तत्र अग्निः ज्वलति । अग्निः इदानीं न तत्र ज्वलति । अग्निः कदा तत्र अज्वलत् ?

४. त्वष्टा काष्ठानि तक्षति । त्वं काष्ठं तक्षिष्यसि किम् ? स येन शस्त्रेण तत्काष्ठं अतक्षत् ।

५ विश्वामित्रः तस्मिन् महारण्ये तपः अतपत् । त्वं कथं तत्र तपः तपसि ? अहं अपि तस्मिन् स्थाने तपिष्यामि ।

६. अहं नदीं तरिष्यामि इदानीम् । यूयं कथं न तरिष्यथ ? सर्वेऽपि तत्रैव तरन्ति । अहं परश्वः नदीं अत्रैव अतरम् ।

७. त्वं धनं किं त्यजसि ? सः राजा ऐश्वर्यं वा कदापि नैव त्यजति । सर्वं अपि धनं अत्यजत् ।

८. सर्पः तं दशति । सर्पौ मशकान् दशतः । सर्पाः मनुष्यान् दशन्ति । मशकाः कथं त्वं दक्ष्यन्ति ?

९. अग्निः सर्वं काष्ठजातं दहति । प्रलयाग्निः सर्वं जगत् प्रलयकाले धक्ष्यति । त्वं तं अग्निना कथं अदहः ?

१०. यथा सः पश्यति, तथा एव अहं पश्यामि । राजा दुष्टं मानवं नैव इदानीं द्रक्ष्यति ।

११ पुरोहितः वेणुधमन्या अग्निं धमति । त्वं कथं अग्निं ध्मास्यसि ? सः तदा अग्निं अधमत् ।

## मराठी वाक्ये.

१. राम तेथे विजय मिळवितो. तूं त्या युद्धात जिंकशील कीं नाहीं ? अर्जुनाने युद्धांत कसा जय मिळविला ? कर्णाला कां नाहीं जय मिळाला ?

२. सर्व प्राणी वृद्ध होतात. योगीच योगाच्या बलाने जीर्ण होत नाही. कसा योगी नाही जीर्ण होत, तें तुला समजतें का ?

३. तेथे अग्नि जळतो. अग्नि आता नाही. तेथे प्रदीप्त होत अग्नि केव्हां ,तेथें प्रदीप्त झाला ?

४. सुतार लाकडें तासीत आहे. तूं लाकूड तासतोस काय ? त्याने कोणत्या शस्त्राने तें लाकूड तासलें ?

५. विश्वामित्राने ह्या मोठ्या अरण्यात तप केलें. तूं कसें तेथे तप करशील ? मीसुद्धा त्या ठिकाणी तप करीन.

६. मी नदी तरून जाईन. आता तुम्ही ( सर्व ) कसें नाहीं तरणार? सर्वही तेथेच पोहतात. मी परवा नदी येथेच तरून गेलों.

७. तूं धन का दान देतोस ? तो राष्ट्र आणि ऐश्वर्य केव्हांही नाहींच त्याग-णार. त्याने सर्व धन दान दिलें.

८. सर्प मनुष्यास दंश करतो. ( दोन ) सर्प मनुष्यांना दंश करतात. ( पुष्कळ ) साप ( पुष्कळ ) मनुष्यांना दंश करतात. ( पुष्कळ ) नाग कसे त्याला दंश करतील ?

९. अग्नि सर्व लाकडें जाळतो. प्रलयाग्नि सर्व जग प्रलयकाळाच्या वेळीं जाळील, तूं त्याला अग्नीने कसें जाळलेस ?

१०. ज्याप्रमाणे तो पाहतो, त्याप्रमाणेच मी पाहतों. राजा दुष्ट मनुष्याला नाहींच आतां पाहणार.

११. पुरोहित वेळूच्या नळीने अग्नि फुंकतो. तूं कसा अग्नि फुंकशील ? त्याने त्या वेळीं अग्नि प्रज्वालित केला.

## सूचना.

वाचकानी येथे पूर्वी दिलेल्या धातूंचीं रूपें बनवून, त्यांचीं येथे दाखविल्याप्रमाणें वाक्य तितकीं अधिक वाक्यें बनवावीं. मराठी वाक्याचीं संस्कृत वाक्यें बनवावीं, व संस्कृतचीं मराठी बनवावीं. असें केलें असतां त्यांना संस्कृत वाक्यें सहज करतां येतील.

# पाठ ८

## आज्ञार्थ अथवा विध्यर्थ

आज्ञा करणें, सत्कार करणें, प्रश्न विचारणें, प्रार्थना करणें, आशीर्वाद देणें इत्यादि अर्थ दाखवावयाचे असतांना " लोट् " ह्या रूपाचा उपयोग केला जातो. " भू " धातूची आज्ञार्थाची रूपें पुढीलप्रमाणे होतात—

### आज्ञार्थाचें रूप ( लोट् )

| | एक० | द्वि० | बहु० |
|---|---|---|---|
| १ | भवतु, भवतात् | भवताम् | भवन्तु |
| २ | भव, ,, | भवतम् | भवत |
| ३ | भवानि ,, | भवाव | भवाम |

### विध्यर्थाचें रूप ( लिङ् )

ह्या धड्याच्या आरंभीं सांगितलेलेच अर्थ दर्शवावयाचे असतांना " लिङ् " ह्या रूपांचा उपयोग केला जातो. यांची रूपें अशा तऱ्हेनें बनतात—

| | एक० | द्वि० | बहु० |
|---|---|---|---|
| १ | भवेत् | भवेताम् | भवेयुः |
| २ | भवेः | भवेतम् | भवेत |
| ३ | भवेयम् | भवेव | भवेम |

यांचीं वाक्यें.

| | | | |
|---|---|---|---|
| १ त्वं | भव | = | तूं हो. |
| २ सः | भवतु | = | तो होवो. |
| ३ अहं | भवानि | = | मी व्हावें. |
| ४ सः | भवेत् | = | तो होवो. |
| ५ त्वं | भवेः | = | तूं व्हावेंस. |
| ६ अहं | भवेयं | = | मी व्हावें. |

या प्रमाणें याचा उपयोग करावयाचा असतो. पुढें जे धातु दिले आहेत, त्यांमध्यें आज्ञार्थ व विध्यर्थाचीं रूपेंही दिलीं आहेत.

## प्रथम गण, परस्मैपदी धातु.

नट् = [ नाचणें ] = नटति, नटिष्यति, अनटत्, नटतु, नटेत् ।
नद् = [अस्पष्ट शब्द करणें] = नदति, नदिष्यति, अनदत्, नदतु, नदेत् ।
नंद् = [आनंद करणें] = नंदति, नंदिष्यति, अनंदत्, नंदतु, नंदेत् ।
नम् = [नम्र होणें] = नमति, नंस्यति, अनमत्, नमतु, नमेत् ।
नर्द् = [जोराने पुकारणें] = नर्दति, नर्दिष्यति, अनर्दत्, नर्दतु, नर्देत्
निंद् = [निंदणें] = निंदति, निंदिष्यति, अनिंदत्, निंदतु, निंदेत् ।
पठ् = [वाचणें] = पठति, पठिष्यति, अपठत्, पठतु, पठेत् ।
पत् = [पडणें] = पतति, पतिष्यति, अपतत्, पततु, पतेत् ।
पा = [ पिणें ] = पिबति, पास्यति, अपिबत्, पिबतु, पिबेत् ।
पूष् = [ वाढणें ] = पूषति, पूषिष्यति, अपूषत्, पूषतु, पूषेत् ।
फल् = [फलयुक्त होणें ] = फलति, फलिष्यति, अफलत्, फलतु, फलेत् ।
बुध् = [ जाणणें ] = बोधति, बोधिष्यति, अबोधत्, बोधतु, बोधेत् ।
बृंह् = [ वाढणें ] = बृंहति, बृंहिष्यति, अबृंहत्, बृंहतु, बृंहेत् ।
भण् = [ बोलणें ] = भणति, भणिष्यति, अभणत्, भणतु, भणेत् ।
भू = [ होणें ] = भवति भविष्यति, अभवत्, भवतु, भवेत् ।
भूष् = [ भूषित करणें ] = भूषति, भूषिष्यति, अभूषत्, भूषतु, भूषेत् ।
मंड् = [ ,, ,, ] = मंडति, मंडिष्यति, अमंडत्, मंडतु, मंडेत् ।
मंथ = [ घुसळणें ] = मंथति, मंथिष्यति, अमंथत्, मंथतु, मंथेत् ।
मार्ग् = [ हुडकणें ] = मार्गति, मार्गिष्यति, अमार्गत्, मार्गतु, मार्गेत् ।
मील् = [डोळे मिटणें] = मीलति, मीलिष्यति, अमीलत्, मीलतु मीलेत् ।
मुंड् = [ मुंडण करणें ] = मुंडति, मुंडिष्यति, अमुंडत्, मुंडतु, मुंडेत् ।
मूर्छ् = [ मूर्छित होणें ] = मूर्च्छति, मूर्च्छिष्यति, अमूर्च्छत्, मूर्च्छतु, मूर्च्छेत् ।

मूष = [ चोरी ] = मूषति, मूषिष्यति, अमूषत्, मूषतु, मूषेत् ।
रक्ष् = [ रक्षण करो ] = रक्षति रक्षिष्यति अरक्षत् रक्षतु, रक्षेत् ।
धातूंचीं रूपें येथें दाखविल्याप्रमाणें बनवा व त्यांचीं वाक्यें पुढें दिल्याप्रमाणें बनवा

## संस्कृत–वाक्यानि ।

१ नाटके नटः नटति । अहं अपि तत्र नटिष्यामि । स पुरुषः नटतु । सर्वे अपि अत्र नटन्तु । बालकाः तव आज्ञया नटन्तु । स नटेत् ।

२ अहं अनेन कर्मणा नन्दामि । अस्मिन् नगरे सर्वेऽपि मनुष्याः अत्र महोत्सवात् नन्दिष्यन्ति । सर्वे बालकाः नन्दन्तु ।

३ स मां किमर्थं निन्दति ? दुष्टाः मनुष्याः सर्वदा सर्वान् सत्पुरुषान् निन्दन्ति । किन्तु नीतिनिपुणाः यदि वा स्तुवन्तु । त्वां स कथं निन्देत् ?

४ घनश्याम तस्मिन् मार्गे पतति । को पुरुषः कुत्रापि न पतिष्यति । न जानामि अहं तत्र कथं अपतम् । स तत्र पततु ।

५ अहं अधुना जलं पास्यामि । अहं तदा दुग्धं न अपिबम् । तव पुत्रः दुग्धं पिबतु । रुग्णः पुरुषः जलं न पिबेत् ।

६ आम्रस्य वृक्षः अस्मिन् मासे फलति । तव सर्वेऽपि वृक्षाः आगामिनि मासे फलिष्यन्ति । मम वृक्षाः फलन्तु ।

७ स मां बोधिष्यति ? गुरुः मां अबोधत् । स सर्वान् बोधिष्यति । स बोधतु । कथं स मां बोधेत् ?

८ स स्वशरीरं भूषति । स नृपतिः तस्मिन् महोत्सवे सर्वं नगरं भूषिष्यति । सर्वे पुरुषाः स्वमन्दिराणि भूषन्तु ।

९ स्तेनः वने मूषति । स मम ग्रन्थं अमूषत् । किमर्थं स पुस्तकं मूषेत् । यदि स मूषितुं इच्छति, तर्हि मूषतु ।

१० राजपुरुषः नगरं रक्षति । द्वारपालाः मन्दिरं रक्षन्ति । तव भृत्यः तव उद्यानं किमर्थं न रक्षति ?

# पाठ ९

## मराठी वाक्यें.

१ नाटकांत नट नाचतो. मीसुद्धा आज नाचेन. तो पुरुष नाचो ! सर्वांनी आज नाचोत ! बालक [ पुष्कळ ] तुझ्या आज्ञेने नाचोत ! त्याने नाचावें !

२ मी या उत्सवाने आनंदित होतो. या शहरात सर्वही माणसें आज मोठ्या उत्सवाने आनंद करतील. सर्व बालक आनंद करोत.

३ तो माझी का निंदा करतो ? दुष्ट लोक नेहमी सर्व सत्पुरुषांची निंदा करतात. निंदा करोत नीतिमान् [ लोक ] अथवा स्तुति करोत. तुझी तो कशी निंदा करील ?

४ घनश्याम त्या मार्गावर पडतो. ते [ दोन ] पुरुष कोठेही नाही पडत नाही [ मला ] कळत मी तेथे कसा पडलों. तो तेथें पडो.

५ मी आजच पाणी पिईन. मी काल दूध नाही प्यालों. तुम्ही पुन दूध पिवो रोगी मनुष्याने पाणी न प्यावें.

६ आंब्याच्या वृक्षाला या महिन्यात फळें येतात. तुझ्या सर्वही वृक्षाना येत्या महिन्यात फळें येतील. माझ्या वृक्षाना फळें येवोत.

७ तो मला समजाऊन देईल. गुरूने मला समजून दिलें. तो सर्वांना समजाऊन देईल. त्याने समजाऊन द्यावें. कसें त्याला तो समजाऊन देईल ?

८ तो आपलें शरीर सजवितो. तो राजा त्या मोठ्या उत्सवाच्या वेळा सर्व शहर सुशोभित करील. सर्व लोकांनी आपली घरें सुशोभित करावीं.

९ चोर धन चोरतो. त्याने तुझं द्रव्य चोरलें. कशाकरिता त्याने पुस्तक चोरावें ? जर तो चोरूं इच्छितो, तर चोरू दे !

१० राजाचे नोकर शहराचें रक्षण करतात. द्वारपाल मंदिराचें रक्षण करतात. तुझा चाकर तुझ्या बागेचें का नाही रक्षण करीत ?

## धातुसाधित.

" तुं " प्रत्यय लागून एक धातुसाधित होत असतें. या 'तुं' चा अर्थ "करिता" असा असतो उदाहरणार्थ—

| धातुसाधित शब्द | | अर्थ | मूळ धातु | |
|---|---|---|---|---|
| १ गन्तुं | = | जाण्याकरितां ... ... ... | गम् | [जाणें] |
| २ कर्तुं | = | करण्याकरितां ... ... ... | कृ | [करणें] |
| ३ वक्तुं | = | बोलण्याकरितां ... ... ... | वच् | [बोलणें] |
| ४ पातुं | = | पिण्याकरितां ... ... ... | पा | [पिणें] |
| ५ खादितुं | = | खाण्याकरितां ... ... ... | खाद् | [खाणें] |

अशाच तऱ्हेने निरनिराळ्या धातूंची साधित रूपें बनत असतात. या धातुसाधिताच्या रूपांच्या योगाने पुष्कळच वाक्यें आपल्याला बनवितां येतील—

## संस्कृत–वाक्यानि ।

यदि त्वं जलं पातुं इच्छसि, तर्हि त्वं कूपं प्रति गच्छ, तत्र जलं च पिब । यदि सः पठितुं इच्छति, तर्हि पाठशालायां किं न गच्छति ? अहं पठितुं एव अत्र आगतः, न तु ओदनं खादितुम् । यदि सा स्त्री स्वशरीरं भूषितुं आभरणानि इच्छति, तर्हि तस्यै तानि आभरणानि देहि । यदि त्वं स्तेन-भूत्वा धनं मुषितुं इच्छसि तर्हि तथा कुरु । तेन राजपुरुषः त्वां कारागृहे रक्षयिष्यति । केन कर्मणा त्वं जीवितुं इच्छसि ? यदि त्वं अज्ञानेन कर्मणा एव जीवितुं इच्छसि, तर्हि तथा करणं तुभ्यं न योग्यं अस्ति । यदि त्वं मंदिरं रक्षितुं अत्र आगतः तर्हि तेन आर्येण सह अत्र आगच्छ, मंदिरस्य रक्षां च कुरु । पूजनीयः गुरुः त्वां अनेन उपदेशेन बोधितुं इच्छति ।

# पाठ १०

## पांचही लकारांचीं रूपें.

पूर्वी सांगितलेल्या पांचही लकारांचीं रूपें वाचकांना सहज समजावीं म्हणून पुनः येथे तशींच देत आहें—

वद् [ बोलणें ]

[ प्रथम गण परस्मैपदी ]

[ १ ] लट् [ वर्तमानकाळ ]

| | | एक० | द्वि० | बहु० |
|---|---|---|---|---|
| १ | प्र० | वदति | वदतः | वदन्ति |
| २ | म० | वदसि | वदथः | वदथ। |
| ३ | उ० | वदामि | वदावः | वदामः। |

[ २ ] लृट् [ भविष्यकाळ ]

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | प्र० | वदिष्यति | वदिष्यतः | वदिष्यन्ति। |
| २ | म० | वदिष्यसि | वदिष्यथः | वदिष्यथ। |
| ३ | उ० | वदिष्यामि | वदिष्यावः | वदिष्यामः। |

[ ३ ] लङ् [ अनद्यतन भूत ]

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | प्र० | अवदत् | अवदताम् | अवदन्। |
| २ | म० | अवदः | अवदतं | अवदत। |
| ३ | उ० | अवदं | अवदाव | अवदाम |

[ ४ ] लोट् [ आज्ञार्थ ]

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | प्र० | वदतु, वदतात् | वदतां | वदन्तु |
| २ | म० | वद ,, | वदतं | वदत। |
| ३ | उ० | वदानि | वदाव | वदाम। |

### [५] लिङ् [ विध्यर्थ ]

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | प्र० | वदेत् | वदेतां | वदेयुः । |
| २ | म० | वदेः | वदेतं | वदेत । |
| ३ | उ० | वदेयम् | वदेव | वदेम । |

असाच तऱ्हेनें खालीं दिलेल्या धातूंचीं रूपें चालवितां येतील—

## प्रथम गण परस्मैपदी धातु.

रण् [ शब्द करणें ] रणति, रणिष्यति, अरणत्, रणतु, रणेत्, रणितुं ।
रुह् [ उगवणें ] रोहति, रोक्ष्यति, अरोहत्, रोहतु, रोहेत्, रोढुम् ।
लप् [ बोलणें ] लपति, लपिष्यति, अलपत्, लपतु, लपेत्, लपितुं ।
क्षुभ् [ क्षोभ करणें ] क्षोभति, क्षोभिष्यति, अक्षोभत्, क्षोभतु, क्षोभेत्, क्षोभितुं, क्षोब्धुं ।
वद् [ बोलणें ] वदति, वदिष्यति, अवदत्, वदतु, वदेत्, वदितुम् ।
वम् [ ओकणें ] वमति, वमिष्यति, अवमत्, वमतु, वमेत्, वमितुं ।
वस [ राहणें ] वसति, वत्स्यति, अवसत्, वसतु, वसेत् वस्तुम् ।
वृध् [ वाढणें ] वर्धति, वर्धिष्यति, अवर्धत्, वर्धतु, वर्धेत्, वर्धितुम् ।
व्रज् [ जाणें ] व्रजति, व्रजिष्यति, अव्रजत्, व्रजतु, व्रजेत्, व्रजितुम् ।
शंस [ स्तुति करणें ] शंसति, शंसिष्यति, अशंसत्, शंसतु, शंसेत्, शंसितुं ।

# पाठ ११

आता या धड्यामध्यें पुढील धातूंचीं रूपें करा व त्यांचा वाक्यांत उपयोग, करा—

शुंध् [ स्वच्छ करणें ] शुंधति, शुंधिष्यति, अशुंधत्, शुंधतु, शुंधेत्, शुन्धितुं ।

शुभ् [ प्रकाशयुक्त होणें ] शोभति, शोभिष्यति, अशोभत्, शोभतु, शोभेत्, शोभितुम् ।

श्लिष् [ आलिंगन देणें ] श्लेषति, श्लेक्ष्यति, अश्लेषत्, श्लेषतु, श्लेषेत्, श्लेष्टुम् ।

सह् [ सहन करणें ] सहति, सहिष्यति, असहत्, सहतु, सहेत्, सहितुं, सोढुं ।

सृप् [ सरपटणें ] सर्पति, सर्प्स्यति, असर्पत्, सर्पतु, सर्पेत्, सर्प्तुं, सप्तुम् ।

स्खल् [ अडखळणें ] स्खलति, स्खलिष्यति, अस्खलत्, स्खलतु, स्खलेत्, स्खलितुम् ।

स्तन् [ गर्जना करणें ] स्तनति, स्तनिष्यति, अस्तनत्, स्तनतु, स्तनेत्, स्तनितुं ।

स्था [ उभे राहणें ] तिष्ठति, स्थास्यति, अतिष्ठत्, तिष्ठतु, तिष्ठेत्, स्थातुं ।

स्फुट् [ फुटणें ] स्फोटति, स्फोटिष्यति, अस्फोटत्, स्फोटतु, स्फोटेत्, स्फोटितुम् ।

स्मृ [ स्मरण करणें ] स्मरति, स्मरिष्यति, अस्मरत् स्मरतु, स्मरेत्, स्मर्तुम् ।

स्रु [ गळणें ] स्रवति, स्रोष्यति, अस्रवत्, स्रवतु, स्रवेत्, स्रोतुं ।

हल् [ नांगरणें ] हलति, हलिष्यति, अहलत्, हलतु, हलतु, हलेत्, हलितुं ।

हिंस् [ हिंसा करणें ] हिंसति, हिंसिष्यति, अहिंसत्, हिंसतु, हिंसेत्, हिंसितु ।

हृ [ हरण करणें ] हरति, हरिष्यति, अहरत्, हरतु, हरेत्, हर्तुम् ।

येथे "तुम्" प्रत्ययान्त रूपें प्रत्येक धातूच्या शेवटीं दिलीं आहेत, वाचकांनी नीट लक्ष्यपूर्वक पहावीं—

## संस्कृत-वाक्यानि ।

१ स राजकुमारः अश्वं आरोहति । तत्र क्षेत्रे वृक्षः रोहति । कथं वीर-हरिणं आरोढुं शक्नोषि ? स पुरुषः अश्वं आरोहतु ।

२ त्वं किं जल्पसि ? स किं न आकर्णयति । त्वं किमर्थं तथा आलपिष्यसि । यदि त्वं आकर्णयितुं इच्छसि, तर्हि तथा कुरु । स तथा कदापि न आकर्णयत् ।

३ तौ किमर्थं न पठतः । ते सर्वेऽपि बालकाः तत्र पठिष्यन्ति । ते कदापि न अपठन् । सा पुत्रिका तथा पठतु परंतु त्वं न पठ । यदि त्वं पठितुं इच्छसि तर्हि प्रथमं पुस्तकं पठ ।

४ स ज्वरति अतः वमति । न इदानीं स न ज्वरति, परन्तु वमति । तेन वमनाय कषायः पीतः तेन स तथा वमति ।

५ स तस्मिन् गृहे वसति । त्वं कुत्र वत्स्यसि ? यदि स वस्तुं इच्छति तर्हि तत्र वसतु ।

६ स सर्पति त्वं तथा सर्प्स्यसि किं ? सर्प्तुं न इच्छामि अतः तत्र इदानीं नैव आगमिष्यामि ।

७ अहं न स्मरामि यत् त्वया तदानीं तत्र उक्तं । तत् त्वमपि स्मरसि किं यद् ? स स्मरतु तेन यद् उक्तम् ।

८ तत् पात्रं स्रवति अतः तस्मात् पात्रात् सर्वं अर्कं बहिः आगतम् ।

९ अहं भूमिं न हलामि । तर्हि कः हलिष्यति ? मम भृत्यः हलिष्यति । कदा स तत्र हलितुं गमिष्यति ?

१० तस्मात् कूपात् सः जलं आहरति । अहं कदापि न आहरामि, स एव तथा आहरति । कः आहर्तुं इच्छति ? यः आहर्तुं इच्छति, स अस्य आहरतु ।

## मराठी वाक्यें.

१ तो राजकुमार घोड्यावर चढतो. त्या शेतात वृक्ष उगवतो. कसा वीर हत्तीवर चढूं शकतो ? तो मनुष्य घोड्यावर चढो !

२ तूं का बोलतोस ? तो का नाहीं बोलत ? तूं या तसें बोलशील ? जर तूं बोलूं इच्छितोस तर तसें कर. तो तसें कधीही नाहीं बोलला.

३ ते [ दोघे ] का नाहीत बोलत ? ते सर्व ही बालक तेथे बोलतील. ते कधीही नाहीं बोलले. ती मुलगी तसें बोलो, परंतु तूं नको बोलूंस. जर तूं बोलूं इच्छितोस तर प्रथम पुस्तक वाच.

४ तो आजारी आहे म्हणून खोकतो. नाहीं, आता तो नाहीं आजारी परंतु खोकतो. तो खोकण्याकरिता काढा प्याला, त्यामुळे तो तसा खोकतो

५ तो त्या घरात राहतो. तूं कोठे राहशील ? जर तो राहूं इच्छितो तर तेथे राहो.

६ तो सरपटत जातो. तूं तसा सरपटत जाशील काय ? मी सरपटत जाऊं नाहीं इच्छीत. म्हणून तेथे आता नाहीच येणार.

७ मला नाहीं स्मरत जें तूं तेव्हा तेथे बोललास. तें तुला तरी स्मरतें काय, बोल त्याने जें सांगितलें त्याचें तो स्मरण करो.

८ हें भांडें गळतें म्हणून त्या भांड्यातून सर्व पाणी बाहेर आलें

९ मी जमीन नाहीं नागरत. तर कोण नागरील ? माझा चाकर नागरील. केव्हा तो तेथे नागरण्याकरिता जाईल ?

१० त्या विहिरीतून तो पाणी आणतो. मी कधींही नाहीं आणीत परंतु तोच नेहमी आणतो. कोण आणूं इच्छितो ? जो आणूं इच्छितो तोच पाणी आणो !

## धातु-साधितें.

" त्वा " प्रत्यय लावून एक प्रकारचें धातुसाधित बनविता येतें. उदा० पहा—

| धातु | | | धातु साधित | |
|---|---|---|---|---|
| गम् | [ जाणें ] | = | गत्वा | [ जाऊन ] |
| पठ् | [ पठन करणें ] | = | पठित्वा | [ पठन करून ] |
| स्मृ | [ स्मरणें ] | = | स्मृत्वा | [ स्मरण करून ] |
| दृश् | [ पाहणें ] | = | दृष्ट्वा | [ पाहून ] |
| अट् | [ भटकणें ] | = | अटित्वा | [ भटकून ] |
| नंद् | [ आनंद कर ] | = | नंदित्वा | [ आनंद करून ] |
| हिंस् | [ हिंसा करणें ] | = | हिंसित्वा | [ हिंसा करून ] |

' त्वा ' व ' य ' प्रत्यय

धातूच्या पाठीमागें उपसर्ग असतांना " त्वा " प्रत्ययाच्या ऐवजी " य " प्रत्यय लागत असतो " त्वा " प्रत्यय लागून धातुसाधिताचा जो अर्थ होतो तोच " य " प्रत्यय लावला असतांही होत असतो उदाहरणार्थ पहा—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| सं | + | गम् | — | संगम्य | [ मिळून ] |
| प्र | + | पठ् | — | प्रपठ्य | [ विशेष वाचून ] |
| वि | + | स्मृ | — | विस्मृत्य | [ विसरून ] |
| सं | + | स्पृश् | — | संस्पृश्य | [ स्पर्श करून ] |
| प्र | + | पठ् | — | प्रपठ्य | [ पाठ करून ] |
| वि | + | हिंस् | — | विहिंस्य | [ हिंसा करून ] |
| अभि | + | नन्द् | — | अभिनन्द्य | [ अभिनंदन करून ] |
| वि | + | स्मृ | — | विस्मृत्य | [ विसरून ] |

# पाठ १२

'य' प्रत्यय लावलेलीं धातुसाधितें पूर्वी दाखविलीं आहेत. तशींच आणखी या पहा—

स + दृश् = संदृश्य [ चांगलें पाहून ]
अपि + अट् = अभ्यटय [ घर भटकून ]
वि + नंद = विनंद्य [ विशेष आनंद करून ]
वि + हिंस् = विहिंस्य [ विशेष हिंसा करून ]

"त्वा" प्रत्ययाच्या पूर्वी कित्येक धातूंना "इ" लागतो व कित्येकांना ती लागत नाहीं, परंतु ज्या धातूंना उपसर्ग लागलेला असतो. त्या धातूंना मात्र "इ" प्रत्यय कधींही लागत नाहीं हा एवढा साधारण नियम वाचकांनीं लक्ष्यांत ठेवला असता त्यांना अशा तऱ्हेच्या धातुसाधितांचा उपयोग वाक्यांत सहज करतां येईल. उदाहरणार्थ या धातुसाधितांचा उपयोग करून पुढें कांहीं वाक्यें दिलीं आहेत, तीं पहा—

## संस्कृत- वाक्यानि.

१ त्वं तं ग्रामं गत्वा किं करिष्यसि ? अहं तत्र गत्वा, गुरुं नत्वा, ईश्वरं च प्रणम्य, गुरोः सकाशात् काव्यं पठित्वा, मम मित्रं दृष्ट्वा श्वः सायंकाले पुन: अत्रैव त्वत्समीपं आगमिष्यामि ।

२ त्वं कदा भोजनं करिष्यसि ? अहं अद्य सायंकाले शीतोदकेन स्नात्वा, सन्ध्यां उपास्य, परमेश्वरस्य ध्यानं कृत्वा, स्तोत्राणि च पठित्वा, वेदं अधीत्य, गुरोः दर्शनं च कृत्वा, पुनः गृहं आगत्य, मित्रैः सह संलापं कृत्वा, हस्तौ पादौ च प्रक्षाल्य, पश्चात् एव भोजनं करिष्यामि ।

## मराठी अर्थ.

१. तूं त्या गावाला जाऊन काय करशील ? मी तेथें जाऊन गुरुला नमस्कार करून आणि ईश्वराला प्रणाम करून, गुरुजवळ काव्य म्हणून, माझ्या मित्राला पाहून, उद्यां संध्याकाळीं पुनः येथेंच तुझ्याजवळ येईन.

२. तूं केव्हां भोजन करशील ? मी आज संध्याकाळीं थंड पाण्यानें स्नान करून संध्या करून, परमेश्वराचें ध्यान करून, स्तोत्रें म्हणून, वेदाचा अभ्यास आणि गुरूचें दर्शन घेऊन, पुन: घरीं येऊन, मित्राच्या बरोबर गोष्टी बोलून, हातपाय धुवून, नंतरच भोजन करीन.

## सूचना.

“ त्वा ” आणि “ य ” प्रत्यय लावून धातुसाधितें कशीं बनतात, हें समजून आल्यामुळे वर दिलेल्या वाक्यांवरून कितीतरी मोठमोठीं वाक्यें बन- वितां येतात, हें वाचकांना वाचून स्पष्ट कळून चुकलें असेल म्हणून अशा तऱ्हेच्या रूपाचा उपयोग करून वाचकांना स्वत काही अशीं मोठमोठीं वाक्यें करतां येतील.

## संधि केलेलीं वाक्यें.

घनश्यामस्त्वस्मिन्मासे भवति। नाहं जानामि तव किं पतितम्। अहम- द्यैव जलं पास्यामि। अहं ह्यो दुग्धं नापिबम्। तव पुत्रो दुग्धं पिबतु। कृष्ण- पुत्रो जलं न पिबेत्। अत्रास्य वृक्षोऽस्मिन्मासे फलति। तव सर्वेऽपि वृक्षा आगामिनि मासे फलिष्यन्ति। गुरुर्मामबोधयत्। स नृपतिरद्यास्मिन्महोत्सवे सर्वं नगरं भूषयिष्यति। स्तेनो धनं मुष्णाति। राजपुरुषो नगरं रक्षति। द्वारपालो मन्दिरं रक्षति।



# पाठ १२

## बाकीच्या लकारांचीं परस्मैपदी रूपें.

पांच प्रकारच्या लकारांचीं रूपें वाचकांना आतां करतां येऊं लागलीं आहेत. सहाव्या लकाराचीं रूपें फक्त वेदाच्या मंत्रांमध्येंच येत असतात. म्हणून या सहाव्या लकाराचा विचार करण्याची या ठिकाणीं फारशी आवश्यकता नाहीं. तेव्हां आतां फक्त चार लकारांचींच रूपें कशीं बनतात, तेवढेंच पहावयाचें उरलें आहे. त्यापैकीं पुढें एका लकाराचीं रूपें कशीं बनवावयाचीं, तें सांगितलें आहे, ती रीत वाचकांनीं नीट लक्षांत ठेवावी.

### ( १ ) अनद्यतनपरोक्षभूते-लिट्।

अनद्यतन अर्थात् जें कांहीं आज झालेलें नाहीं आणि परोक्ष अर्थात् आपल्यासमोर झालेलें नाहीं, अशा प्रकारच्या भूतकाळाचा जेव्हां उपयोग करावयाचा असतो, तेव्हां "लिट्" या रूपाचा वाक्यांत उपयोग करावयाचा असतो. जसें- "राम राजा झाला होता." अर्थात् आज झाला नाहीं व आपल्या समोरही झाला नाहीं हेंच वाक्य संस्कृतमध्यें असें म्हणतां येईल- "**राम राजा बभूव।**" त्याचप्रमाणें "**रावण नाम राक्षसानां अधिपति बभूव।**" इ० या लिट्चीं रूपें खालीं दिलीं आहेत--

| | | एक | द्वि० | बहु० |
|---|---|---|---|---|
| १ | प्र० | बभूव | बभूवतुः | बभूवुः |
| २ | म० | बभूविथ | बभूवथुः | बभूव |
| ३ | उ० | बभूव | बभूविव | बभूविम |

हीं "भू" धातूचीं रूपें आहेत. यांतील पहिलें अक्षर दोनदां येत असतें. जसें-"**भू**" चें रूप प्रथम "**भू भू**" असें बनतें. त्यानंतर "**भू भू**" च "**बभू**" असें रूप बनून नंतर त्यास पुढें प्रत्यय लावावयाचा असतो. आतां "**रक्ष्**" धातूचीं लिट्चीं रूपें कशीं होतात, तें पहा—

*

# पाठ १४

| | |
|---|---|
| क्रम् = चक्राम, चक्रमतुः | स्था = तस्थौ, तस्थतुः |
| क्रीड् = चिक्रीड, चिक्रीडतुः | स्मृ = सस्मार, सस्मरतुः |
| क्षर् = चक्षार, चक्षरतुः | हिंस = जिहिंस, जिहिंसतुः |

हीं रूपें वाचकानीं पाठांतील व त्याच धातूंचीं बाकीचीं रूपेंही बनविण्याचा प्रयत्न करावा. तीं त्यांना स्वतःच्याच बनवितां येण्याजोगीं आहेत. इतक्या धातूंचीं रूपें वाचकांना बनवितां येऊं लागल्यानंतर बाकीच्या धातूंचीं रूपेंही त्यांना सहजच बनवितां येऊं लागतील. पुढीं सांगितलेल्या रूपाप्रमाणेंच वाचकांनीं या धातूंचीं सर्व रूपें प्रथम कागदावर लिहून पाहण्याचा पुष्कळ सराव ठेवावा. म्हणजे रूपें लवकर लक्षांत राहतील.

### [ १ ] अनद्यतन भविष्यति लुट् ।

जो भविष्यकाळ आजचा नाहीं, त्या भविष्यकाळाला अनद्यतन भविष्य म्हणतात.

या अनद्यतन भविष्यकाळाचा उपयोग करावयाचा असताना " लुट् " या रूपाचा उपयोग करावयाचा असतो.

" भू " धातूचीं " लुट् " चीं रूपें–

| | | एक० | द्वि० | बहु० |
|---|---|---|---|---|
| १ | प्र० | भविता | भवितारौ | भवितारः |
| २ | म० | भवितासि | भवितास्थः | भवितास्थ |
| ३ | उ० | भवितास्मि | भवितास्वः | भवितास्मः |

" बुध् " धातूचीं " लुट् " चीं रूपें–

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | प्र० | बोधिता | बोधितारौ | बोधितारः |
| २ | म० | बोधितासि | बोधितास्थः | बोधितास्थ |
| ३ | उ० | बोधितास्मि | बोधितास्वः | बोधितास्मः |

या " लुङ् " चीं रूपें बनविण्याची रीत फारच मोठी आहे. पर जे " ताद्रै, ताद्ः " इत्यादि प्रत्यय दिले आहेत, ते फक्त धातूस जोडून दिले, म्हणजे त्या गणांचीच रूपें बनत असतात किंवा धातूंना प्रत्ययांच्या पूर्वी " इ " लागत असते व कित्येकांना लागत नसते यासंबंधी माहिती नेहमी निर- निराळ्या संस्कृत ग्रंथांचें वाचन करीत गेल्याने होऊं शकेल. या ' लुङ् '' चीं रूपें संस्कृत भाषेंत फारच थोडी आढळण्यांत येतात. " लृङ् " च्या भविष्य काळाचीं रूपें सांगितलीं आहेत, त्याचाच बहुधा वाक्यांतून पुष्कळ प्रयोग होत असतो म्हणून या " लुङ् " च्या रूपांविषयी फारसें लिहिण्याची या ठिकाणीं आवश्यकता दिसत नाहीं.

## ( ३ ) भूत " लुङ् "

सर्वसाधारण भूतकाळाचा जेव्हा उपयोग करावयाचा असतो, तेव्हा या " लुङ् " च्या रूपांचा उपयोग वाक्यांत करावा.

" भू " धातूचीं " लुङ् " चीं रूपें

| | | | |
|---|---|---|---|
| १ प्र० | अभूत | अभूताम् | अभूवन् |
| २ म० | अभू | अभूतम् | अभूत |
| ३ उ० | अभूवम् | अभूव | अभूम |

निरनिराळ्या धातूंचीं या " लुङ् " चीं रूपें बनविणें थोडेंसें अवघड आहे म्हणून या " लुङ् " विषयी ज्या कांहीं सूचना लक्षांत ठेवणें आवश्यक आ- हे त्या पुढें देण्यांत येतील.



# पाठ १५

## [ ४ ] हेतुहेतुमद्भावाद्यर्थे भविष्यति लृङ् ।

" असें झालें तर असें होईल, " अशा वाक्यांचे एकमेकांविषयी हेतुभाव ज्या वेळीं दाखवावयाचे असतात, तेव्हा या " लृङ् " च्या रूपाचा उपयोग करावयाचा असतो

" भू " धातूचीं " लृङ् " चीं रूपें

| | | | |
|---|---|---|---|
| १ प्र० | अभविष्यत् | अभविष्यतां | अभविष्यन् |
| २ म० | अभविष्य | अभविष्यतं | अभविष्यत |
| ३ उ० | अभविष्य | अभविष्याव | अभविष्याम |

या " लृङ् " च्या रूपामध्यें जें वैशिष्ट्य आहे, तें हें कीं आरम्भाचा " अ " कार व शेवटचा प्रत्यय हे तर " अनद्यतन भूत-लङ् " चेच आहेत व मध्येंही " भविष्य लृट " चा " स्य " लागलेला आहे याप्रमाणे " लङ् " आणि " लृट् " याचा मिलाफ या " लृङ् मध्यें झालेला आहे ही एवढी विशेष गोष्ट जर वाचकांनी नीट लक्ष्यांत ठेवली, तर त्यांना ' लृङ् ' चीं रूपें सहज बनविता येऊं लागतील

या ठिकाणीं उरलेल्या चारी लकारांचीं रूपें बनविण्याची रीत सांगितली आहे पहिल्या पाच लकारांचीं रूपें बनविण्याची रीत यापूर्वी आरंभींच दिलेल्या धड्यांत आलेली आहे याप्रमाणें एकंदर ९ लकारांच्या रूपांशीं वाचकांचा आता पर्यंत परिचय झाला आहे दहावा लकार वेदाच्या मंत्रांतूनच येत असतो म्हणून त्याचा विचार इतक्यातच करण्याची आवश्यकता नाहीं

या रूपाचे प्रयोग व रसेंच त्याचा उपयोग पुढें सांगितला जाईल, या नऊही लकारांचीं रूपें नीटच लौकर समजावीत, म्हणून पुन एकदा तीं खालीं देत आहे—

## वस् धातूचीं रूपें.

१ ( लट् ) वसति, वसतः, वसन्ति। वससि, वसथः, वसथ। वसामि, वसावः, वसामः॥

२ ( लृट् ) वत्स्यति, वत्स्यतः, वत्स्यन्ति। वत्स्यसि, वत्स्यथः, वत्स्यथ। वत्स्यामि, वत्स्यावः, वत्स्यामः॥

३ ( लङ् ) अवसत्, अवसताम्, अवसन्। अवसः, अवसतम्, अवसत। अवसम्, अवसाव, अवसाम।

४ ( लोट् ) वसतु वसतात्, वसताम्, वसन्तु। वस वसतात्, वसतम्, वसत। वसानि, वसाव, वसाम॥

५ ( लिङ् ) वसेत्, वसेताम्, वसेयुः। वसेः, वसेतम्, वसेत। वसेयम्, वसेव, वसेम॥

६ ( लिट् ) उवास, ऊषतुः, ऊषुः। उवसिथ, ऊषथुः, ऊष। उवास, ऊषिव, ऊषिम॥

७ ( लुट् ) वस्ता, वस्तारौ, वस्तारः। वस्तासि, वस्तास्थः, वस्तास्थ। वस्तास्मि, वस्तास्वः, वस्तास्मः॥

८ ( लुङ् ) अवात्सीत्, अवात्ताम्, अवात्सुः। अवात्सीः, अवात्तम्, अवात्त। अवात्सम्, अवात्स्व, अवात्स्म॥

९ ( लृङ् ) अवत्स्यत्, अवत्स्यताम्, अवत्स्यन्। अवत्स्यः, अवत्स्यतम्, अवत्स्यत। अवत्स्यम्, अवत्स्याव, अवत्स्याम॥

### सूचना.

"वस्" धातूचीं रूपें इतर धातूंहून थोडींशीं अधिक कठिण असल्या-मुळें या ठिकाणीं दिलीं आहेत. इतर धातूंचीं रूपें पूर्वी सांगितलेल्या नियमाप्रमाणें च वाचकांना बनवितां येतील.

या ठिकाणीं परस्मैपदाच्या प्रथम गणाच्या धातूंचें प्रकरण समाप्त झालें आहे.

## पाठ १६

या धड्यांत महाभारतांतील पुढील श्लोकांचा अभ्यास करा—

( म० भारत वन० अ० २५९ )

वैशंपायन उवाच।

वने निवसतां तेषां पांडवानां महात्मनाम्।
वर्षाण्येकादशाऽतीयुः कृच्छ्रेण भरतर्षभ ॥ १ ॥
फलमूलाशनास्ते हि सुखार्हा दुःखमुत्तमम्।
प्राप्तकालमनुध्यांतः सेहिरे नरपुंगवाः ॥ २ ॥
युधिष्ठिरस्तु राजर्षिरात्मकर्मापराधजम्।
चिंतयन्स महाबाहुर्भ्रातॄणां दुःखमुत्तमम् ॥ ३ ॥
न सुष्वाप सुखं राजा हृदि शल्यैरिवार्पितैः।
दौरात्म्यमनुपश्यंस्तत्काले द्यूतोद्भवस्य हि ॥ ४ ॥

---

हे भरतर्षभ ! हे भरतश्रेष्ठ ! तेषां महात्मनां पांडवानां वने निवसतां एकादश वर्षाणि कृच्छ्रेण कष्टेन अतीयुः व्यतीतानि ॥ १ ॥ ते हि सुखार्हाः सुखाय योग्या अपि फलमूलाशनाः फलमूलभक्षकाः भूत्वा प्राप्तकालं प्राप्तसमयमनुध्यान्तो विचारयन्तो नरपुंगवाः श्रेष्ठमनुष्याः उत्तमम् अत्यंतं दुःखं सेहिरे ॥ २ ॥ महाबाहू राजर्षिर्युधिष्ठिरस्तु राजश्रेष्ठो धर्मराजस्तु आत्मकर्मापराधजं आत्मनः स्वस्य कर्मणः अपराधात् जनितं भ्रातॄणां बंधूनां उत्तमं दुःखं चिंतयन् ॥ ३ ॥ स राजा हृदि अर्पितैः शल्यैः इव द्यूतोद्भवस्य द्यूतजनितस्य तत् दौरात्म्यं काले अनुपश्यन् सुखं न सुष्वाप ॥ ४ ॥

---

शब्दार्थ-कृच्छ्र = कष्ट. सेहिरे = सहन केले. चिंतयन् = विचार करणारा. अर्पित = शिरलेला. सुष्वाप= निजला. दौरात्म्यं= दुःख. शल्यं= शल्य, बाण. सुखं न सुष्वाप= सुखानें नाहीं निजला.

ससमरन्परुषा वाचः सूतपुत्रस्य पाण्डवः ।
निःश्वासपरमो दीनो बिभ्रत्कोपविषं महत् ॥ ५ ॥
अर्जुनो यमजौ चोभौ द्रौपदी च यशस्विनी ।
स च भीमो महातेजाः सर्वेषामुत्तमो बली ॥ ६ ॥
युधिष्ठिरमुदीक्षन्तः सेहुर्दुःखमनुत्तमम् ।
अवशिष्टमल्पकालं मन्वाना पुरुषर्षभा ॥ ७ ॥
वपुरन्यदिवाऽकार्षुरुत्साहामर्षचेष्टितैः ।
कस्यचित्त्वथ कालस्य व्यासः सत्यवतीसुतः ॥ ८ ॥
आजगाम महायोगी पाण्डवानवलोककः ।

---

सूतपुत्रस्य कर्णस्य परुषा। कठोरा वाच शब्दा सस्मरन् स्मरन् पांडवा भ्रमराणो महद् कोपविष क्रोधस्य विष बिभ्रत् धारयन् निःश्वासपरमो नि श्वा स्युक्तो दीनश्च अभवत् ॥ ५ ॥ अर्जुनः उभौ यमजौ नकुलसहदेवौ यश स्विनी द्रौपदी च सर्वेषामुत्तमा बली बलिष्ठो महातेजा महातेजस्वी स भीमश्च ॥ ६ ॥ एते सर्वे पुरुषर्षभाः युधिष्ठिरमुदीक्षन्तो अल्पकालमवशिष्ट मन्वाना विचारयन्तोऽनुत्तममत्यन्त दुःख सेहु सेहिरे ॥ ७ ॥ उत्साहामर्ष चेष्टितै अन्यत् भिन्न इव वपु शरीर अकार्षु । अथ कस्यचित् कालस्य पश्चात् सत्यवतीसुतो ॥ ८ ॥ महायोगी पांडवान् अवलोकको द्रष्टुकामो व्यास आजगाम ।

---

शब्दार्थ-परुष= कठोर कोपविष क्रोधाचें विष निःश्वासपरम - दीर्घ श्वास घेणारा अनुत्तम- अत्यंत उत्तम मन्वान - विचार करणारे सेहु सहन करते झाले अमर्ष सहन न करणें चेष्टित- प्रयत्न वपु - शरीर अवलोकक - पाहण्याची इच्छा करणारा आजगाम- आला उदीक्षन्- पाहणारा



# पाठ १७

तमागतमभिप्रेक्ष्य कुंतीपुत्रो युधिष्ठिरः । ॥ ९ ॥
प्रत्युद्गम्य महात्मानं प्रत्यगृह्णाद्यथाविधि ।
समासीनमुपासीनः शुश्रूषुर्नियतेन्द्रियः ॥ १० ॥
तोषयन्प्रणिपातेन व्यासं पांडवनंदनः ।
तानवेक्ष्य कृशान्पौत्रान्वने वन्येन जीवतः ॥ ११ ॥
महर्षिरनुकंपार्थमब्रवीद् बाष्पगद्गदम् ।
युधिष्ठिर महाबाहो शृणु धर्मभृतां वर ॥ १२ ॥
नाऽतप्ततपसो लोके प्राप्नुवन्ति महासुखम् ।
सुखदुःखे हि पुरुषः पर्यायेणोपसेवते ॥ १३ ॥
न ह्यनंतं सुखं कश्चित्प्राप्नोति पुरुषर्षभ ॥ १४ ॥

---

कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः तं व्यासं आगतं अभिप्रेक्ष्य अवलोक्य महात्मानं व्यासं प्रत्युद्गम्य संमुखं गत्वा यथाविधि विधिं अनुसृत्य प्रत्यगृह्णात् प्रतिगृहं कृतवान् ॥ ९ ॥ तं व्यासं आसीनं उपविष्टं पांडवनंदनः पांडुपुत्रः युधिष्ठिरः नियतेन्द्रियः संयतेन्द्रियः उपासीनः समीपमेव उपस्थितः शुश्रूषुः सेवाकर्तुकामः प्रणिपातेन नमस्कारेण तोषयन् संतोषयन् । तान् पौत्रान् पुत्रस्य पुत्रान् वन्येन कंदमूलफलादिना जीवतः जीवनं कुर्वतः अतएव कृशान् दुर्बलान् अवेक्ष्य दृष्ट्वा ॥ ११ ॥ महर्षिः अनुकंपार्थं दयार्थं बाष्पगद्गदं बाष्पैरश्रुभिर्नेत्राम्भोभिर्गद्गदितकंठेन च अब्रवीत् उक्तवान् । हे युधिष्ठिर ! हे महाबाहो ! हे धर्मभृतां वर ! शृणु ॥ १२ ॥ लोके अस्मिन् लोके अतप्ततपसः महासुखं न प्राप्नुवन्ति । पुरुषः सुखदुःखे पर्यायेण उपसेवते ॥ १३ ॥ हे पुरुषर्षभ ! कश्चित् हि अनन्तं सुखं न प्राप्नोति ॥ १४ ॥

---

शब्दार्थ-शुश्रूषुः= सेवा करण्याची इच्छा करणारा. अतप्ततपाः= ज्यानें तप केलें नाहीं. पर्याय= एकामागून एक.

प्रज्ञावांस्त्वेव पुरुषः संयुक्तः परया धिया ।
उदयास्तमनज्ञो हि न हृष्यति न शोचति ॥ १५ ॥
सुखमापतितं सेवेद् दुःखमापतितं वहेत् ।
कालप्राप्तमुपासीत सस्यानामिव कर्षकः ॥ १६ ॥
तपसो हि परं नास्ति तपसा विन्दते महत् ।
नाऽसाध्यं तपसः किञ्चिदिति बुध्यस्व भारत ॥ १७ ॥
सत्यमार्जवमक्रोधः संविभागो दमः शमः ।
अनसूयाऽविहिंसा च शौचमिन्द्रियसंयमः ॥ १८ ॥
पावनानि महाराज नराणां पुण्यकर्मणाम् ।
अधर्मरुचयो मूढास्तिर्यग्गतिपरायणाः ।
कृच्छ्रां योनिमनुप्राप्ता न सुखं विन्दते जनाः ॥ १९ ॥

---

* प्रज्ञावान् बुद्धिमान् एव पुरुषः परया धिया संयुक्तः उदयास्तमनज्ञः उदयं अस्तमनं अस्तं च जानाति इति उदयास्तमनज्ञः न हृष्यति न च शोचति न शोकं करोति ॥ १५ ॥ आपतितं प्राप्तं सुखं सेवेत्, आपतितं दुःखं वहेत् । कर्षकः कृषिकर्मकर्ता सस्यानां कालप्राप्तं फलं इव उपासीत ॥ १६ ॥ हि तपसः तपश्चरणात् परं श्रेष्ठं किञ्चित् अपि नास्ति । तपसा महत् फलं विन्दते प्राप्नोति । हे भारत ! युधिष्ठिर ! तपसः असाध्यं किञ्चिदपि नास्ति इति बुध्यस्व जानीहि ॥ १७ ॥ सत्यं, आर्जवं = ऋजुत्वं = सरलत्वं, अक्रोध = क्रोधराहित्यं, संविभागः = समविभागः, दमः = इन्द्रियदमनं, शमः = मनसः शान्तिः, अनसूया = असूयाराहित्यं, अविहिंसा = अहिंसा, शौचं, इन्द्रियसंयमः ॥ १८ ॥ हे महाराज ! पुण्यकर्मणां नराणां एतानि पावनानि कर्माणि सन्ति । अधर्मरुचयः मूढाः तिर्यग्गतिपरायणाः अधोगतिं प्रति गच्छन्तः, कृच्छ्रां कष्टदां योनिं अनुप्राप्ताः जनाः सुखं न विन्दते ॥ १९ ॥

### द्वितीय गण ( ० )

अय् = ( जाणें )- १ अयात्, अयाताम्, अयुः । २ अया·, अयातम्, अयात । ३ अयाम्, अयाव, अयाम ।

### तृतीय गण ( द्वित्व )

दा = ( देणें )- १ दद्यात्, दद्याताम्, दद्युः । २ दद्या·, दद्यातम्, दद्यात । ३ दद्याम्, दद्याव, दद्याम ।

### पंचम गण ( नु )

साध् = ( साधणें )- १ साध्नुयात्, साध्नुयाताम्, साध्नुयुः । २ साध्नुया, साध्नुयातम्, साध्नुयात । ३ साध्नुयाम्, साध्नुयाव, साध्नुयाम ।

### सप्तम गण ( न )

पिष् = ( पीठ करणें )- १ पिंष्यात्, पिंष्याताम्, पिंष्युः । २ पिंष्या, पिंष्यातम्, पिंष्यात । ३ पिंष्याम्, पिंष्याव, पिंष्याम ।

### अष्टम गण ( उ )

कृ = ( करणें )-१ कुर्यात्, कुर्याताम्, कुर्युः । २ कुर्या·, कुर्यातम्, कुर्यात । ३ कुर्याम्, कुर्याव, कुर्याम ।

### नवम गण ( ना )

स्तम्भ् = ( स्तम्भन करणें )- १ स्तभ्नीयात्, स्तभ्नीयाताम् स्तभ्नीयुः । २ स्तभ्नीया, स्तभ्नीयातम्, स्तभ्नीयात । ३ स्तभ्नीयाम्, स्तभ्नीयाव, स्तभ्नीयाम ।

### आशीर्लिङ्

विधिलिङ्चा उपयोग विध्यर्थासाठीं व आशीर्लिङ्चा उपयोग आशीर्वाद द्यावयाचा असतांना केला जातो विधिलिङ्ची रीत पूर्वी दिलीच आहे आता आशीर्लिङ्चीं परस्मैपदीं रूपें कशीं बनवावयाचीं ह्याची रीत पहा.

## पाठ ९

### आशीर्लिङ्चे प्रत्यय

| | | | |
|---|---|---|---|
| १ | —यात् | —यास्ताम् | —यासुः। |
| २ | —याः | —यास्तम् | —यास्त। |
| ३ | —यासम् | —यास्व | —यास्म। |

भू = ( होणें )– १ भूयात्, भूयास्ताम्, भूयासुः। २ भूयाः, भूयास्तम्, भूयास्त। ३ भूयासम्, भूयास्व, भूयास्म।

धू = ( हालणें )– १ धूयात्, धूयास्ताम्, धूयासुः। २ धूयाः, धूयास्तम्, धूयास्त। ३ धूयासम्, धूयास्व, धूयास्म।

स्मृ = ( स्मरण करणें )– १ स्मर्यात्, स्मर्यास्ताम्, स्मर्यासु। २ स्मर्याः, स्मर्यास्तम्, स्मर्यास्त। ३ स्मर्यासम्, स्मर्यास्व, स्मर्यास्म।

दा = ( देणें )– १ देयात्, देयास्ताम्, देयासुः। २ देयाः, देयास्तम्, देयास्त। ३ देयासम्, देयास्व, देयास्म।

यज् = ( यज्ञ करणें )– १ इज्यात्, इज्यास्ताम्, इज्यासुः। २ इज्याः, इज्यास्तम्, इज्यास्त,। ३ इज्यासम्, इज्यास्व, इज्यास्म।

गणांच्या निरनिराळेपणाचा येथें कांहीं विशेष सम्बन्ध नाहीं, ही गोष्ट वाचकांच्या लक्ष्यांत आलीच असेल. सर्व धातूंचीं रूपें प्राय एकसारखींच होतात आतां विधिलिङ्चे आत्मनेपदाचे प्रत्यय पहा—

### विधिलिङ् ( आत्मनेपदी )

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ...ईत | ...ईयाताम् | ...ईरन्। |
| २ | ...ईथाः | ...ईयाथाम् | ...ईध्वम्। |
| ३ | ...ईय | ...ईवहि | ...ईमहि। |

नी = ( नेणें )– १ नयेत, नयेयाताम्, नयेरन्। २ नयेथाः, नयेयाथाम्, नयेध्वम्,। ३ नयेय, नयेवहि, नयेमहि।

चतुर्थ गण ( य )

शुच् = ( शुद्ध होणें )– १ शुच्येत, शुच्येयाताम्, शुच्येरन्। २ शुच्येथा, शुच्येयाथाम्, शुच्येध्वम्। ३ शुच्येय, शुच्येवहि, शुच्येमहि।

षष्ठ गण ( अ )

क्षिप् = ( फेकणें )– १ क्षिपेत, क्षिपेयाताम्, क्षिपेरन्। २ क्षिपेथाः, क्षिपेयाथाम्, क्षिपेध्वम्। ३ क्षिपेय, क्षिपेवहि, क्षिपेमहि।

दशम गण ( अय )

तड् = ( मारणें )– १ ताडयेत, ताडयेताम्, ताडयेरन्। २ ताडयेथा', ताडयेथाम्, ताडयेध्वम्। ३ ताडयेय, ताडयेवहि, ताडयेमहि।

द्वितीय गण ( ० )

आस् = ( बसणें )– १ आसीत, आसीयाताम्, आसीरन्। २ आसीथा, आसीयाथाम्, आसीध्वम्। ३ आसीय, आसीवहि, आसीमहि।

तृतीय गण ( द्वित्व )

दा = ३( देणें )– १ ददीत, ददीयाताम्, ददीरन्। २ ददीथाः, ददीयाथाम्, ददीध्वम्। ३ ददीय, ददीवहि, ददीमहि।

पंचम गण ( नु )

सु = ( रस काढणें )– १ सुन्वीत, सुन्वीयाताम्, सुन्वीरन्। २ सुन्वीथा, सुन्वीयाथाम्, सुन्वीध्वम्। ३ सुन्वीय, सुन्वीवहि, सुन्वीमहि।

सप्तम गण ( न )

इन्ध् = ( जाळणें )– १ इन्धीत, इन्धीयाताम्, इन्धीरन्। २ इन्धीथाः, इन्धीयाथाम्, इन्धीध्वम्। ३ इन्धीय, इन्धीवहि, इन्धीमहि।

# पाठ १०

### अष्टम गण ( उ )

कृ = ( करणें )– १ कुर्वीत, कुर्वीयाताम्, कुर्वीरन्। २ कुर्वीथाः, कुर्वीयाथाम्, कुर्वीध्वम्। ३ कुर्वीय, कुर्वीवहि, कुर्वीमहि।

### नवम गण ( ना )

क्री = ( विकणें )– १ क्रीणीत, क्रीणीयाताम्, क्रीणीरन्। २ क्रीणीथा, क्रीणीयाथाम्, क्रीणीध्वम्। ३ क्रीणीय, क्रीणीवहि, क्रीणीमहि।

### आशीर्लिङ् आत्मनेपदी प्रत्यय.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ...सीष्ट | ...सीयास्ताम् | ...सीरन्। |
| २ | ...सीष्ठाः | ...सीयास्थाम् | ...सीध्वम्। |
| ३ | ...सीय | ...सीवहि | ...सीमहि। |

धु = ( हालवणें )– १ धोषीष्ट, धोषीयास्ताम्, धोषीरन्। २ धोषीष्ठाः, धोषीयास्थाम्, धोषीड्वम्। ३ धोषीय, धोषीवहि, धोषीमहि।

जन् = ( उत्पन्न करणें )– १ जनिषीष्ट, जनिषीयास्ताम्, जनिषीरन्। २ जनिषीष्ठाः, जनिषीयास्थाम्, जनिषीढ्वम्। ३ जनिषीय, जनिषीवहि, जनिषीमहि।

## लिङ्करितां लेट्

लिङ् यापूर्वीच सांगितला आहे व त्याचे विधिलिङ् व आशीर्लिङ् असे दोन भेद असतात, हेंही वाचकांना कळून चुकलें आहे. वेदामध्यें या " लिङ् " च्या ठिकाणीं " लेट् " चा प्रयोग होत असतो आतापर्यंत " लेट् " चीं रूपें बनविण्याची रीत सांगितलेली नाहीं, कारण या " लेट् " चा प्रयोग फक्त वेदामध्येंच होत असतो व इतरत्र कोठें येत नाहीं वेदाचे शब्द नवीन बनविले जात नाहीत वेदामध्यें जे शब्द आहेत, त्याचाच अभ्यास करावयाचा असतो,

म्हणून वैदिक लेट्चीं रूपें बनविण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. लिट्चा उपयोग ज्या अर्थाकरितां केला जातो, त्याच अर्थाकरितां वेदामध्यें " लेट् " चा उपयोग होत असतो, एवढीच गोष्ट वाचकांनीं लक्ष्यात धरावी. वाचकांनीं या धड्याचा नीट अभ्यास करावा व तो नीट समजून घ्यावा.

## रामायणम् ।

एवं सान्त्वितो रामो वस्त्रान्तेनाऽश्रूणि प्रमार्जयत् । सुग्रीवस्तुवाच च-" इदं कृतं त्वया मित्रस्य कर्तव्यम् । दुर्लभो हि त्वत्सदृशो बंधुः । विशेषत एवंविधेऽस्मिन्काले । किंतु त्वया महान्यत्नः कार्यः सीतायाः परिमार्गणे । " इति ।

ततो मधुरया गिरा प्रणयात्सुग्रीव उवाच-" आज्ञा हृतभार्योऽहं भयार्दितश्चरामि गिरिं ऋष्यमूकम् । मम भ्रातुर्वालिनो भयान्मां त्रातुमर्हसि " इति ।

एवमुक्तस्तु धर्मवत्सलो रामः सुग्रीवं प्रहसन्निव प्रत्युवाच—

" उपकारलक्षणं मित्रं अरिलक्षणं अपकारः । अतस्तव भार्यापहारिणं त्वद्भ्रातरमद्यैव हनिष्यामि । " इति ।

तच्छ्रुत्वा हृष्टः सुग्रीवो रामं प्रशशंस च उवाच च रामं-" राम ! वालिनः शौर्यं, वीर्यं पौरुषं च श्रुत्वा यथायुक्तं तद्विधत्स्व । शृणु तस्य वीर्यं, अनुदिते सूर्ये वाली अपरिश्रान्तः पश्चिमं समुद्रं क्रामति । शैलशिखराण्यप्यूर्ध्वं तरसोत्पातयति । एवंविधं वालिनं कथं त्वं हन्तुं शक्ष्यसे ? "

# पाठ ११

## भविष्य काळ ( लट् )

याच भागाच्या पहिल्या पाठामध्यें जे वर्तमानकाळाचे प्रत्यय दिले आहेत, तेच प्रत्यय या ठिकाणीही उपयोगांत आणावयाचे आहेत फक्त धातु व हे प्रत्यय यांच्यामध्यें एक " स्य " आला म्हणजे लागलीच भविष्यकाळचें रुप तयार होतें जसें—

भू = भव् + ति = भवति।
भू = भव +स्य+ ति = भविष्यति।

सर्व धातूना याचे नियम सारखेच आहेत फक्त विशेष गोष्ट इतकीच आहे कीं, कित्येक धातूना " स्य " च्या पूर्वी " इ " लागते व कित्येकांना ती लागत नाहीं आता याचीं उदाहरणें पहा—

कृ— १ करिष्यति, करिष्यत, करिष्यन्ति। २ करिष्यसि, करिष्यथ, करिष्यथ। ३ करिष्यामि, करिष्याव, करिष्याम।

सूचना—आत्मनेपदाचे वर्तमानकाळाचे प्रत्यय लावले असतां वरीलप्रमाणेंच आत्मनेपदी धातूचीं रुपें होतात जसें—

कृ- १ करिष्यते, करिष्येते, करिष्यन्ते। २ करिष्यसे, करिष्येथे, करिष्यध्वे। ३ करिष्ये, करिष्यावहे, करिष्यामहे।

ज्या धातूला " इ " कार लागत नाहीं, त्याचीं रुपें खालीं लिहिल्या प्रमाणें होतात

दृश् = १ द्रक्ष्यति, द्रक्ष्यत, द्रक्ष्यन्ति। २ द्रक्ष्यसि, द्रक्ष्यथ, द्रक्ष्यथ। ३ द्रक्ष्यामि, द्रक्ष्याव, द्रक्ष्याम।

सृज् = १ स्रक्ष्यति स्रक्ष्यत, स्रक्ष्यन्ति। २ स्रक्ष्यसि, स्रक्ष्यथ, स्रक्ष्यथ। ३ स्रक्ष्यामि, स्रक्ष्यावः, स्रक्ष्यामः।

हीं उदाहरणें पाहिलीं असतां, भविष्यकाळचीं रूपें बनविणें किती सोपें आहे, हें वाचकांना तेव्हांच समजून येईल, कारण सर्व धातूंचे प्रत्यय एकसारखेच आहेत. तथापि वाचकांना याहूनही सोप्या रीतीनें अभ्यास करतां यावा, म्हणून यांचे प्रत्यय पुढें देत आहें—

भविष्य काळ ( लृट् ) चे प्रत्यय

परस्मैपदी.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ...स्यति | ...स्यतः | ...स्यन्ति । |
| २ | ...स्यसि | ...स्यथः | ...स्यथ । |
| ३ | ...स्यामि | ...स्यावः | ...स्यामः । |

आत्मनेपदी

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ...स्यते | ...स्येते | ...स्यन्ते । |
| २ | ...स्यसे | ...स्येथे | ...स्यध्वे । |
| ३ | ...स्ये | ...स्यावहे | ...स्यामहे । |

हेतुहेतुमद्भावार्थ ( लृङ् )

चौथ्या पाठाच्या आरंभीं याच पुस्तकांत अनद्यतनभूत ( लङ् ) चे प्रत्यय दिले आहेत, त्यांच्या पूर्वी " स्य " लावला, म्हणजे या लृङ्चीं रूपें होत असतात. हे प्रत्यय विशेष लोकर ध्यानांत यावेत म्हणून ते प्रत्यक्षच येथें देतों. शिवाय लङ् ( अनद्यतन भूताच्याप्रमाणें ) धातूच्या पूर्वी " अ " लागत असतो. आतां याचे प्रत्यय पहा—

हेतुहेतुमद्भावार्थ

परस्मैपदी प्रत्यय.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ...स्यत् | ...स्यताम् | ...स्यन् । |
| २ | ...स्यः | ...स्यतम् | ...स्यत । |
| ३ | ...स्यम् | ...स्याव | ...स्याम । |

## आत्मनेपदी प्रत्यय

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ...स्यत | ...स्येताम् | स्यन्त। |
| २ | ...स्यथाः | ...स्येथाम् | ...स्यध्वम्। |
| ३ | ...स्ये | ...स्यावहि | ...स्यामहि। |

आता याची उदाहरणें पहा—

### परस्मैपदी धातु

बुध्– १ अबोधिष्यत्, अबोधिष्यताम् अबोधिष्यन्। २ अबोधिष्य:, अबोधिष्यतम्, अबोधिष्यत। ३ अबोधिष्यम्, अबोधिष्याव, अबोधिष्याम।

नी– १ अनेष्यत्, अनेष्यताम्, अनेष्यन्। २ अनेष्यः, अनेष्यतम्, अनेष्यत। ३ अनेष्यम्, अनेष्याव, अनेष्याम।

### आत्मनेपदी धातु

वृध्– १ अवर्धिष्यत, अवर्धिष्येताम्, अवर्धिष्यन्त। २ अवर्धिष्यथाः, अवर्धिष्येथाम्, अवर्धिष्यध्वम्। ३ अवर्धिष्ये, अवर्धिष्यावहि, अवर्धिष्यामहि।

नी– १ अनेष्यत, अनेष्येताम् अनेष्यन्त। २ अनेष्यथाः, अनेष्येथाम्, अनेष्यध्वम्। ३ अनेष्ये, अनेष्यावहि, अनेष्यामहि।

हेतुहेतुमद्भावार्थाच्या रूपाचा उपयोग हेतु दर्शविणाऱ्या वाक्यामध्यें होत असतो. जसें– "यदि स तत्राऽगमिष्यत् तर्हि एवं नाऽभविष्यत्। ( जर तो येथें जाता तर असें न होतें. ) अशा प्रकारच्या वाक्यामध्यें हेतुहेतुमद्भावाचा प्रयोग होतो आतां अनद्यतन भविष्याचीं रूपें बनविण्याची रीत पहा—

## अनद्यतन भविष्य ( लुट् )

अनद्यतन भविष्य ( लुट् ) चे प्रत्यय खालीं दिले आहेत. सर्व धातूंना हेच प्रत्यय लावावयाचे असतात.

परस्मैपदी

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ...ता | ...तारौ | ...तारः। |
| २ | ...तासि | ...तास्थः | ...तास्थ। |
| ३ | ...तास्मि | ...तास्वः | ...तास्मः। |

दा = ( देणें )— १ दाता, दातारौ, दातारः। दातासि, दातास्थः, दातास्थ। ३ दातास्मि, दातास्वः, दातास्मः।

भ्रम् – ( भ्रमण करणें ) १ भ्रमिता, भ्रमितारौ, भ्रमितारः। २ भ्रमितासि, भ्रमितास्थः, भ्रमितास्थ। ३ भ्रमितास्मि, भ्रमितास्वः, भ्रमितास्मः।

आत्मनेपदी

| | | | |
|---|---|---|---|
| १ | —ता | —तारौ | —तारः। |
| २ | —तासे | —तासाथे | —ताध्वे। |
| ३ | —ताहे | —तास्वहे | —तास्महे। |

आत्मनेपदी धातूंना हे प्रत्यय लागले असतां अनद्यतन भविष्याचीं रूपें तयार होतात. जसें—

दा – ( देणें )— १ दाता, दातारौ, दातारः। २ दातासे, दातासाथे, दाताध्वे। ३ दाताहे, दातास्वहे, दातास्महे।

हे प्रत्यय लागण्यापूर्वीसुद्धा कित्येक धातूंना "इ" लागते व कित्येकांना लागत नाहीं किंवा कित्येक धातूंना विकल्पानें लागत असते. जसें पहा—

लुभ् ( लोभ करणें ) १

इकारयोग– १ लोभिता, लोभितारौ, लोभितारः। २ लोभितासि, लोभितास्थः, लोभितास्थ। ३ लोभितास्मि, लोभितास्वः, लोभितास्मः॥

इकाररहित – १ लोब्धा, लोब्धारौ, लोब्धारः। २ लोब्धासि, लोब्धास्थः, लोब्धास्थ। ३ लोब्धास्मि, लोब्धास्वः, लोब्धास्मः।

ज्या धातूंना इकार ( इट् ) लागतो, त्यांना "सेट्" ( स+इट् = इकारसहित ) म्हणतात ज्यांना इकार लागत नाहीं, त्या धातूंस अनिट् ( अन्+इट् = इकाररहित ) म्हणतात आणि ज्यांना विकल्पानें इकार लागतो, त्यांना "वेट्" ( वा+इट् = विकल्पानें इट् होणारा ) म्हणतात. कोणते धातु सेट्, कोणते अनिट् व कोणते वेट् आहेत, हें प्रथमपासूनच ठरलेलें आहे यावरून जो धातु जसा असेल, तसें त्याचें रूप बनतें



## पाठ १२

### पूर्ण भूतकाळ ( लिट् )

अनद्यतन परोक्ष भूतकाळाला "लिट्" म्हणतात जी क्रिया आज झालेली नाहीं व जी क्रिया पाहिलीसुद्धा नाहीं, ती क्रिया दर्शवावयाची असतांना या लिट्च्या रूपाचा उपयोग करावयाचा असतो असें- "रामो राजा बभूव।" = ( राम राजा झाला होता ) अर्थात् सांगणाऱ्याच्या देखत राम राजा झाला नाहीं, तर तो पुष्कळ दिवसापूर्वी झाला होता या लिट्चे प्रत्यय हे आहेत—

परस्मैपदी ( लिट् )

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | . अ | . अतु | उ । |
| २ | ...थ | ...अथु | . अ । |
| १ | ..अ | व | . म । |

भू- ( होणें )- ३ बभूव, बभूवतु, बभूवुः। २ बभूविथ, बभूवथु, बभूव। १ बभूव, बभूविव, बभूविम॥

या ठिकाणीं धातूच्या पहिल्या अक्षराचें द्वित्व होतें व त्यापैकीं पहिल्या वर्णाचें मृदुत्वही होतें असें- भू+अ = भू भू अ = बुभू+ अ = बभू+अ = बभूव। याप्रमाणें रूपें बनतात आणखी कांहीं उदाहरणें पहा-

यु = (मिश्रण करणें)- १ युयाव, युयुवतुः, युयुवुः । २ युयुविथ, युयुवथुः, युयुव । ३ युयाव, युयुविव, युयुविम ।

रु = (शब्द करणें)- १ रुराव, रुरुवतुः, रुरुवुः । २ रुरुविथ, रुरुवथुः, रुरुव । ३ रुराव, रुरुविव, रुरुविम ।

वृ = (पसंत करणें)- १ ववार, वव्रतुः, वव्रुः । २ ववरिथ, वव्रतुः, वव्र । ३ ववार, ववृव, ववृम ।

मुच् = (मुक्त होणें)- १ मुमोच, मुमुचतुः, मुमुचुः । २ मुमोचिथ, मुमुचथुः, मुमुच । ३ मुमोच, मुमुचिव, मुमुचिम ।

वच् = (बोलणें)- १ उवाच, ऊचतुः, ऊचुः । २ उवचिथ, ऊचथुः ऊच । ३ उवाच, ऊचिव, ऊचिम ।

प्रच्छ् = (विचारणें)- १ पप्रच्छ, पप्रच्छतुः, पप्रच्छु । २ पप्रच्छिथ, पप्रच्छथुः, पप्रच्छ ३ पप्रच्छ, पप्रच्छिव, पप्रच्छिम ।

त्यज् = (सोडणें)- १ तत्याज, तत्यजतुः, तत्यजुः । २ तत्यजिथ, तत्यजथुः, तत्यज । ३ तत्याज, तत्यजिव, तत्यजिम ।

भुज् = (भोजन करणें)- १ बुभोज, बुभुजतुः, बुभुजुः । २ बुभोजिथ, बुभुजथुः, बुभोज । ३ बुभोज बुभुजिव, बुभुजिम ।

युज् = (जोडणें)- १ युयोज, युयुजतुः, युयुजुः । २ युयोजिथ, युयुजथुः, युयुजे । ३ युयोज, युयुजिव, युयुजिम ।

तप् = (तप करणें)- १ तताप, तेपतुः, तेपुः । २ ततपिथ, तेपथुः, तेप । ३ तताप, तेपिव, तेपिम ।

याप्रमाणें परस्मैपदी धातूंचीं रूपें बनतात- आता आत्मनेपदी धातूंचीं रूपें पहा-

### भूतकाळ ( लिट् ) आत्मनेपदी

आत्मनेपदी लिट्चे प्रत्यय पुढें दिल्याप्रमाणें आहेत—

| | | | |
|---|---|---|---|
| १ | ...ए | ...आते | ...इरे । |
| २ | ...से | ...आथे | ...ध्वे । |
| ३ | ...ए | ...वहे | ...महे । |

हे प्रत्यय लावले असता आत्मनेपदी धातूंचीं रूपें अशीं होतात—

रु – ( शब्द करणें )– १ रुरुवे, रुरुवाते, रुरुविरे । २ रुरुविषे, रुरुवाथे, रुरुविध्वे । ३ रुरुवे, रुरुविवहे, रुरुविमहे ।

शी –( निजणें )– १ शिश्ये, शिश्याते, शिश्यिरे । २ शिश्यिषे, शिश्याथे, शिश्यिध्वे । ३ शिश्ये, शिश्यिवहे, शिश्यिमहे ।

वृ – ( पसंत करणें )– १ वव्रे, वव्राते, वव्रिरे । २ वव्रृषे, वव्राथे, वव्रृढ्वे । ३ वव्रे, वव्रृवहे, वव्रृमहे ।

पच्– ( शिजवणें )– १ पेचे, पेचाते, पेचिरे । २ पेचिषे, पेचाथे, पेचिध्वे । ३ पेचे, पेचिवहे, पेचिमहे ।

भज्– ( सेवा करणें )– १ भेजे, भेजाते, भेजिरे । २ भेजिषे, भेजाथे, भेजिध्वे । २ भेजे, भेजिवहे, भेजिमहे ।

यज्= ( यज्ञ करणें )– १ ईजे, ईजाते, ईजिरे । २ ईजिषे, ईजाथे, ईजिध्वे । ३ ईजे, ईजिवहे, ईजिमहे ।

विद्– ( विचार करणें )– १ विविदे, विविदाते, विविदिरे । २ विविदिषे, विविदाथे, विविदिध्वे । ३ विविदे, विविदिवहे, विविदिमहे ।

बुध् = ( जाणणें ) - १ बुबुधे, बुबुधाते, बुबुधिरे । २ बुबुधिषे, बुबुधाथे, बुबुधिध्वे । ३ बुबुधे, बुबुधिवहे, बुबुधिमहे ।

मन् = ( विचार करणें ) - १ मेने, मेनाते, मेनिरे । २ मेनिषे, मेनाथे, मेनिध्वे । ३ मेने, मेनिवहे, मेनिमहे ।

लभ् = ( लाभणें ) - १ लेभे, लेभाते, लेभिरे । २ लेभिषे, लेभाथे, लेभिध्वे । ३ लेभे, लेभिवहे, लेभिमहे ।

कृप् = ( मागणें ) - १ चकृपे, चकृपाते, चकृपिरे । २ चकृपिषे, चकृपाथे, चकृपिध्वे । ३ चकृपे, चकृपिवहे, चकृपिमहे ।

धु = ( हालणें ) - १ दुधुवे, दुधुवाते दुधुविरे । २ दुधुविषे, दुधुवाथे, दुधुविध्वे । ३ दुधुवे, दुधुविवहे, दुधुविमहे ।

" कृ-भू-अस् " धातूंचा प्रयोग.

धातूला " आम् " प्रत्यय लावून, त्यापुढें " कृ, भू, अस् " या तीन धातूंपैकीं कोणत्याही एका धातूचें लिट्चें रूप लावलें असता मूळच्या धातूचेंही लिट्चें रूप होत असतें. कृ, भू, अस् या धातूंचीं परस्मैपदी व आत्मनेपदी रूपें पुढीलप्रमाणें होतात—

कृ ( परस्मै० ) - १ चकार, चक्रतुः चक्रुः । २ चकर्थ, चक्रथुः, चक्र । ३ चकार, चकृव, चकृम ।

कृ ( आत्मने० ) - १ चक्रे, चक्राते, चक्रिरे । २ चकृषे, चक्राथे, चकृढ्वे । ३ चक्रे, चकृवहे चकृमहे ।

भू ( परस्मै० ) - १ बभूव, बभूवतु, बभूवुः । २ बभूविथ, बभूवथुः, बभूव । ३ बभूव, बभूविव, बभूविम ।

अस् ( परस्मै० ) - १ आस, आसतुः, आसुः । २ आसिथ, आसथुः, आस । ३ आस, आसिव, आसिम ।

हीं रूपें पुढें दर्शविल्याप्रमाणें धातूंना लागतात व मग त्या धातूंचीं लिट्चीं रूपें तयार होतात—

काश् (प्रकाशणें)

| | | |
|---|---|---|
| १ कासाञ्चक्रे, | कासाञ्चक्राते, | कासाञ्चक्रिरे। |
| १ कासामास, | कासामासतुः, | कासामासुः। |
| १ कासांबभूव, | कासांबभूवतुः, | कासांबभूवुः। |

कथ् (सांगणें)

| | | |
|---|---|---|
| १ कथयांचकार, | कथयांचक्रतुः, | कथयांचक्रुः। |
| १ कथयांचक्रे, | कथयांचक्राते, | कथयांचक्रिरे। |
| १ कथयामास, | कथयामासतुः, | कथयामासुः। |
| १ कथयांबभूव, | कथयांबभूवतुः, | कथयांबभूवुः। |

येथें प्रथम पुरुषाचींच रूपें दिलीं आहेत. बाकीच्या पुरुषाचीं अर्थात् द्वितीय व उत्तम या पुरुषाचीं रूपें पूर्वीचीं रूपें लावूनच बनवितां येतात. तीं वाचकांनीं स्वतः बनवून पहावीत.

पुढील श्लोक वाचा.

(म. भा. शल्यपर्व अ. ५१)

आसीत्पूर्वं महाराज मुनिर्धीमान्महातपाः।
दधीच इति विख्यातो ब्रह्मचारी जितेन्द्रियः॥५॥
तस्यातितपसः शक्रो बिभेति सततं विभो।
न स लोभयितुं शक्यः फलैर्बहुविधैरपि॥६॥
प्रलोभनार्थं तस्याथ प्राहिणोत्पाकशासनः।
दिव्यामप्सरसं पुण्यां दर्शनीयामलंबुषाम्॥७॥

"हे महाराज! पूर्वी बुद्धिमान्, तपस्वी मुनी दधीची या नांवानें प्रसिद्ध असा जितेन्द्रिय व ब्रह्मचारी होता. ॥५॥ त्या तपस्वी मुनीच्या तपाला हे प्रभो! नेहमीं इन्द्र भिऊं लागला; पुष्कळ फळांनीं सुद्धां त्याला लोभविणें अशक्य होतें. ॥६॥ म्हणून इन्द्रानें त्याला भुळविण्यासाठीं अलंबुषा नांवाची सुन्दर, देखणी, दिव्य अप्सरा पाठवली."

# पाठ १३

## भूतकाळ ( लुङ् )

या भूतकाळाचे अनेक प्रकारचे प्रत्यय आहेत. त्यांपैकीं पहिल्या विभागाचे प्रत्यय हे आहेत—

( परस्मैपदी )

| | | | |
|---|---|---|---|
| १ | -त् | -ताम् | -उस् |
| २ | -स्(:) | -तम् | -त |
| ३ | -अम् | -व | -म |

हे प्रत्यय बहुतेक अनद्यतनभूत ( लङ् ) च्या प्रत्ययाप्रमाणेंच आहेत. फक्त भेद इतकाच आहे की "अन्" प्रत्ययाच्या ठिकाणीं येथें "उस्" प्रत्यय आहे. याचीं रुपें हीं आहेत—

स्था (उभें राहणें)— १ अस्थात्, अस्थाताम्, अस्थुः। २ अस्थाः, अस्थातम्, अस्थात। ३ अस्थाम्, अस्थाव, अस्थाम।

दा ( देणें ) — १ अदात्, अदाताम्, अदुः। २ अदाः, अदातम्, अदात। अदाम्, अदाव, अदाम।

पा (पिणें) — १ अपात्, अपाताम्, अपुः। २ अपाः, अपातम्, अपात। ३ अपाम्, अपाव, अपाम।

(*धातूच्या शेवटीं आ नसेल, तर त्याला लङ्प्रमाणें "उस्" च्या ठिकाणीं* "अन्" प्रत्ययच लागतो. )

भू ( होणें )— १ अभूत्, अभूताम्, अभुवन्। २ अभूः, अभूतम्, अभूत। ३ अभूवम्, अभूव, अभूम।

या भूतकाळांत "भू" चा "भव्" असा बदल होत नाहीं व गुणही होत नाहीं, ही गोष्ट येथें वाचकाच्या नजरेस आलीच असेल. म्हणूनच "अभूत्"

असें रूप झालें. तेंच पूर्वी सांगितलेल्या लङ्चें रूप " अभवत् " असें होतें हाच लङ् व लुङ् याच्या प्रत्ययामध्यें भेद आहे

( १ )

परस्मैपदी प्रत्यय — १ ...त्, ...ताम्, ...न् ।
२ ...ः, ...तम्, ...त ।
३ ...म्, ...व, ...म ।

शक् ( समर्थ होणें )

१ अशकत्, अशकताम्, अशकन् । २ अशकः, अशकतम्, अशकत ।
३ अशकम्, अशकाव, अशकाम ।

वच् ( बोलणें )

१ अवोचत्, अवोचताम्, अवोचन् । २ अवोचः, अवोचतम्, अवोचत ।
३ अवोचम्, अवोचाव, अवोचाम ।

सिच् ( शिंपडणें )

१ असिचत्, असिचताम्, असिचन् । २ असिचः, असिचतम्, असिचत ।
३ असिचम्, असिचाव, असिचाम् ।

आत्मनेपदी प्रत्यय– १ ...त, ...इताम्, ...न्त ।
२ ...थाः, ...इथाम्, ...ध्वम् ।
३ ...इ, ...वहि, ...महि ।

लिप् ( लेपणें )

१ अलिपत, अलिपेताम्, अलिपन्त । २ अलिपथाः, अलिपेथाम्, अलिपध्वम् ।
३ अलिपे, अलिपीवहि, अलिपीमहि ।

याप्रमाणें निरनिराळ्या धातूंचीं रूपें होतात अशींच बाकीच्या धातूंचीं रूपेंही वाचकांना बनवितां येतील याशिवाय आणखीही कित्येक प्रकार आहेत; परन्तु ते सर्व नाहीं समजले तरी चालण्याजोगें आहे

## णिजन्त ( प्रयोजक ) क्रिया.

क्रियेचे दोन भेद आहेत एक स्वतः करावयाची क्रिया व दुसरी दुसऱ्याकडून करवावयाची क्रिया जसें— करणें व करविणें.

पहिली स्वतः करण्याची आहे व दुसरी दुसऱ्याकडून करवावयाची आहे पहिल्या प्रकारचीं रूपें आतापर्यंत दिलींच आहेत आतां दुसऱ्या प्रकारचीं धातूंची आहेत—

| धातु | अर्थ | णिजन्त ( प्रयोजक रूप ) |
|---|---|---|
| १ स्फुर्– | ( स्फुरण पावणें )— | स्फारयति, स्फारयते । |
| २ पा– | ( रक्षण करणें )— | पालयति, पालयते । |
| ३ दा– | ( देणें )— | दापयति ते । |
| ४ रुह्– | ( वाढणें )— | रोहयति-ते । |
| ५ दुष्– | ( दूषित करणें )— | दूषयति-ते । |
| ६ प्री– | ( प्रीति करणें )— | प्रीणयति-ते । |
| ७ व्यथ् | ( दुःखी होणें )— | व्यथयति ते । |
| ८ प्रथ्– | ( प्रसिद्ध करणें )— | प्रथयति-ते । |
| ९ नट्– | ( नाचणें )— | नटयति-ते । |
| १० ज्वल्– | ( जाळणें )— | ज्वलयति ते । |
| ११ चल्– | ( चालणें )— | चलयति ते । |
| १२ ध्वन्– | ( शब्द करणें )— | ध्वनयति त । |
| १३ क्रम्– | ( आक्रमण करणें )— | क्रमयति ते । |
| १४ नम् – | ( नमणें )— | नामयति, नमयति-ते । |
| १५ स्ना– | ( स्नान करणें )— | स्नापयति, स्नपयति-ते । |
| १६ कम्– | ( इच्छिणें )— | कामयति-ते । |
| १७ शम्– | ( शांत होणें )— | शामयति ते । |
| १८ यम्– | ( स्वाधीन करणें )— | यामयति-ते । |

■ प्रयोजक क्रियेचीं वर्तमानकाळाचीं रूपें आहेत यांचीं अन्य लकारांचीं रूपें पूर्वीच्या पाठांतून सांगितलेल्या रीतिप्रमाणेंच होतात. यांचे अर्थ असे होतात–

दा- ददाति ( देतो )
दापयति ( देवविती )
व्यथ्-व्यथते ( दुःखी होतो )
व्यथयति ( दुखवितो )
नट् - नटति ( नाचतो )
नाटयति ( नाचवितो )
चल्- चलति ( चालतो )
चलयति (चालवितो )
नम् - नमति ( नम्र हो
नमयति ( नमवितो )
स्ना - स्नाति ( स्नान करतो )
स्नापयति ( स्नान करवितो )

यांप्रमाणें यांचे अर्थ आहेत. ही प्रयोजक क्रिया फारच उपयोगी आहे.

श्लोकपाठः ।

एवं बहुविधैर्वाक्यैर्याच्यमानस्तया नृपः ।
नाऽभ्यद्रवच्छाल्वपतिः कन्यायां भरतर्षभ ॥२०॥
ततः सा मन्युनाऽऽविष्टा ज्येष्ठा काशिपते सुता ।
अब्रवीत्साश्रुनयना बाष्पविप्लुतया गिरा ॥ २१ ॥

' हे भरतर्षभ ! एवं तया बहुविधैः वाक्यैः याच्यमानः नृपः शाल्वपतिः तस्यां कन्यायां न अभ्यद्रवत् । ततः सा काशिपतेः ज्येष्ठा सुता मन्युना आविष्टा साश्रुनयना बाष्पविप्लुतया गिरा अब्रवीत् ॥

# पाठ १४

## सन्नन्त क्रिया

गम् = ( जाणें ) – गच्छति ( जातो )

जिगमिषति = ( जाऊं इच्छितो )

पठ् = ( वाचणें ) – पठति ( वाचतो )

पिपठिषति ( वाचूं इच्छितो )

ही सन्नन्त क्रियेचीं उदाहरणें होत. कांहीतरी करण्याची इच्छा असल्याचा भाव दर्शवावयाचा असतांना या क्रियेचा उपयोग करावयाचा असतो. या क्रियेमध्यें धातूचें प्रथम द्वित्व होतें व नंतर पुढें "स" प्रत्यय लागतो. जसें—

भू = भु भू = बुभू + स = बुभूष + ति = बुभूषति ( होण्याची इच्छा करतो )

१ भू ( होणें ) – बुभूषति ।
२ पठ् ( पठण करणें ) – पिपठिषति ।
३ मुष् ( चोरणें ) – मुमुषिषति ।
४ भिद् ( भेद करणें ) – बिभित्सति ।
५ हन् ( ठार मारणें ) – जिघांसति ।
६ गम् ( जाणें ) – जिगमिषति ।
७ लिख् ( लिहिणें ) – लिलिखिषति ।
८ ज्ञा ( जाणणें ) – जिज्ञासते ।
९ मान् ( शोधणें ) – मीमांसते ।
१० स्था ( उभें राहणें ) – तिष्ठासति ।
११ रक्ष् ( रक्षण करणें ) – रिरक्षिषति ।
१२ कृ ( करणें ) – चिकीर्षति ।
१३ लष् ( इच्छा करणें ) – लिलषिषति ।
१४ वद् ( बोलणें ) – विवदिषति ।

याच अर्थ कसकसे होतात, तें प्रथमच सांगितलें आहे. म्हणून तेंच येथें पुन्हां दुसऱ्यादा सांगण्याची आवश्यकता नाहीं

येथें क्रियापदाचा विचार संपला आता उपसर्गासह धातूंची रूपें बनवून त्यांचा वाक्यात उपयोग करण्याची रीत सांगावयाची आहे

## उपसर्ग आणि धातु.

उपसर्ग धातूच्या पूर्वी लागत असतो व उपसर्ग लागल्यानन्तर धातूचा अर्थही बदलत असतो. जसें—

**गम्** – ( जाणें ) गच्छति, अगच्छम्, गमिष्यति, जगाम ।

यालाच उपसर्ग जोडला असतां खालीं दिल्याप्रमाणें रूपें तयार होतात —

**१ प्रगच्छति, संगच्छति, उद्गच्छति, अनुगच्छति ।**

**प्र + अगच्छत्, सम् + अगच्छत्, उत् + अगच्छत्,**

**अनु + अगच्छत् ।**

**२ प्रागच्छत्, समगच्छत्, उदगच्छत्, अन्वगच्छत् ।**

**३ प्रगमिष्यति, संगमिष्यति, उद्गमिष्यति, अनुगमिष्यति ।**

**४ प्रजगाम, संजगाम, उज्जगाम, अनुजगाम ।**

प्रत्येक लकाराचें रूप बनविल्यानन्तर तें त्याच्या मागें लागणाऱ्या उपसर्गाच्या पुढें ठेवलें जातें अर्थात् " **संगम्** " धातूचें लङ्चें रूप " **समगच्छत्** " असें होतें, कारण " **गम्** " धातूचें लङ्चें रूप " **अगच्छत्** " असें आहे व त्याच्यापूर्वी " **सम्** " उपसर्ग ठेवला असतां " **सम् + अगच्छत् = समगच्छत्** " असें रूप तयार होतें याचप्रमाणें निरनिराळ्या धातूंची रूपें करण्याचा अभ्यास केला पाहिजे वाचकांना हा अभ्यास विशेष सोपा जावा, म्हणून पुढें आणखी कांहीं उदाहरणें देत आहें—

**१ गम्** ( जाणें ) १ अधि + गम् = ( प्राप्त करणें ) – अधिगच्छति, अध्यगच्छत्, अधिगमिष्यति ।

२ अनु+गम् = ( पाठीमागून चालणें ) – अनुगच्छति, अन्वगच्छत्, अनुगमिष्यति ।

३ अव+गम् = ( जाणणें ) – अवगच्छति, अवागच्छत्, अवगमिष्यति ।

४ आ +गम् = ( येणें ) – आगच्छति, आगच्छत्, आगमिष्यति ।

५ उप+गम् = ( जवळ जाणें ) – उपगच्छति, उपागच्छत्, उपगमिष्यति ।

६ नि+गम् = ( जाणणें ) – निगच्छति, न्यगच्छत्, निगमिष्यति ।

७ निर्गम् = ( बाहेर जाणें ) – निर्गच्छति, निरगच्छत्, निर्गमिष्यति ।

८ विगम् = ( निघून जाणें ) – विगच्छति, व्यगच्छत्, विगमिष्यति ।

९ संगम् = ( मिळणें ) – संगच्छति, समगच्छत्, संगमिष्यति ।

याप्रमाणें निरनिराळ्या धातूंना निरनिराळे उपसर्ग लावून अनेक प्रकारचे व अनेक अर्थांचे धातु बनवितां येतात. काहीं काहीं ठिकाणीं तर एकाहूनही अधिक उपसर्ग लागत असतात. आता आणखी काहीं धातूंचीं उदाहरणें पहा—

उपवस् = ( उपवास करणें ) – उपवसति, उपावसत्, उपवसिष्यति ।

निर्मुच् = ( सोडणें ) – निर्मुचति, निरमुचत्, निर्मोक्ष्यति ।

निर्या = ( जाणें ) – निर्याति, निरयात् निर्यास्यति ।

प्रदह् = ( जाळणें ) – प्रदहति, प्रादहत्, प्रधक्ष्यति ।

प्रदुष् = ( दोषयुक्त बनणें ) – प्रदुष्यति, प्रादुष्यत्, प्रदोक्ष्यति ।

विक्रम् = ( पराक्रम करणें ) – विक्रमति, व्यक्रामत्, विक्रमिष्यति ।

विगर्ह् = ( निंदा करणें ) – विगर्हति, व्यगर्हत्, विगर्हिष्यति ।

विचल् = ( हालणें ) – विचलति, व्यचलत्, विचलिष्यति ।

वितॄ = ( पार होणें, देणें ) – वितरति, व्यतरत् वितरिष्यति ।

संभू = ( जन्म घेणें ) – संभवति, समभवत्, संभविष्यति ।

संभाष् = ( संभाषण करणें ) – संभाषते, समभाषत, संभाषिष्यते ।

उपसर्ग लागून धातूंचीं जीं निरनिराळीं रूपें होतात, तीं वाचकांनीं याप्रमाणें समजून घेण्याचा प्रयत्न करावा. याचा उपयोग संस्कृत भाषेमध्यें शेंकडों वेळां होतो. म्हणून उपसर्गपूर्वक येणाऱ्या धातूंच्या रूपांचें महत्त्व वाचकांना सहज समजेल याच्या उदाहरणाकरितां म्हणून पुढील श्लोक पहा–

आत्मवीर्यं समाश्रित्य भृत्यवीर्यं च कौरव ।
आह्वयस्व रणे पार्थान्सर्वथा क्षत्रियो भव ॥५४॥
परवीर्यं समाश्रित्य यः समाह्वयते परान् ।
अशक्तः स्वयमादातुमेतदेव नपुंसकम् ॥५५॥
(म. भा. उद्योग अ. १६२)

" आपल्या वीर्याचा व नोकरांच्या पराक्रमाचा आश्रय करून, हे कौरव ! युद्धामध्यें ( पार्थान् ) पांडवांना आह्वान कर. सर्व तऱ्हेनें क्षत्रिय हो. दुसऱ्याच्या बळाचा आश्रय करून जो शत्रूंना युद्धाकरितां आह्वान करतो व स्वतः युद्धाची जबाबदारी पार पाडण्यास अशक्त असतो, तो नपुंसक होय. "

या श्लोकामध्यें—

समाश्रित्य – ( सम् + आ + श्रि )
आह्वयस्व – ( आ + ह्वे )
समाह्वयते – ( सं + आ + ह्वे )
आदातुं – ( आ + दा )

हीं सर्व रूपें उपसर्गपूर्वक धातूंचीं आहेत. वाचकांनीं याप्रमाणें रूपें समजून घेण्याचा अभ्यास करावा

—•—

# पाठ १५

## धातुसाधित रूपें.

धातुला प्रत्यय लावून कांहीं आवश्यक रूपें बनवितां येतात. त्यांचा नेहेमीं उपयोग होतो. म्हणून या धड्यांत आतां अशा प्रत्ययांचा विचार करावयाचा आहे—

### 'तुम्' प्रत्यय.

क्रियेच्या "करण्याकारितां" या अर्थी या प्रत्ययाचा उपयोग करावयाचा असतो—

कृ (करणें) – कर्तुम् = (करण्याकारितां)
गम् (जाणें) – गन्तुम् = (जाण्याकारितां)
लिख् (लिहिणें) – लेखितुम् = (लिहिण्याकारितां)
सेव् (सेवा करणें) – सेवितुम् = (सेवा करण्याकारितां)

हीं रूपें संस्कृत भाषेमध्यें नेहेमीं येत असतात व हीं रूपें बनविणें थोडें सोपें आहे; म्हणून कांहीं रूपें येथें देत आहे—

अंक् (चिन्ह करणें) – अंकयितुम्।
अट् (जाणें) – अटितुम्।
अद् (खाणें) – अत्तुम्।
अन् (जीवन धारण करणें) – अनितुम्।
अर्च् (पूजा करणें) – अर्चितुम्। (१ प्रथम गण)
अर्चयितुम् (१० म गण)
अर्थ् (मागणें) – अर्थयितुम्।
अव् (रक्षण करणें) – अवितुम्।

आप् (व्यापणें) – आप्तुम्।
कथ् (सांगणें) – कथयितुम्।
कम्प् (हालणें) – कम्पितुम्।
कृप् (हालणें, चालणें) – कर्तुम्, कल्तुम्।
क्रम् (चालणें) – क्रमितुम्।
गण् (मोजणें) – गणयितुम्।
छिद् (कापणें) – छेत्तुम्।
जि (जिंकणें) – जेतुम्।
तड् (मारणें) ताडयितुम्।
अश् (भोजन करणें) – अशितुम्।

याप्रमाणें निरनिराळ्या धातूंपासून " तुम् " प्रत्ययान्त धातुसाधित रूपें बनतात. वाचकांना आतां हीं ओळखतां येतीलच.

## ' त्वा ' प्रत्यय.

...करून, या अर्थी संस्कृत धातूंना " त्वा " प्रत्यय लाऊन रूपें बनवितां येतात. जसें—

गम् – गत्वा = ( जाऊन )
पा – पीत्वा = ( पिऊन )
भुज् – भुक्त्वा = ( भोजन करून )
नम् – नत्वा = ( नमन करून )
तृष् – तृषित्वा = ( तृषित होऊन )

याप्रमाणें हा " त्वा " प्रत्यय लावून अशीं रूपें बनवितां येतात. याचाहुद्धां संस्कृत भाषेंत फारच उपयोग होतो. आतां याचीं कांहीं उदाहरणें पहा—

त्रुट् ( तुटणें ) त्रुटित्वा।
त्वर् ( त्वरा करणें ) त्वरित्वा।
दण्ड् ( दंड देणें ) दंडयित्वा।
दम् ( दमन करणें ) दमित्वा।
दंश् ( दंश करणें ) दष्ट्वा।
दा ( देणें ) दत्त्वा।
दुह् ( दूध काढणें ) दुग्ध्वा।
द्विष् ( द्वेष करणें ) द्विष्ट्वा।
धाव् ( धावणें ) धावित्वा।
धा ( धारण करणें ) हित्वा।
धु ( हालणें ) धुत्वा।

धृ ( धारण करणें ) धृत्वा।
नट् ( नाचणें ) नटित्वा।
नश् ( नाश होणें ) नशित्वा,
नष्ट्वा।
निंद् ( निंदा करणें ) निंदित्वा।
नृत् ( नाचणें ) नर्तित्वा।
पच् ( शिजवणें ) पक्त्वा।
पठ ( पठण करणें ) पठित्वा।
पा ( रक्षण करणें ) पात्वा।
पुष् ( पुष्ट करणें ) पुष्ट्वा।
पूज् ( पूज्य करणें ) पूजयित्वा।

धातूला " त्वा " प्रत्यय लावून अशीं अनेक निरनिराळीं रूपें बनवितां येतात.

---

# पाठ १६

## ' य ' प्रत्यय.

धातूच्या पूर्वी उपसर्ग असेल, तर "त्वा" प्रत्ययाच्या ऐवजीं "य" प्रत्यय लागतो. "त्वा" चा जो अर्थ होतो, तोच या "य" चाही होतो. माची उदाहरणें पहा—

अधि-ई- अधीत्य = ( अध्ययन करून )
नि-यम्- नियम्य = ( नियमन करून )
प्र-णम् - प्रणम्य = ( नमन करून )
वि-तन्- वितत्य = ( पसरून )
आ-दा- आदाय = ( आणून )
वि-धा- विधाय = ( बनवून )
प्र-हा- प्रहाय = ( सोडून )
आ-क्रम्- आक्रम्य = ( आक्रमण करून )
सं-आ-भाष्-समाभाष्य- = ( संभाषण करून )
सं-चि - संचित्य = ( गोळा करून )
सं-चिन्त्- संचिन्त्य = ( विचार करून )
प्र जल्प्- प्रजल्प्य = ( बोलून )
वि-जि- विजित्य = ( जिंकून )
वि-ज्ञा- विज्ञाय = ( जाणून )

उपसर्गपूर्वक धातूंचीं "य" प्रत्यय लागलेलीं रूपें याप्रमाणें होत असतात. याचे प्रयोगसुद्धा संस्कृत भाषेत ठिकठिकाणीं येतात; म्हणून वाचकांनीं याचा नीट लक्षपूर्वक अभ्यास करावा.

## कृत्य प्रक्रिया.

"तव्य" आणि "अनीय" हे दोन प्रत्यय धातूंना लागतात आणि "योग्य" हा अर्थ व्यक्त करतात. जसें–

कृ– कर्तव्यं, करणीयम् ( करण्यास योग्य )
भिद्– भेत्तव्यम्, भेदनीयम् ( भेदन करण्यास योग्य )
पच्– पक्तव्यम्, पचनीयं ( शिजविण्यास योग्य )
निंद्– निंदितव्यं, निंदनीयं ( निंदा करण्यास योग्य )
कथ्– कथयितव्यं, कथनीयं ( सांगण्यास योग्य )
चि– चेतव्यं, चयनीयं ( गोळा करण्यास योग्य )
मृज्– मार्ष्टव्यं, मार्जनीयं ( शुद्ध करण्यास योग्य )

धातूच्या शेवटी स्वर असेल, तर त्या धातूला "य" हा प्रत्यय याच अर्थी लागत असतो.

जि – जेयं ( जिंकण्यास योग्य )
चि – चेयं ( एके ठिकाणीं करण्यास योग्य )
दा – देय ( देण्यास योग्य )
धा – धेयं ( धारण करण्यास योग्य )
गै – गेयं ( गाण्यास योग्य )

कांहीं व्यंजनांत धातूंनाही "य" प्रत्यय लागतो. जसें—

जन् – जन्यं ( जन्म देण्यास योग्य
आलभ् – आलभ्यं ( प्राप्त करण्यास योग्य )
चर् – चर्यं ( आचरण्यास योग्य )
नियम् – नियम्यं ( नियमात राखण्यास योग्य )

याप्रमाणें हे सर्व प्रत्यय लावून धातूंचीं अनेक निरनिराळीं रूपें निरनिराळ्या अर्थी बनवितां येतात.

---

# पाठ १७

## रामायणम् ।

अथ ब्रुवाणे सुग्रीवे लक्ष्मणः प्रहसन्निदमब्रवीत्- "कस्मिन् कर्मणि कृते सति वालिनो वधं मस्याः ?"

सुग्रीव उवाच— "इमान् सप्त तालवृक्षान् पुरा वाली बिभेद । एवं यः कर्तुं शक्नोति स एव वालिनो वधं कर्तुं समर्थो भविष्यति ।"

एतत्सुग्रीवस्य भाषणं श्रुत्वा महातेजा रामस्तस्य प्रत्ययार्थमेकमेव शरं चिक्षेप । स शरः सप्ततालान् भित्त्वा भूमिं प्रविवेश । रामस्य शरवेगेन सुग्रीवः परं विस्मयं गतः कृताञ्जली राममुवाच- "पुरुषर्षभ ! समरे सर्वानपि सुरान्हन्तुं त्वं समर्थोऽसि किं पुनर्वालिनम् ? येन त्वया सप्त ताल-वृक्षा गिरिर्भूमिश्च एकेनैव बाणेन विदारितास्तेन त्वया सह को रणे स्थाता ? अतस्त्वं वालिनं जहीति ।"

ततः सुग्रीवं रामः प्रत्युवाच- "गच्छावेदानीं किष्किन्धाम् । अग्रतो गत्वा वालिनं युद्धायाऽऽह्वय" इति ।

ते सर्वे ततो वालिनः पुरीं किष्किन्धां गत्वा वृक्षैरावृत्यातिष्ठन् । सुग्रीवोऽपि वालिन आह्वानकारणात् घोरमनदत् । भ्रातुराह्वानं श्रुत्वा वाली गृहान्निर्जगाम । ततो वालिसुग्रीवयोस्तुमुलं युद्धमभूत् । रामोऽन्तकरं शरं मोक्तुं बुद्धिं न कृतवान् । भग्नस्तदा वालिना सुग्रीवोऽपश्यंश्च रामं प्रदुद्रुवे पर्वतमृष्यमूकम् । "शापभयान्मुक्तोऽसि" इति वाली समुक्त्वा स्वगृहं निवृत्तः । रामस्तु तदेव वनं जगाम यत्र सुग्रीवो गतः ।

रामं दृष्ट्वा सुग्रीवोऽब्रवीत् किमिदानीं त्वया कथं वैरिणा मां घातयि-त्वा पादौ च तमाह्वयस्वेत्युक्त्वा विक्रमं च दर्शयित्वा ? इति ।

रामोऽपि तं सान्त्वयित्वा पुनरब्रवीत्- "त्वं च वाली चवाभ्या, वर्णेन स्वरेणापि सदृशौ। अतो नावगच्छं कः क इति। अत एव नोत्सृष्टो मया शरः। मित्रस्यैव विघातो भ्रमान्मा भूदिति। दत्ताभयस्य मित्रस्य विनाशं तु महत्पातकम्। भवांस्तु वने कारणमस्माकं सर्वेषाम्। तस्मात्पुनर्युध्यस्व मा भैषीः। एतेनैवेषुणा वालिनमद्य मृतं पश्य। स्वमात्मनोऽभिज्ञानार्थं किंचिच्चिह्नं कुरु। लक्ष्मण! नय सुग्रीवस्य कण्ठे पुष्पमालां स्थापय।" इति।

लक्ष्मणेन धारितया मालया स सुग्रीवोऽतीव शुशुभे। पुनश्च गत्वा किष्किन्धां वालिनमतिघोरस्वरेणाह्वयत्। तच्छब्दं श्रुत्वा वाली वेगेन रोषाद्गुहाया निष्पपात। सुग्रीवं च दृष्ट्वाऽब्रवीत् "एष मम बद्धो मुष्टिस्तव प्राणनाशाय एव पास्यति।" इति।

तेन वालिना रोषाद्धत ताडितः सुग्रीवो रुधिरं वमन् किंचिन्मूर्च्छित इवाभवत्। सोऽपि सत्वरं संज्ञां प्राप्य सालवृक्षमुत्पाट्य वालिनं सकोपं ताडितवान्। शोणिताक्तौ तौ परस्परं तर्जयन्तौ अयुध्येताम्। रामस्ततो धनुः संधाय एकेनैव शरेण वालिनं गतसत्त्वं विचेतनं अकरोत्।

तं मूर्च्छितं गतसत्त्वं दृष्ट्वा महावीर्यौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ बहुमान्य वीरं सुग्रीवमुपयातौ। वाली तु रामं दृष्ट्वा परुषमब्रवीत्। "मम पराङ्मुखवधं कृत्वा त्वया किं यशः प्राप्तम्? रामः कुलीनस्तेजस्वी दृढव्रतश्चेति सर्वे कथयन्ति। परंतु पापाचारमेवाहं त्वां पश्यामि। अहं तु तव विषये पुरे वा न करोमि किंचिदपि पापम्। नापि त्वामवजाने। कस्मात्त्वमकिल्बिषं मां हंसि? त्वया तु धर्मं त्यक्त्वैवाऽहं रणे निहतः। किमर्थमेवमधर्माचरणं भवताऽऽश्रितम्?"



१८

ॐ




# संस्कृत-स्वयं-शिक्षक.

(संस्कृत भाषेचें अध्ययन करण्याचा सोपा उपाय)

## भाग १८ वा.

लेखक
श्रीपाद दामोदर सातवळेकर,
स्वाध्याय-मंडळ, किल्ला-पारडी, (जि० सूरत.)

तृतीय आवृत्ति

संवत् २००९, शके १८७४, सन १९५२.

मूल्य आठ आणे



# संस्कृत-स्वयं-शिक्षक

## भाग अठरावा.

### पाठ १

धातूंना निरनिराळ्या प्रकारचे प्रत्यय लावून संस्कृतभाषेंत अनेक प्रकारचे शब्द बनविता येतात. हे शब्द बनविण्याची रीति आतां सांगावयाची आहे. यापूर्वीच्या भागांतून धातूंपासून शब्द बनविण्याचे कांहीं प्रत्यय सांगितलेच आहेत. त्याचाच सविस्तर उल्लेख या ठिकाणीं करावयाचा आहे.

**१ तव्य**

संस्कृत भाषेंत "तव्य" प्रत्यय फारच उपयोगी आहे. हा प्रत्यय धातूला लाऊन फारच सोप्या पद्धतीनें निरनिराळे व अतिशय उपयोगी असे शब्द बनविता येतात. उदाहरणार्थ—"गम्" धातूला "तव्य" प्रत्यय लावून "गंतव्य" असें रूप सहज बनविता येतें. त्याचप्रमाणें "कृ" धातूपासून "कर्तव्य" असें रूप बनतें. याप्रमाणें निरनिराळ्या धातूंपासून असे तव्यान्त अनेक शब्द बनविता येतात. आतां या शब्दांचा उपयोग कसकसा व कोठे केला जातो, ते पहा—

मया गन्तव्यम् = मला गेलें पाहिजे
मया कर्म कर्तव्यम् = मला काम केलें पाहिजे
मया पुस्तकं पठितव्यं = मला पुस्तक वाचलें पाहिजे
त्वया इदानीं न क्रीडितव्यं = तूं आतां खेळूं नये

याप्रमाणें या शब्दांचा वाक्यांत उपयोग करण्याची ही एक रीत झाली दुसरी रीत म्हणजे हे शब्द विशेषण रूपानें वाक्यांत आले तर त्यांचे लिंग, वचन, विभक्ति, विशेष्याच्या लिंग, वचन, विभक्तीप्रमाणेंच होते. जसें–

एषा शाला त्वया रक्षितव्या = या शाळेचें तुझ्याकडून रक्षण होणें योग्य आहे.

एष प्रासादस्त्वया रक्षितव्यः = या राजमहालाचें तुझ्याकडून रक्षण होणें योग्य आहे.

एतत्क्षेत्रं त्वया रक्षितव्यम् = या शेताचें तुझ्याकडून रक्षण होणें योग्य आहे.

या तिन्ही वाक्यांतून " रक्षितव्य " हा एकच शब्द आहे; परंतु प्रत्येक वाक्यांत तो विशेष्याप्रमाणें कसकसा बदलला आहे. तें वाचकांनीं नीट पहावें. अशा वाक्यांत " अस्ति " क्रिया अध्याहृत धरूनच प्रायः अर्थ केला जातो. जसें–

एतत्पुस्तकं त्वया तत्र रक्षितव्यं अस्ति ।
एतत्पुस्तकं त्वया तत्र रक्षितव्यम् ० ।

या दोन्ही वाक्यांचें तात्पर्य वास्तविक एकच आहे क्रियापदाचें रूप घालून वाक्य बनविणें ज्यावेळीं अवघड वाटतें, तेव्हां या " तव्य " च्या रूपांनी वाक्य चटदिशीं बनवितां येतें हा संस्कृत भाषेचा विशेष सोपेपणा आहे.

शब्द ।

स्पर्धितव्य = स्पर्धा करण्यास योग्य
वेदितव्यं = जाणण्यास योग्य
मोदितव्यं = आनंद करण्यास योग्य
खादितव्यं = खाण्यास योग्य
भर्जितव्यं = भाजण्यास योग्य

अर्चितव्यं = पूजा करण्यास योग्य
वाञ्छितव्यं = इच्छा करण्यास योग्य
वेष्टितव्यं = वेष्टन करण्यास योग्य
चेष्टितव्यं = काम करण्यास योग्य
जल्पितव्यं = बोलण्यास योग्य
भाषितव्यं = बोलण्यास योग्य
ज्ञातव्यं = जाणण्यास योग्य
दातव्यं = देण्यास योग्य
हन्तव्यं = ठार मारण्यास योग्य
वस्तव्यं = राहण्यास योग्य
वक्तव्यं = बोलण्यास योग्य

याप्रमाणें निरनिराळ्या धातूंपासून हे असे शब्द बनविता येतील आतापर्यंत आलेल्या सर्व धातूंचे वाचकानीं याप्रमाणें शब्द बनवावेत व वाक्यात जेथें जेथें अशा प्रकारची रूपें येतील तेथें तेथें तीं रूपें ओळखण्याचाही प्रयत्न करावा.

## संस्कृत वाक्य.

तेन वीरेण किमर्थं तेन सह न स्पर्धितव्यम् ? बालकैः एतदन्नं इदानीमेव खादितव्यम्। मम भृत्येन सर्वेऽपि चणकाः अद्यैव भर्जितव्याः। ईश्वरस्त्वया नित्यशोऽर्चनीयः। बालकैर्बालिकाभिश्च शोभनानि पुस्तकानि नित्यशः पठितव्यानि। सर्वैर्मनुष्यैः सायं समये क्रीडाङ्गणे गत्वाऽवश्यं क्रीडितव्यम्। वीरैः पुरुषैः स्त्रीणां रक्षा कर्तव्या। इदानीं एष ग्रामो वीरैः रक्षितव्यः। त्वया पूर्वं सर्वं ज्ञातव्यं पश्चात् स्वकर्तव्यं कर्तव्यम्।

वाचकानीं अशा तऱ्हेनें नेहेमीं वाक्यें स्वतःच तयार करण्याचा अभ्यास ठेवावा. या " तव्य " प्रत्ययाच्या शब्दांनीं दाखविल्या जाणाऱ्या क्रियार्थाला कर्ता तृतीया विभक्तिचा असावा लागतो असें—

**मया वक्तव्यं । रामेण शत्रुर्हन्तव्यः । व्याघ्रेण पुरुषः न हन्तव्यः । अग्निना सर्वं वनं दग्धव्यम् ।**

या प्रमाणें सहज बोलतां सवरतांना सुद्धां अशा तऱ्हेच्या वाक्यांचा उपयोग करतां येईल.

## ( २ ) अनीय.

"**तव्य**" प्रत्यय लाऊन धातूपासून तयार केलेल्या शब्दाचा जो अर्थ होतो, तोच अर्थ धातूला "**अनीय**" प्रत्यय लाऊन तयार झालेल्या शब्दानें व्यक्त होत असतो. "**कृ**" धातूचें "**करणीय**" व "**गम्**" धातूचें "**गमनीय**" अशीं रूपें होतात. हीं प्रत्यय लाऊन धातूचीं रूपें कशीं होतात तें आतां पहा—

**करणीयं** = करण्यास योग्य
**स्मरणीयं** = स्मरण करण्यास योग्य
**भरणीयं** = भरण पोषण करण्यास योग्य
**प्रथनीयं** = प्रख्यात होण्यास योग्य
**त्वरणीयं** = त्वरा करण्यास योग्य
**वर्धनीयं** = वाढण्यास योग्य
**रोचनीयं** = आवडण्यास योग्य
**शोभनीयं** = शोभण्यास योग्य
**बोधनीयं** = जाणण्यास योग्य
**ज्वलनीयं** = जाळण्यास योग्य
**स्पृहणीयं** = इच्छा करण्यास योग्य

बाकीच्या धातूंचीं रूपेंही याप्रमाणेंच वाचकांनीं सहज बनवितां येतील. या शब्दांचा उपयोगही वाक्यांत पूर्वीप्रमाणेंच करावयाचा आहे—

## संस्कृत वाक्य ।

त्वया सर्वं कर्म इदानीमेव करणीयम् । यन्मया वर्धनीयं अस्ति तदहं वर्धयामि । यत्त्वया संवर्धनीयं भवेत्तत्त्वं संवर्धय । त्वया पुष्पमालाभिः शोभनीय एव मंडपः । अग्निना त्वया ज्वलनीयमेतत्पत्रम् । त्वया भरणीय एव घटः । तेन करणीय एव यत्नः ।

याप्रमाणें बाकीच्या धातूंना " अनीय " प्रत्यय लावून झालेल्या शब्दांचा उपयोग वाक्यांत वाचकांनीं करावा.

---

# पाठ २

## रामायण ।

रामस्तु वालिनमब्रवीत् " धर्मं अर्थं कामं चापि लौकिकव्यवहारमविज्ञाय बालवदिव कथं विगर्हसे ? इक्ष्वाकूणां राज्ञां पालितेयं भूमिः भरतभूमिरिति कथ्यते । वयं चात्र धर्मस्य रक्षितारः । तथा चान्येऽपि यादवः पार्थिवाः सन्त्येव । वयं धर्मरक्षणार्थमेवात्र संचरामः । धर्मस्य रक्षणं, सज्जनानां पालनं, दुष्टानां निर्दलनं चास्माकं कर्म । त्वं तु धर्ममार्गे न स्थितः । सनातनं धर्मं त्यक्त्वा भ्रातुर्भार्यायां पापमाचरसि । यस्तु भगिनीमौरसीं भार्यां वाऽनुजस्य कामात्प्रचरेत् स नरो वध्य इति सद्भिः कथितो धर्मः । अतएव त्वं मया हतः। पापस्य नरस्याऽशासनाद्राजा किल्बिषमाप्नोति, तस्य शासनादेव राजा श्रेयः प्राप्नोति । अतस्त्वं पापाचारो वधाय एव योग्यः मया हतः ।

एतद्रामवचनं श्रुत्वा धर्मेऽधिगतनिश्चयो वाली रामचंद्रे दोषं न दध्यौ, उवाच च तं " यत्त्वं आत्थ तत्तथैव, न संशयः । न चात्मानं शोचे, न च भार्यां, नापि बांधवान्, तथा तु पुत्रं गुणज्येष्ठमंगदं शोचे । विधत्स्व सुग्रीवेऽ-

अङ्गदे च उत्तमां मतिम् । त्वमेवाऽसि गोप्ता शास्ता च । इति । " एवमुक्त्वा मुमोह जीवितान्तं जगाम च ।

वालिनो भार्या तु तारा तच्छ्रुत्वोद्विग्ना भूत्वा तत्राऽगमत् । पतिं पंचत्वं गतं दृष्ट्वा विललाप च । तारां दीनां तथा क्रोशन्तीं दृष्ट्वाऽङ्गदं च विलपन्तमवलोक्य सुग्रीवोऽपि विषादमगमत् । पतिमुखं समुपजिघ्रन्ती तारा तत्र बहु विललाप आह च–

" किं मही मत्तोऽपि प्रियतरा तव ? यतस्त्वं भूमिं परिष्वज्य शेषे ? नापि मां प्रतिभाषसे ? विपश्चिता शूराय खलु कन्या न प्रदातव्या " इति ।

समानशोकः काकुत्स्थो रामस्तां सान्त्वयन्नाह–" मृतः पुरुषः शोकपरितापेन न श्रेयसा युज्यते । अतो अनंतरं कार्यं कर्तुं त्वमर्हसि । अलं शोकेन । नियतिः श्रेष्ठा, तस्मात्तत्कालं कर्म उपास्यताम् ।" इति ।

तत सह सुग्रीवेणाङ्गदो रुदन् विधिवत् पितरं अग्निं ददौ चकार च दीर्घाध्याने प्रस्थिते पितरमपसव्यं प्रदक्षिणं सह रामेण । ततो हनुमानब्रवीत्–"भवत्प्रसादात्, काकुत्स्थ ! पितृपैतामहं राज्यं दुष्प्राप्यमपि सुग्रीवेण प्राप्तम् । अत इदानीं त्वया समनुज्ञातः सुग्रीवो भवता सह नगरं प्रवेक्ष्यति । इति । "

तच्छ्रुत्वा राम उवाच " हे हनूमन् ! अहं तु पितुर्निर्देशमनुसरन् चतुर्दशवर्षपर्यंतं ग्रामं वा नगरं वा न प्रवेक्ष्यामि । सुग्रीवश्च राज्ये अभिषिच्यतां, अंगदश्च यौवराज्येऽभिषिक्तो भवतु विधिवत् । इति "

रामेणैवं समनुज्ञात सुग्रीवो रम्यां किष्किंधां पुरीं प्रविवेश । साधु इति ब्रुवत्सु वानरेषु यौवराज्येऽङ्गदं चाभ्यषेचयत् ।

माल्यवतः पर्वतस्य पृष्ठे वसन् राम एकदा लक्ष्मणमब्रवीत् ।"पश्याऽयं जलसमागमे वर्षाकालः संप्राप्तः । मेघपटलैरम्बरमाच्छादितम् । नीलमेघाऽश्रिता विद्युत् स्फुरति । "

" पर्जन्यजलधाराभिरभिषिच्यमानाः पर्वताः नवयौवनेनैवाधिकतरं विभान्ति ।

अस्मिन्भाद्रपदे मासे अंग्ररतानां ब्राह्मणानां अध्ययनकालोऽयमुपस्थितः ।, इति "

तत उर्ध्वं शारदीं रजनीं ज्योत्स्नामयीं दृष्ट्वा सुग्रीवं च काममत्तं दृष्ट्वा रामः परममातुरो भूत्वा मुमोह। सीतां अनुचिंतयंश्च कृशेन वदनेन लक्ष्मणमुवाच "अधुना मेघाः प्रांतवेगाः। वार्षिकाश्चत्वारो मासाः वर्षशतोपमाः सीतामपश्यतो मम गताः। हे लक्ष्मण! सुग्रीवः कृपां न कुरुते। त्वं किष्किन्धां प्रविश्य ग्राम्यमुखे सक्तं मूर्खं सुग्रीवं ब्रूहि। वीरः सत्यपरः एव भवति। हे सुग्रीव! त्वं समये तिष्ठ। मा वालिनः मार्गेण गच्छ। इति।"

एवं समादिष्टो लक्ष्मणो रम्यां किष्किन्धां नगरीं प्रविवेश। नानापुष्पफलशोभितां च तां नगरीं ददर्श। अवार्यमाणश्च लक्ष्मणः प्रविवेश रम्यं सुग्रीवस्य गृहम्। तस्यान्तःपुरे बहुभिः स्त्रीभिः सततं प्रवर्तमानं संगीतं निशम्योद्विग्न इवाभवत्। स्थित्वा च तत्र किंचित्कालं ज्याशब्दं कृतवान्। तज्ज्याशब्दं श्रुत्वा आगतं लक्ष्मणं ज्ञात्वा, तं क्रोधयुक्तं च दृष्ट्वा स तारामुवाच "किं नु क्रोधकारणम् यदप्रकृत्या मृदुरपि लक्ष्मण इदानीं सरोष इव दृश्यते! अतस्त्वमेव अग्रे गत्वा तं प्रसादयेति।"

तथेत्युक्त्वा तारा सलज्जा इव लक्ष्मणसंनिधानं जगाम। स्त्रीसान्निकर्षाद्वा-सुखो निवृत्तक्रोधश्चाभूल्लक्ष्मणः। साऽपि तं प्रार्थयामास- "किमर्थं क्रोधः? को न तिष्ठति भवन्निदेशे? वानरवंशनाथस्य प्रमादमपि सोढुमर्हसि। महाबाहो लक्ष्मण! आगच्छ अंतः, क्षमस्व सुग्रीवमिति।" ततोऽरिंदमो लक्ष्मणोऽभ्यंतरं प्रविवेश।

सुग्रीवोऽपि तत्र लक्ष्मणं दृष्ट्वा व्यथितेन्द्रियो बभूव। रुमाद्वितीयं नारीमध्यगतं सुग्रीवं लक्ष्मणोऽब्रवीत् "राजा कृतज्ञः सत्यवादी च लोके महीयते। कृतार्थेन त्वया सीताया मार्गणयत्नो विधेयः। तस्मिन्विषये त्वं किमपि कर्म न करोषि। तत्किं तेनैव वालिनो मार्गेणैव गन्तुमिच्छसि? न स संकुचितो मार्गः येन वाली हतो मृतश्च। अतः सुग्रीव! समये तिष्ठ, मा वालिपथमन्वगाः। इति"

तच्छ्रुत्वा सुग्रीवो विमद आसीत् । उवाच च लक्ष्मणम् " सर्वमेव मयेद ऐश्वर्यं रामप्रसादादेव प्राप्तम् । स एव स्वेनैव तेजसा रावणं वधिष्यति सीतां च प्राप्स्यति । तस्यानुयात्रां अयमहं करिष्यामि । इति । "

लक्ष्मणोऽपि प्रीत्योवाच " त्वया सनाथेन सनाथो मे भ्राता । क्षमस्व मे परुषोक्तिम् । इति "

सुग्रीवोऽपि पार्श्वस्थं हनूमन्तमब्रवीत् । क्षिप्रं तांस्तान् वानरानानय, आनुयात्रिकं कल्पय च । श्रुत्वा तद्वचनं वायुपुत्रो हनूमान् वानरान् सर्वासु दिक्षु प्रेषयामास । वानरराजस्याज्ञां श्रुत्वा सर्वे वानरा आययुः । तेषां वानराणां महती सेना बभूव । तया सेनया सह सुग्रीवो राघवं आगत्यास्य पादयोः पपात । तं पादयोः पतितं बहुमानादुत्थाप्य राघवः सुग्रीवं परिषस्वजे ।

## शब्दार्थ

| | |
|---|---|
| लौकिकव्यवहारः = लौकिकशील व्यवहार | परमातुरः = अतिदुःखी |
| बाल्यं = बालपण | अवार्यमाणः = ज्याला प्रतिबंध झालेला नाहीं असा— |
| विगर्ह् = निंदा करणें | प्रत्ययसुखं = हीन सुख |
| संचर् = भटकणें | अवाङ्मुख = खालीं मुख केलेला |
| निर्दलनं = नाश | सोढुं = सहन करण्यास योग्य |
| औरसी = औरस | मार्गण = शोधणें, |
| किल्बिषं = पाप | विमदः = ज्याला गर्व नाहीं असा |
| पंचत्वं गतः = मृत | पार्श्वस्थ = मागें उभा असलेला |
| विपश्चित् = ज्ञानी | निर्देश = आज्ञा |
| नियति = दैव | उद्विग्न = खिन्न |

## समास ।

१ लौकिकव्यवहारः = लौकिकश्चासौ व्यवहारश्च ।
२ धर्मरक्षणार्थं = धर्मस्य रक्षणं धर्मरक्षणं तदर्थं ।
३ पापाचारः = पापं आचरतीति ।

युद्धाय समुपागतान् शूरान् च ॥३॥ तव तनय सर्वान् हर्षयन् काले इदं वचन प्राह—

नानाशस्त्रप्रहरणा सर्वे युद्धविशारदा ॥ ४ ॥
एकैकशः समर्था हि यूय सर्वे महारथाः ।
पाण्डुपुत्रान्रणे हन्तु ससैन्यान्किमु संहता ॥ ५ ॥
अपर्याप्त तदस्माकं बल भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तमिदमेतेषां बल भीमाभिरक्षितम् ॥ ६ ॥
सस्थाना शूरसेनाश्च वैत्रिका कुकुरास्तथा ।
आरोचका विगर्ताश्च मद्रका यवनास्तथा ॥ ७ ॥
शत्रुंजयेन सहितास्तथा दुःशासनेन च ।
विकर्णेन च वीरेण तथा नन्दोपनन्दकैः ॥ ८ ॥
चित्रसेनेन सहिता सहिताः पारिभद्रकैः ।
भीष्ममेवाऽभिरक्षन्तु सहसैन्यपुरस्कृता ॥ ९ ॥

" यूय सर्वेऽपि महारथा नानाशस्त्रप्रहरणा नानाशस्त्रप्रहारिण सर्वेऽपि युद्धविशारदा ससैन्यान् पाण्डुपुत्रान् हन्तुमेकैकशः समर्था हि, किमु संहता- एकीभूता ॥ ४–५ ॥ भीष्माभिरक्षित अस्माकं बल अपर्याप्त वै व्याप्तु मशक्यम् । भीमाभिरक्षित एतेषां इदं बल सैन्य तु पर्याप्त परित सर्वत व्याप्तुं शक्यम् ॥ ६ ॥ संस्थाना , शूरसेनाश्च वैत्रिका कुकुराः तथा शत्रुंजयेन तथा दुःशासनेन सहिता सर्व वीरा , वीरेण विकर्णेन तथा नन्दोपनन्दकैश्च सहिता , चित्रसेनेन सहिता , पारिभद्रकैर्वीरै सहिताश्च सहसैन्यपुरस्कृता सर्वे वीरा भीष्ममेव अभिरक्षन्तु ॥ ७ ९ ॥

ततो भीष्मश्च द्रोणश्च तव पुत्राश्च मारिष ।
अव्यूहन्त महाव्यूह पाण्डूना प्रतिबाधकम् ॥ १० ॥
भीष्म सैन्येन महता समन्तात्परिवारित ।
ययौ प्रवर्षन्महतीं वाहिनीं सुरराडिव ॥ ११ ॥
तमन्वयान्महेष्वासो भारद्वाज प्रतापवान् ।
कुन्तलैश्च दशार्णैश्च मागधैश्च विशांपते ॥ १२ ॥

विदर्भैर्मेकलैश्चैव कर्णप्रावरणैरपि ।
सहिताः सर्वसैन्येन भीष्ममाहवशोभिनम् ॥ १३ ॥
गान्धाराः सिंधुसौवीराः शिबयोऽथ वसातयः ।
शकुनिश्च स्वसैन्येन भारद्वाजमपालयत् ॥ १४ ॥

हे मारिष धृतराष्ट्र ! ततः भीष्मश्च द्रोणश्च तव पुत्रश्च दुर्योधनः पांडवानां प्रतिबाधकं महाव्यूहमव्यूहन्त ॥ १० ॥ महता सैन्येन समन्तात्परिवारितो भीष्मः सुरराड् इन्द्र इव महतीं वाहिनीं सेनां प्रकर्षन् ययौ ॥ ११ ॥ तं प्रतापवान् महेष्वासः भारद्वाजः अन्वयात् । हि निशापते प्रजानां पालक ! कुंतलैः, दशार्णैः, मागधैः च विदर्भैः मेकलैः च कर्णप्रावरणकैः अपि वीरैः सहिताः आहवशोभिनं युद्धशोभिनं वीरं भीष्मं अपालयन् । तथा स्वसैन्येन सहितः शकुनिः भारद्वाजं द्रोणं अपालयत् ॥ १२–१४ ॥

ततो दुर्योधनो राजा सहितः सर्वसोदरैः ।
अश्वातकैर्विकर्णैश्च तथा चाम्बष्ठकोसलैः ॥ १५ ॥
दरदैश्च शकैश्चैव तथा क्षुद्रकमालवैः ।
अभ्यरक्षत संहृष्टः सौबलेयस्य वाहिनीम् ॥ १६ ॥
भूरिश्रवाः शलः शल्यो भगदत्तश्च मारिष ।
विन्दानुविन्दावावन्त्यौ वामं पार्श्वमपालयन् ॥ १७ ॥

ततः राजा दुर्योधनः सर्वसोदरैः सहितः अश्वातकैः विकर्णैश्च तथा अंबष्ठकोसलैः दरदैः शकैः च एव क्षुद्रकमालवैः सहितः अतएव संहृष्टः आनंदितः सौबलेयस्य शकुनेः वाहिनीं सेनां अभ्यरक्षत ॥ १५–१६ ॥ हे मारिष ! धृतराष्ट्र भूरिश्रवाः शलः शल्यः भगदत्तः ॥ आवन्त्यौ अवन्तिदेशीयौ विन्दानुविन्दौ वामं पार्श्वमपालयन् ॥ १७ ॥

सौमदत्तिः सुशर्मा च काम्बोजश्च सुदक्षिणः ।
श्रुतायुश्चाऽच्युतायुश्च दक्षिणं पार्श्वमास्थिताः ॥
अश्वत्थामा कृपश्चैव कृतवर्मा च सात्वतः ।
महत्या सेनया सार्धं सेनापृष्ठे व्यवस्थितः ॥ १९ ॥

पृष्ठगोपास्तु तस्यासन् नानादेश्या जनेश्वरा ।
केतुमान्वसुदानश्च पुत्र काश्यश्चाभिभू ॥ २० ॥
ततस्ते तावकाः सर्वे हृष्टा युद्धाय भारत ।
दध्मु शङ्खान्मुदायुक्ता सिंहनादांस्तथोऽवदन् ॥२१॥
तेषां श्रुत्वा तु हृष्टाना वृद्ध कुरुपितामह ।
सिंहनाद विनद्योच्चै शङ्ख दध्मौ प्रतापवान् ॥२२॥
तत शङ्खाश्च भेर्यश्च पेशयश्च विविधा परे ।
आनकाश्चाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥२३॥

सौमदत्ति सुशर्मा च काम्बोजश्च सुदक्षिण श्रुतायु च अच्युतायु च दक्षिण पार्श्वे आश्रित्य स्थिता ॥ १८ ॥ अश्वत्थामा, कृप च एव कृतवर्मा च सात्वत, महत्या सेनया सार्धं सेनापृष्ठे व्यवस्थित ॥ १९ ॥ नानादेश्या जनेश्वरा तस्य पृष्ठगोपाः पृष्ठरक्षका आसन् । केतुमान् वसुदान च काश्य च अभिभू पुत्र तस्य पृष्ठरक्षका आसन् ॥ २० ॥ हे भारत ! तत त सर्वे तावका युद्धाय हृष्टा भूत्वा मुदायुक्ता शङ्खान् दध्मु तथा सिंहनादान् उदवदन् ॥ २१ ॥ तेषां हृष्टानां शब्द श्रुत्वा वृद्ध कुरुपितामह भीष्म उच्चै सिंहनाद विनद्य, प्रतापवान् भीष्म शङ्खं दध्मौ ॥ २२ ॥ तत शङ्खाश्च भेर्यश्च विविधा पेशयश्च आनकाश्च परे अभ्यहन्यन्त, स तुमुल शब्दोऽभवत् ॥२३॥

## शब्दार्थ ।

अभेद्य = भेदण्यास कठीण
उपसंगम्य = जवळ जाऊन
पर्याप्त = घेरण्यास योग्य
सोदर = एकाच पोटातून जन्मलेले

युद्धविशारद = युद्धांत प्रवीण
अपर्याप्त = घेरण्यास अशक्य
वाहिनी = सेना
रक्ष्यमाण = ज्याचें रक्षण होत आहे

आवन्त्यो = अवंति देशाचे लोक | सेनापृष्ठं = सैन्याची पिछाडी
भेरी = नगारा | आनक = ढोल
तुमुल = मोठा | विनद्य = आवाज करून

## समासाः ।

१ युद्धविशारद = युद्धे विशारदः ।
२ पांडुपुत्रः = पाण्डोः पुत्रः ।
३ सुरराट् = सुराणां राट्, राड्, राजा ।
४ सेनापृष्ठं = सेनायाः पृष्ठं ।
५ जनेश्वरः = जनानां ईश्वरः ।
६ कुरुपितामहः = कुरूणां पितामहः ।

---

## पाठ ४

पहिल्या धड्यांत धातुसाधित शब्द बनविण्याचे दोन प्रत्यय सांगितले. या धड्यांत आतां आणखी कांहीं प्रत्यय सांगावयाचे आहेत. या प्रत्ययांच्या योगानें नवीन शब्द बनविणें किती सोपें आहे व असे शब्द नेहेमीं किती उपयोगी पडतात हें वाचकांनीं पहावें—

### ३ य

" य " हा प्रत्ययही पूर्वीच्या प्रत्ययांप्रमाणेंच धातूला लागतो व हा प्रत्यय लागला असतां रूपेंही पूर्वीप्रमाणेंच होतात. जसें " ध्या " धातूपासून " ध्येय " व " पा " धातूपासून " पेय " असें रूप होतें.

## शब्द

| | |
|---|---|
| ज्ञेय = जाणण्यास योग्य | देय = देण्यास योग्य |
| पेय = पिण्यास योग्य | वध्य = वध करण्यास योग्य |
| ध्येय = ध्यान करण्यास योग्य | जेय = जिंकण्यास योग्य |
| शस्य = प्रशंसा करण्यास योग्य | शाप्य = शाप देण्यास योग्य |
| श्रेय = विश्रम घेण्यास योग्य | लभ्य = लाभण्यास योग्य |
| जन्य = उत्पन्न होण्यास योग्य | सह्य = सहन करण्यास योग्य |

## संस्कृत वाक्य।

ब्रह्म एव सर्वज्ञेयं वस्तु, परंतु तदेव न केनापि ज्ञायते। शत्रुः शूरैर्वध्यो भवति। इदं दुःखं त्वया सह्यं इदानीम्। तत् कथं सह्यं भवेत्। मित्राणां मधुरैः सान्त्वपूर्वैर्वचनैर्महदपि दुःखं सह्यं भवति। स ग्रंथस्त्वया मह्यं देयः। इदानीमेव देयः। किं एतज्जलं पेयं अस्ति? यदि तृषितोऽसि तर्हि त्वयैतज्जलं पेयं नान्यथा यत एतत् परिशुद्धं नास्ति। त्वया तस्य कर्म शस्यम्। वध्यः पुरुषो वधकैर्वधस्थानं प्रति नीयते।

" य " हा आणखी एका निराळ्या जातीचा प्रत्यय आहे. हा प्रत्यय लागला असतां पूर्व धातूच्या ऱ्हस्व स्वराचा गुण होतो. या " य " प्रत्ययाचीं रूपें पुढील प्रमाणें होतात—

| धातु | प्रत्यय | रूप | अर्थ |
|---|---|---|---|
| कृ | य | कार्य | करण्यास योग्य |
| तृप् | य | तर्प्य | तृप्ति करण्यास योग्य |
| यज् | य | याज्य | यज्ञ करण्यास योग्य |
| त्यज् | य | त्याज्य | त्याग करण्यास योग्य |
| युज् | य | योज्य | जोडण्यास योग्य |
| प्रयुज् | य | प्रयोज्य | प्रयोग करण्यास योग्य |
| वच् | य | वाच्य | बोलण्यास योग्य |
| पच् | य | पाच्य | शिजविण्यास योग्य |

या प्रकारच्या शब्दांचाही वाक्यांतून पुष्कळ उपयोग होत असतो.

## संस्कृत वाक्य ।

कदापि कर्म न त्याज्यं कार्यमेव तत् । कर्म नैव त्याज्यं यतः तद्दोषवत् इति मनीषिणो वदन्ति यत्कार्यं तदवश्यमेव कार्यं । त्वया इदानीं नैवं वाच्यम्। त्वया स एवं वाच्यः । कार्यं कर्म सदैव समाचर । अकार्यं कदापि न समाचार । प्रभुस्त्वया योज्यं तत्त्वं संयोजय । अप्रयोज्यं सम्प्रयोक्तव्यं त्वया । रामस्त्वया वाच्यः, यत्त्वं अधुना तत्र न गमिष्यसीति ।

याप्रमाणें अनेक धातूंपासून अशा तऱ्हेचे अनेक शब्द बनवून त्यांचा वाक्यात उपयोग करावा. असे शब्द योजण्याची अधिक संवय ठेवली असतां वाचकांना असे प्रयोग बोलतां बोलतांही करतां येऊं लागतील.

आणखी तिसरा एक प्रकारचा " य " प्रत्यय आहे. हा प्रत्यय लागला असतां पूर्वीप्रमाणें पूर्वधातूच्या स्वराचा गुण वृद्धि होत नाहीं. हा प्रत्यय लागला असतां पुढें लिहिल्याप्रमाणें रूपें बनतात—

स्तुत्यः = स्तुति करण्यास योग्य
गुह्यं = गुप्त राखण्यास योग्य
भिद्यं = भेदण्यास योग्य
कृत्यं = करण्यास योग्य
कल्प्यं = कल्पना करण्यास योग्य
जुष्यं = सेवन करण्यास योग्य
आदृत्यं = आदर करण्यास योग्य
शंस्यं = प्रशंसा करण्यास योग्य
शिष्यः = शिकण्यास योग्य

पूर्वी सांगितल्याप्रमाणें या प्रकारचे शब्दही वाक्यांत योजून अनेक निरनिराळीं वाक्यें बनविता येतात—

सद्बलमधुना दर्शय। अरक्षस लोक कर्ताऽस्मि यदि नाभ्येषि शरणं मां सीतामादाय। धर्मात्मा विभीषणश्च ध्रुवं लङ्कैश्वर्यं प्राप्नोति। न हि क्षणमपि शक्यमधर्मेण राज्यं त्वया भोक्तुम्।" इति।

रामप्रेषितोऽङ्गदोऽपि रावणं ददर्श सामात्यम्। रामवचनं च तं श्रावयामास। तच्छ्रुत्वा सरोषं रावणं शशास "बध्यतामय मिति।" दीप्ताग्निरिव रजनीचरास्तं अगृह्णु। अङ्गदोऽपि बलं दर्शयितुं स्वयमेवात्मानं ग्राहयामास। पश्चात् बाहुद्वयासक्तांश्च तान्राक्षसानादायोत्पपात। तद्वेगेन निर्धूताश्च ते भूमौ निपतिता वालीपुत्रोऽङ्गदोऽपि सत्वरं रामपार्श्वमुपागतः।

समासाः।

१ वानरयोधा = वानराणां योधाः।
२ पूर्वोपस्थिता = पूर्वं एव उपस्थिताः।
३ सागरसमीपस्थित = सागरस्य समीपम्। सागरसमीपे स्थितः।
४ कालप्रेरित = कालेन प्रेरितः।
५ शत्रुसेवी = शत्रुं सेवत इति।
६ स्वार्थप्रयुक्त = स्वार्थेन स्वार्थाय वा प्रयुक्तः।
७ गदापाणि = गदा पाणौ यस्य सः।
८ अधर्ममार्ग = न धर्मः अधर्मः। अधर्मस्य मार्गः।
९ धर्मपथ = धर्मस्य पथाः।
१० अविश्वसनीय = न विश्वसनीयः।
११ परमर्षिः = परमश्चासौ ऋषिश्च।
२२ वृक्षप्रस्तराद्य = वृक्षाश्च प्रस्तराश्च वृक्षप्रस्तराः। ते आद्यं येषां ते वृक्षप्रस्तराद्यः।
१३ सेतुबन्धन = सेतोः बन्धनं।
१४ दीप्ताग्निः = दीप्तश्चासौ अग्निः।

शब्द ।

| | |
|---|---|
| आदेशः = आज्ञा | दुर्वृत्तः = दुराचारी |
| योधः = वीर | अनुजः = धाकटा भाऊ |
| प्रतस्थिरे = निघाले | अतर्कितः = ज्याची कल्पना |
| आसेदुः = येऊनपोहोंचले. | झालेली नाहीं. |
| अंबर = आकाश. [ रणारे | अंतर्धानं = गुप्तता |
| शत्रुसेवी=शत्रूचा आश्रय क- | कृतात्मा = आत्मिक बलानें युक्त |
| कुलपांसन= कुळाचा कलंक | आर्त = दुःखी |
| अप्रमत्त=उन्मत न झालेला | पादपः = वृक्ष |

---

## पाठ ३

वेदांतील शब्दयोजनेच्या किंवा शब्द बनविण्याच्या रीतिविष-यीं यापूर्वी थोडेसें विवेचन केलेलें आहेच. आतां या धड्यांत आणखी थोडी माहिती द्यावयाची आहे. " इन्द्र " शब्दाचे किती अर्थ होतात तें या धड्यांत दाखवावयाचें आहे—

## इन्द्र ।

या शब्दाची उत्पत्ति अनेक तऱ्हांनीं अनेक ठिकाणीं केलेली आहे. ऐतरेय उपनिषदांत—

इदं+द्र = इन्द्र

" ( इदं ) हें ( द्र ) फाडणारा, याचा भेद करणारा, ( हें तोड-णारा किंवा फोडणारा. ) " आपल्या किंवा प्राण्यांच्या शरीरांत हा इन्द्र, इंद्रियांच्या ठिकाणीं वसतो, किंवा शरीरांत भेद करून आपल्या कार्याला इष्ट अशीं द्वारें बनवितो, ह्मणून या शरीरांत येणाऱ्या आत्म्याचें नांव " इन्द्र " आहे.

या शब्दाचे अनेक अर्थ होतात; परंतु सगळेच अर्थ येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं. कारण संस्कृतमध्यें शब्दाचे यौगिक अर्थ कसे भिन्न भिन्न होत असतात, हीं गोष्ट घर इन्द्र शब्दाचे निरनिराळे कांहीं अर्थ दर्शविले आहेत, तेवढ्या वरुन सुद्धां वाचकांनां कळून येईल.

आतां या शब्दाच्या निरनिराळ्या अर्थाचीं कांहीं उदाहरणें पहा-

इन्द्रं विश्वा अवीवृधन् समुद्रव्यचसं गिरः ।
रथीतमं रथीनां वाजानां सत्पतिं पतिम् ॥ ऋ० १।११।२

जो ( रथीनां रथीतमं ) रथी वीरां मध्यें श्रेष्ठ महारथी व ( वाजानां पतिं ) बलांचा अधिपति आहे व जो ( सत्पतिं ) उत्तम स्वामी आहे, त्याचप्रमाणें ( समुद्रव्यचसं ) समुद्राप्रमाणें विस्तृत, व्यापक ( इंद्रं ) प्रभु आहे त्याची. ( विश्वाः गिरः ) आमच्या सर्व वाणी ( अवीवृधन् ) स्तुति करतात. अर्थात् अशा शत्रुनाशक समर्थ प्रभुची आम्ही स्तुति करतों. तसेंच—

सख्ये त इन्द्र वाजिनो मा भेम शवसस्पते ।
त्वामभि प्रणोनुमो जेतारमपराजितम् ॥ २ ॥ ऋ० १।११।२

हे ( इन्द्र ) प्रभो ! हे ( शवसः पते ) बलाच्या नायका ! ( ते सख्ये ) तुझ्या मित्रत्वांत राहून आम्ही ( वाजिनः ) बलवान होऊन ( मा भेम ) भयभीत होत नाहीं. ( जेतारं ) शत्रुला जिंकणारा व ( अ—पराजितं ) कधींही पराजित न होणारा ( त्वां ) अशा तुला आम्ही ( अभि—प्र—णोनुमः ) नमन करतों.

इन्द्रं वो विश्वतस्परि हवामहे जनेभ्यः ।
अस्माकमस्तु केवलः ॥ ऋ० १।७।१०

( वः जनेभ्यः ) तुमच्या लोकांकरतां ( विश्वतः परि ) सर्वांच्या वर ( इन्द्रं हवामहे ) प्रभुची प्रशंसा करतों. तो प्रभु ( अस्माकं ) आमचाच केवळ बनून ( अस्तु ) राहो !

इन्द्रस्य नु वीर्याणि प्रवोचं यानि चकार प्रथमानि वज्री ।
अहन्नहिमन्वपस्ततर्द प्र वक्षणा अभिनत्पर्वतानाम् ॥

ऋ० १।३२।१

( यानि ) जे ( प्रथमानि ) पहिले पराक्रम ( वज्री ) वज्र धारण करणाऱ्या वीराने ( चकार ) केले ते ( इन्द्रस्य ) इन्द्राचे ( वीर्याणि ) पराक्रम ( नु ) निश्चयानें ( प्रवोचं ) मी सांगतों. त्यानें ( अहिं ) शत्रुचा ( अहन् ) वध केला ( अपः अनुततर्द ) जलाचा फैलाव केला व ( पर्वतानां ) पर्वतापासून ( वक्षणाः ) नद्या ( प्र अभिनत् ) भेदकरीत वाहं लागल्या.

इन्द्रो यातोऽवसितस्य राजा शमस्य च शृंगिणो वज्रबाहुः ।
सेदु राजा क्षयति चर्षणीनामरान्न नेमिः परि ता बभूव ॥

ऋ० १।३२।१५

# पाठ ४

## रामायणम् ।

ततः कृत्स्नं प्राकारपरिखान्तरं वानरीकृतं सर्वे राक्षसा ददृशुः। रामश्च मनसैव पीडयमानां सीतां जगाम । क्षिप्रमाज्ञापयामास च वानरान् द्विषतां वधाय । तेऽपि वानरास्तृणपांसुपर्वताग्रैः परिखां पूरयन्तो लंकां ममन्थुः। रावणोऽपि राक्षसानां सैन्यनिर्याणमाज्ञापयामास । ततस्तेषां संग्रामो देवासुरसंग्राम इवाऽतिघोरः समपद्यत ॥ राक्षसानां वानराणां च मांसशोणितकर्दमः संबभूव । रात्रिश्च प्रवृत्ता, तदा निशायुद्धमभूत् ॥ राक्षसाः प्लवगान् भक्षयन्तः परिपेतुः ॥ युद्धे बलिनो वानरा राक्षसीं चमूमक्षोभयन् । तदा भूमिः शोणितस्रावकर्दमा बभूव ।

ये तु राक्षसा रामस्याभिमुखे युद्धार्थं स्थितास्ते सर्वे रामशरताडिता मृताः। इन्द्रजित्तु वालीपुत्रेणांगदेन हताश्वो हतसारथिर्भूत्वा तत्रैवान्तरधीयत । तदा च सर्वे वानरा वालीपुत्रं तुष्टुवुः । अन्तर्धानगतस्तु रावणपुत्र इन्द्रजिद्ब्रह्मनिवर्चसी बाणान्मुमोच । अन्तर्धानगतेन तेन चोक्तम्–"शक्रोऽपि मामेवमनालक्ष्यं युद्ध्यमानमासादितुं न शक्तः । किं पुनर्युवाम्, 'एष वां यमसादनं नयामि।'" इति । एवं तौ रामलक्ष्मणौ शरशल्याचितौ प्रकम्पितौ जगत्यां निपेततुः । प्रथमं रामः पपात विद्धो रावणिना येन पुरा शक्रो जितः। एवं पतिते रामे विजयं प्राप्ते च राक्षसे हनूमत्प्रमुखाः सर्वेऽपि वानरा अन्वशोचन्त । राक्षसान्हर्षयन् रावणपुत्र इन्द्रजिल्लंकां पुरीं प्रविवेश । ततः सीतां त्रिजटया सह पुष्पकमारोप्य विमानं चालयामास रावणः । घोषयामास च "हतौ रणे रामलक्ष्मणौ" इति । विमानेन गत्वाऽपि सीता सर्वान्निपतितान्ददर्श शरतल्पगतौ च रामलक्ष्मणौ दृष्ट्वा दुःखार्ता सीता करुणं विल-

रावणो निर्ययौ । तमागतं दृष्ट्वा रामो विभीषणमुवाच- "अहो ! दुष्प्रेक्ष्यो रावणो दीप्तमहातेजा आदित्य इव रश्मिभिः । दिष्ट्या पापात्मा दृष्टिपथं गत " इति ।

ततो रामो रावणं अभ्यद्रवत् । तदा हनूमांस्तु तं प्रार्थयामास "पृष्ठं मे समारुह्य राक्षसं शास्तुमर्हसि ।" इति । रामस्तथा कृत्वा रथस्थं ददर्श रावणम् । इन्द्र इव वज्रेण मेरुं तरसा बाणेनेन्द्रशत्रुं बाली जघान । रक्षोधिपतेः काञ्चनं किरीटं च चिच्छेद । निकृत्तचापो हताश्वसूतश्च विह्वलन् राजा रावणो लंकां विवेश ।

आत्मानं च समरे जितं सेनापतिं प्रहस्तं च निषूदितं ज्ञात्वा, रक्षो भीमबलं आदिदेश रावणः । आज्ञापयच्च " कुंभकर्णो निबोध्यताम् । " इति । ततस्ते राक्षसा महद्भक्ष्यमादाय कुंभकर्णगुहां ययुः । ते सर्वे प्रयत्नेन तं सुप्तं अप्रबोधयन् । अन्नस्य च राशिं पुरतः ,वा शंखान् विनेदुः । स स्वैरं प्रतिबुद्धः सर्वमन्नं भक्षयामास । तुष्टं च तं सर्वे पर्यवारयन् । अकालबोधनाद्विस्मितोऽसौ तानपृच्छत् —"किमर्थं प्रतिबोधितोऽस्मि । अथवा भयमिह किमप्युत्पन्नं भवेत् इति मन्ये । " स तत उत्थाय गत्वा च रावणं ददर्श । तस्य चरणौ ववन्दे, कृत्यं चाऽपृच्छत् । सर्वं कथयित्वा रावणोऽब्रवीत् " पश्य सर्वं वानरैराक्रान्तमस्ति । त्रायस्व मां बालवृद्धावशेषितां लंकां च । " इति ।

कुंभकर्णस्तु प्रहस्योवाच " अयमासादितस्त्वया महान् दोषः परस्त्रीहरणेन । शीघ्रमेव त्वां पापस्यैतस्य फलं प्राप्स्यते । भवतु । तथापि बन्धुस्नेहसदृशं कार्यं मयाऽवश्यमेव कार्यम् । अत इदानीं शत्रुकंदनाय गमिष्यामि । " इति ।

कुंभकर्णमागतं दृष्ट्वा प्रथमं वानरा भीतिं प्रापुः । परंतु वालिसुतस्यांगदस्य प्रोत्साहनात्तु ते सर्वेऽपि क्रुद्धास्तं शिलापादपादिभिर्जघ्नुः । असावपि वानरसैन्यानि ममन्थ । तदा रामस्य सायकाः

कुंभकर्णं विव्यधुः। सोऽपि शृंगं नाम महास्त्रं रामस्योपरि चिक्षेप। रामस्तदा वायव्यास्त्रेणास्य बाहुं जहार। अन्योऽपि बाहुरैन्द्रेणास्त्रेण रामेण कृत्तः। तथैवाऽस्य पादावपि रामेण बाणैर्लूनौ। अन्ते गत्वा ऐन्द्रं शरं निशितमादाय कुंभकर्णस्य शिरोऽपि रामश्चकर्त, तेन स राक्षसः पपात ममार च।

एवं सर्वान्राक्षसान् हत्वा अन्ते रावणमपि संहृत्य लंकाया राज्यं बिभीषणाय रामः प्रददौ। सीतां चादाय, तस्या अग्निशुद्धिं कृत्वा, ततस्तां परिशुद्धां ज्ञात्वा, तया सह पुष्पकं विमानं समारुह्य सर्वैर्वानरैः सह अयोध्यां प्राप्तो रामः। तदा रामं सर्वे अयोध्यावासिनः राज्ये अभिषिंचितवन्तः। तस्य रामचंद्रस्य राज्ये सर्वेऽपि मानवाः हृष्टाः पुष्टास्तुष्टाः सन्तः इहलोके पुष्टिं लब्ध्वाऽन्ते मुक्तिमपि प्रापुः। इति।

## समासाः।

१ प्राकारपरिखान्तरं = प्राकारश्च परिखा च प्राकारपरिखे तयोः अन्तरम्।
२ तृणपांसुपर्वताग्राः = तृणं च पांसुश्च पर्वताग्रं च।
३ देवासुरसंग्रामः = देवाश्च असुराश्च। तयोः संग्रामः।
४ मांसशोणितकर्दमः = मांसं च शोणितं च। तयोः कर्दमः।
५ शोणितस्रावकर्दमा = शोणितस्य स्रावः। तेन कर्दमयुक्ता।
६ रामशरताडितः = रामस्य शरः। तेन ताडितः।
७ वालिपुत्रः = वालिनः पुत्रः।
८ हताश्वः = हतः अश्वः यस्य।
९ हतसारथिः = हतः सारथिः यस्य।
१० वानरशाखामृगैराक्रान्ता = … । तैः आक्रान्ता

११ शरतल्पगतः = शरस्य तल्पं। तत्र गतः।
१२ दुःखार्ता = दुःखेन आर्ता।
१३ कलहशीला = कलहयुक्तं शीलं यस्याः।
१४ गतजीवितः = गतं जीवितं यस्मात्।
१५ भयाविष्टं = भयेन आविष्टं।
१६ वानरयूथपाः = वानराणां यूथानां पालकाः।
१७ युद्धकामाः = युद्धं कामः येषां ते।
१८ अकालबोधनं = न काल अकालः तस्मिन् बोधनं।
१९ बालवृद्धावरोपिता = बालाश्च वृद्धाश्च ते अवरोपिताः यत्र।

शब्द।

कृत्स्नं = सर्व
प्राकार = तट
परिखा = खंदक
शोणित = रक्त
प्लवगः = वानर
अंतरधीयत = गुप्त झाला
गोष्पदे = गाईंच्या पावला येवढ्या अल्पशा ठिकाणीं
नीरुजौ = नीरोग
समर = युद्ध
आक्रान्त = व्याप्त
निशित = तीक्ष्ण
ईरित =

पांसु = धुळ
तृणं = गवत
निर्याणं = प्रयाण
कर्दमः = चिखल
स्राव = प्रवाह
अनालक्ष्यं = न दीसणारा
बाष्पवेगः = अश्रूंचा वेग
नैष्ठिकः = निश्चयानें मिळण॰
रश्मिः = किरण
बोधन = जागें करणें
कंदनं = नाश
परिशुद्धः = पवित्र

—:०:—

# पाठ ५

## मरुत् ।

मरुत् देवतेचा निवास इन्द्र देवते जवळच असतो. म्हणून इन्द्र देवते बरोबरच मरुत् देवतेचा विचार करणें योग्य आहे. तिसऱ्या पाठांत इन्द्र देवतेचा विचार केलेला आहे. आतां या पाठांत मरुत् देवतेचा विचार करूं.

" म्रियन्ते इति मरुतः " अर्थात् मरण पावतात, म्हणून यांना मरुत् म्हणतात. " मर्त्य, मर्य " आदि शब्दांच्या समान अर्थाचाच हा " मरुत् " शब्द आहे.

युद्धामध्यें वीर लोक मरावयाला सज्ज होतात, हा अर्थ मरुत् शब्दांत दिसून येतो म्हणूनच वेदांमधील मरुत् देवते विषयींच्या मंत्रांतून बहुतेक लढणाऱ्या वीरांचेंच वर्णन आढळतें. हा अर्थ—

" मर्+उत् " या शब्दांमध्येंही दिसून येतो. मरण्या करतां जे उठतात त्यांना मरुत् म्हणतात. अस्सल वीरच मरण्याकरतां सज्ज होत असतात; म्हणूनच अस्सल वीरांचें वर्णन मरुत्सूक्तां मध्यें आलेलें आहे.

" मरुत् " शब्दांचे " मा+रुद् " असे शब्द विभाग पाडले तर त्यांपासून " न रडणें " असा अर्थ उत्पन्न होतो. जे रडत नाहींत त्यांना मरुत् म्हणतात. हास्यमुखी वीरांचा भाव या शब्दांत आहे. युद्ध प्रारंभ झालें असतां वीरांचे बाहु आनंदानें स्फुरण पावतात; ते भीतिनें कधींही गांगरून जात नाहींत व कधीं रडत ही नाहींत. हा भाव सुद्धां पूर्वी दाखवलेल्या अर्थाशीं जुळत असलेला वाचकांना दिसून येईल.

" मा+रुध् " (प्रतिबंध न करणें) जे स्वतः कोणालाही प्रतिबंध करीत नाहींत व त्यांना दुसरे कोणीही प्रतिबंध करूं शकत नाहींत; हेंही एक वीरांचेंच लक्षण आहे. कारण खरा वीर दुसऱ्यांच्या उन्नतींत कधींही अडथळा आणीत नाहीं, किंवा आपल्या उन्नतींत ही दुसऱ्यांना अडथळा करूं देत नाहीं.

" मा+रुत् " ( शब्द न करणें ) अर्थात् जे फार बोलत नाहींत, फार बडबड करीत नाहींत, करावयाचें कर्तव्य तेवढें करतात परंतु शब्दजाल मात्र फार वाढवीत नाहींत; ही व्युत्पत्तिसुद्धां मरुतांचा एक विलक्षण गुणधर्म दर्शवीत आहे. वीरलोकांमध्यें हा गुणधर्म अवश्य असला पाहिजे, नाहींतर शब्दजाल पसरण्यां-तच त्यांची शक्ति व्यर्थ खर्च होईल व त्या बडबड्या लोकांच्या हातून पौरुष कर्म कांहींच होणार नाहीं.

निरुक्तकारांनीं सांगितलेले मरुत् शब्दाचे हे यौगिक अर्थ येथें दिले आहेत. हे अर्थ पाहून वेदामध्यें शब्दांचे यौगिक अर्थ कसे कसे होत असतात, या विषयीं वाचकांनीं माहिती करून घ्यावी. शब्द एकच असतो; परंतु त्याचे निरनिराळे विभाग करून प्रत्येक विभागाच्या अर्थाचा विचार केला असतां अनेक निरनिराळ्या अर्थांचा बोध होतो. हे अर्थ लक्ष्यांत ठेवून पुढील मंत्रांचा आतां अभ्यास करा—

ये शुभ्रा घोरवर्पसः सुक्षत्रासो रिशादसः ।
मरुद्भिरग्न आगहि ॥ ऋग्वेद १।१९।५

हे अग्ने ! तूं ( ये ) जे ( शुभ्राः ) गौरवर्ण ( घोरवर्पसः ) मोठ्या शरीराचे ( सुक्षत्रासः ) उत्तम क्षत्रिय तसेंच ( रिशादसः ) शत्रूंचा नाश करणारे आहेत, त्या ( मरुद्भिः ) मरुत् देवांसह ( आगहि ) ये ।

वि ये भ्राजन्ते सुमखास ऋष्टिभिः प्रच्यावयन्तो अच्युता चिदोजसा । मनोजुवो यन्मरुतो रथेष्वा वृषव्रातासः पृषतीरयुग्ध्वम् ॥

ऋ० १।८५।४

हे ( मरुतः ) मरुत् देव हो ! ( ये ) जे आपण ( सु मखासः ) उत्तम कर्म करणारे बनून ( ऋष्टिभिः ) शस्त्रांच्या योगाने ( वि-भ्राजन्ते ) चमकतां व ( ओजसा ) शक्तिच्या योगानें ( चित् ) निश्चयपूर्वक (अ-च्युता: ) न हालणाऱ्यांनां सुद्धां (प्रच्यावयन्तः) हालवून सोडतां. आपण ( मनोजुवः ) मनाप्रमाणें गतिवान् असून ( वृषव्रातासः ) गाई बैलांचे अनेक कळप पाळगतां व ( रथेषु ) रथांनो ( पृषतीः ) नाना रंगांच्या पशूंनां ( अयुग्ध्वम् ) जुंपुतां.

यूयं तस्सत्यशवस आविष्कर्त महित्वना ।
विध्यता विद्युता रक्षः ॥

ऋ० १।८६।९

( यूयं ) आपण (सत्य-शवसः) सत्याच्या बलानें युक्त आहां! आपल्या ( महित्वना ) महत्वानें ( आविष्कर्त ) प्रकट होतां व ( विद्युता ) विजे प्रमाणें चकाकणाऱ्या शस्त्रानें ( रक्षः ) दुष्ट राक्षसांनां ( विध्यत ) कापून काढतां.

वाचकांनीं या प्रमाणें मरुत् देवतेच्या मंत्रांचें अध्ययन करावें व त्यापासून त्यांच्या वीरश्रीचा बोध घ्यावा.

# पाठ ६

महाभारतम्। ( भीष्मपर्व अ० ९९ )

सञ्जय उवाच।

ततः शान्तनवो भीष्मो निर्ययौ सह सेनया।
व्यूहं व्यूह्य महत्सर्वतो भद्रमात्मनः ॥ १ ॥
कृपश्च कृतवर्मा च शैब्यश्चैव महारथः।
शकुनिः सैन्धवश्चैव काम्बोजश्च सुदक्षिणः ॥ २ ॥
भीष्मेण सहिताः सर्वे पुत्रैश्च तव भारत।
अग्रतः सर्वसैन्यानां व्यूहस्य प्रमुखे स्थिताः ॥ ३ ॥
द्रोणो भूरिश्रवाः शल्यो भगदत्तश्च मारिष।
दक्षिणं पक्षमाश्रित्य स्थिता व्यूहस्य दंशिताः॥ ४ ॥
अश्वत्थामा सोमदत्तश्चावन्त्यौ च महारथौ।
महत्या सेनया युक्ता वामं पक्षमपालयन् ॥ ५ ॥
दुर्योधनो महाराज त्रिगर्तैः सर्वतो वृतः।
व्यूहमध्ये स्थितो राजन्पाण्डवान्प्रति भारत ॥ ६ ॥
अलम्बुषो रथश्रेष्ठः श्रुतायुश्च महारथः।
पृष्ठतः सर्व सैन्यानां स्थितौ व्यूहस्य दंशितौ ॥ ७ ॥
एवं च तं तदा व्यूहं कृत्वा भारत तावकाः।
सन्नद्धाः समदृश्यन्त प्रतपन्त इवाऽग्नयः ॥ ८ ॥
ततो युधिष्ठिरो राजा भीमसेनश्च पांडवः।
नकुलः सहदेवश्च माद्रीपुत्रावुभावपि ॥ ९ ॥
अग्रतः सर्वसैन्यानां स्थिता व्यूहस्य दंशिताः।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्च महारथः ॥ १० ॥
स्थिताः सैन्येन महता परानीकविनाशनाः।
शिखण्डी विजयश्चैव राक्षसश्च घटोत्कचः॥ ११ ॥

चेकितानो महाबाहुः कुन्तिभोजश्च वीर्यवान् ।
स्थिता रणे महाराज महत्या सेनया वृताः ॥ १२ ॥
अभिमन्यु र्महेष्वासो द्रुपदश्च महाबलः ।
युयुधानो महेष्वासो युधामन्युश्च वीर्यवान् ॥ १३ ॥
केकया भ्रातरश्चैव स्थिता युद्धाय दंशिताः ।
एवं तेऽपि महाव्यूहं प्रतिव्यूह्य सुदुर्जयम् ॥ १४ ॥
पाण्डवाः समरे शूराः स्थिता युद्धाय दंशिताः ।
तावकास्तु रणे यत्ताः सहसेना नराधिपाः ॥ १५ ॥



अभ्युद्ययू रणे पार्थान्भीष्मं कृत्वाऽग्रतो नृप ।
तथैव पाण्डवा राजन्भीमसेनपुरोगमाः ॥ १६ ॥
भीष्मं योद्धुमभीप्सन्तः संग्रामे विजयैषिणः ।
क्ष्वेडाः किलकिलाः शङ्खाःक्रकचा गोविषाणिकाः ॥१७॥
भेरी मृदङ्गपणवान्नादयन्तश्च पुष्करान् ।
पाण्डवा अभ्यवर्तन्त नदन्तो भैरवान्रवान् ॥ १८ ॥
भेरी मृदङ्गशङ्खानां दुन्दुभीनां च निस्वनैः ।
उत्कृष्टसिंहनादैश्च वल्गितैश्च पृथग्विधैः ॥ १९ ॥
वयं प्रतिनदन्तस्तानगच्छाम त्वरान्विताः ।
सहसैवाऽभिसंक्रुद्धास्तदासीत्तुमुलं महत् ॥ २० ॥
ततोऽन्योन्यं प्रधावन्त संप्रहारं प्रचक्रिरे ।
ततः शब्देन महता प्रचकम्पे वसुंधरा ॥ २१ ॥
पक्षिणश्च महाघोरं व्याहरन्तो विबभ्रमुः ।
सप्रभश्चोदितः सूर्यो निष्प्रभः समपद्यत ॥ २२ ॥
ववुश्च वातास्तुमुलाः शंसन्तः सुमहद्भयम् ।
घोराश्च घोरनिर्ह्रादाः शिवास्तत्र ववाशिरे ॥ २३ ॥
वेदयन्त्यो महाराज महद्वैशसमागतम् ।
दिशः प्रज्वलिता राजन्पांसुवर्षं पपात च ॥ २४ ॥

रुधिरेण समुन्मिश्रमस्थिवर्षं तथैव च ।
रुदतां वाहनानां च नेत्रेभ्यः प्रापतज्जलम् ॥ २१ ॥

ततः शांतनवः शांतनुपुत्रो भीष्मः सेनया सह निर्ययौ ॥ सर्वतोभद्रं नामकं महद्व्यूहं ■ आत्मनः सैन्यस्य अव्यूहत ॥ १ ॥ कृपश्च कृतवर्मा च महारथः शैब्यश्च शकुनिः सैन्धवः सिंधुराजा च सुदक्षिणः कांबोजः कंबोजदेशाधिपतिश्च एव ॥२॥ हे भारत ! तव पुत्रैः भीष्मेण च सहिताः सर्वसैन्यानां अग्रतः व्यूहस्य च प्रमुखे स्थाने स्थिताः॥ ३ ॥ हे मारिष ! धृतराष्ट्र ! द्रोणो भूरिश्रवाः शल्यः भगदत्तश्च व्यूहस्य दक्षिणं पक्षं आश्रित्य दंशिता रक्षिताः स्थिताः ॥४॥ अश्वत्थामा सोमदत्तः महारथौ अवन्त्यौ अवन्तिदेशीयौ राजानौ महत्या सेनया युक्ता व्यूहस्य वामं पार्श्वं अपालयन् ॥ ५ ॥ हे महाराज राजन् ! त्रिगर्तैः सर्वतो वृतः दुर्योधनः व्यूहमध्ये स्थितः पांडवान् प्रति युद्धं कर्तुम् ॥ ६ ॥ रथश्रेष्ठः अलंबुष महारथः श्रुतायुश्च सर्वसैन्यानां व्यूहस्य पृष्ठतः दंशितौ स्थितौ ॥७॥ हे भारत! तावका तव संबंधिनः एवं च तं व्यूहं कृत्वा सन्नद्धाः स्थिताः समदृश्यन्त यथा प्रतपन्तोऽग्नयः॥८॥ ततः राजा युधिष्ठिरः पांडवो भीमसेनश्च नकुलः सहदेवश्च उभौ अपि माद्रीपुत्रौ ॥ ९ ॥ सर्वसैन्यानां व्यूहस्य अग्रतः दंशिता रक्षिताः स्थिताः । धृष्टद्युम्नः विराटश्च महारथः सात्यकिश्च ॥ १० ॥ परानीकविनाशनाः शत्रुसैन्यविनाशकाः महता सैन्येन स्थिताः । शिखण्डी विजयोऽर्जुनश्चैव घटोत्कचो राक्षसश्च ॥ ११ ॥ महाबाहुः चेकितानः, वीर्यवान् कुन्तिभोजश्च । हे महाराज ! महत्या सेनया वृताः रणे स्थिताः ॥ १२॥ महेष्वासोऽभिमन्युः महाबलो द्रुपदश्च महेष्वासो युयुधानो वीर्यवान् युधामन्युश्च ॥ १३ ॥ केकया भ्रातरः चैव युद्धाय दंशिताः सुरक्षिताः स्थिताः तेपि एवं दुर्जयं महाव्यूहं प्रतिव्यूह्य॥१४॥ शूराः पांडवाः समरे युद्धाय दंशिताः स्थिताः । तावकाः तु सहसेनाः

नराधिपाः रणे यत्ताः सिद्धाः ॥ १५ ॥ हे नृप ! भीष्मं अग्रतः कृत्वा रणे पार्थान् अभ्युद्ययुः । तथैव पांडवाः, हे राजन् ! भीमेन पुरोगमाः ॥ १६ ॥ संग्रामे विजयैषिणः भीष्मं योद्धुमभीप्सन्तः । क्ष्वेडाः किलकिलाशब्दाः शंखान् ककचान् गोविषाणिकाः । १७ ॥ भेरीमृदंगपणवान् पुष्करान् नादयन्तः च पाण्डवाः भैरवान् रवान् नदन्तः अभ्यवर्तन्त ॥ १८ ॥ भेरीमृदंगशंखानां दुन्दुभीनां च निःस्वनैः उत्कृष्टसिंहनादैश्च पृथग्विधैर्वेल्गितैश्च ॥ १९ ॥ वयं प्रतिनदन्तः त्वरान्विताः सहसैव अभिसंक्रुद्धाः तानगच्छाम । तत् महत् तुमुलं युद्धं आसीत् ॥ २० ॥ ततोऽन्योन्यं प्रधावन्तः संप्रहारं प्रचक्रिरे । ततः महता शब्देन वसुंधरा प्रचकम्पे ॥ २१ ॥ पक्षिणश्च आकाशे महाघोरं शब्दं व्याहरन्तः विबभ्रमुः ! सप्रभः प्रभया युक्तः उदितः सूर्यः निष्प्रभः समपद्यत ॥ २२॥ सुमहद्भयं शंसन्तः तुमुला वाता ववुः। घोरनिर्ह्रादाः घोरशब्दाः घोराः शिवाः तत्र ववाशिरे ॥२३॥ हे महाराज ! महद् वैशसं आगतं वेदयन्त्यः। हे राजन् ! प्रज्वलिताः दिशः पांसुवर्षं च पपात ॥ २४ ॥ रुधिरेण समुन्मिश्रं तथैव च अस्थिवर्षं । रुदतां वाहनानां च नेत्रेभ्यः जलं प्रपतत् ॥ २५ ॥

## समासाः ।

१ व्यूहमध्यं = व्यूहस्य मध्यं ।
२ परानीकविनाशनः = परस्य अनीकं । तस्य विनाशनः ।
३ विजयैषिन् = विजयं इच्छति ।
४ भेरीमृदंगपणवान् = भेरी च मृदंगश्च पणवश्च ।
५ उत्कृष्टसिंहनादः = उत्कृष्टश्चासौ सिंहनादश्च ।
६ सप्रभः = प्रभया सहितः ।
७ निष्प्रभः = निर्गता प्रभा यस्मात् ।
८ घोरनिर्ह्रादः = घोरः निर्ह्रादः यस्य ।
९ पांसवर्षं = पांसूनां वर्षं ।

असौ यस्ताम्रो अरुण उत बभ्रुः सुमंगलः।
ये चैनं रुद्रा अभितो दिक्षु श्रिताः सहस्रशोऽवैषां हेड ईमहे॥
वा० यजु० १६ । ६

( यः असौ ) जो हा ( ताम्रः अरुणः उत बभ्रुः सुमंगलः ) लाल, अरुणवर्णाचा तसेंच भुरकट रंगाचा कल्याण करणारा रुद्र आहे, ( ये ) जे ( सहस्रशः रुद्राः अभितः दिक्षु एनं श्रिताः ) दुसरे हजारों रुद्र चारी बाजूच्या दिशांमध्यें याच्या आश्रयानें राहतात. ( एषां हेडः अव ईमहे ) यांचा क्रोध आम्ही भक्तिच्या सहाय्यानें दूर करतों.

सर्वांना आधार देणारा असा एक मुख्य रुद्र आहे व त्याच्या आधारानें आणखी अनेक हजारों रुद्र राहतात. मुख्याचें नांव रुद्र असून त्याच्या आधारानें राहणाऱ्यांचेंही नांव रुद्रच आहे. हें वर्णन समजण्याकरतां परमात्म्याच्या आधारानें राहणारे अनेक जीवात्मे, एका सेनापतिच्या आश्रयानें राहणारे हजारों सैनिक, एका राजाच्या आश्रयानें राहणारे हजारों राजपुरुष, आदि एकाच्या आधारानें राहणाऱ्या अनेकांचा संबंध. येथें पाहण्यासारखा आहे. रडवणारा रुद्र असतो, राजा दुष्टांना दंड देऊन रडवतो म्हणून तो रुद्र आहे व याच कारणाकरतां राजपुरुषांनाही रुद्रच म्हणतात. यांच्या क्रोधापासून आपला बचाव करण्याचा प्रत्येकानें प्रयत्न करावा. याच अध्यायांत—

नमो हिरण्यबाहवे सेनान्ये॥ १६ । १७
नमो रुद्रायाततायिने क्षेत्राणां पतये नमः।
नमः सूतायाहन्त्यै वनानां पतये नमः॥ १६ । १८
नमो मंत्रिणे वाणिजाय कक्षाणां पतये नमः।
नम उच्चैर्घोषायाक्रन्दयते पत्तीनां पतये नमः।
यजु० १६ । १९.

( हिरण्य-बाहवे सेनान्ये ) बाहूंवर सोन्याचें आभूषण धारण करणाऱ्या सेनापतिनां नमस्कार असो ! ( आततायिने ) धनुष्य ताणून ओढणाऱ्यांनां तसेंच ( क्षेत्राणां पतये ) देशांच्या स्वामीला नमस्कार असो ! ( मंत्रिणे ) मंत्री व ( वाणिजाय ) व्यापाऱ्यांनां तसेंच ( कक्षाणां पतये ) सैन्यविभागांच्या अधिपतींनां आणि ( उच्चैः घोषाय आक्रन्दयते ) खडया आवाजानें घोषणा करणाऱ्यांनां त्याचप्रमाणें ( पत्तीनां पतये ) पायदळांच्या मुख्य अधिकारीरूपी रुद्रांनां नमस्कार असो !

या सर्व राजपुरुषांनां येथें रुद्रांचेंच स्वरूप म्हणून वर्णिलें आहे. हे सर्व दुष्टांनां रडवितात म्हणून यांनां रुद्र म्हटलें आहे. या मंत्रांत "वाणिज" ह्याही एक शब्द आहे. पूर्वापारसंबंधावरून याची गणना व्यापारविभागावर राजाधिकारी म्हणून केलेली असते हें समजून येईल. हे सर्व रुद्रच होत. प्रथम सांगितलेल्या अर्थाची संगति या मंत्रांत कसकशी लावतां येते, तें वाचकांनीं पहावें व त्यावरून रुद्र शब्दाचा अर्थ समजून घ्यावा. चोर, डाकू हे दुष्टां जनतेला रडकुंडीस आणतात. म्हणून त्यांनांही "रुद्र" च म्हटलेलें आहे. यांचें वर्णन पहा—

स्तेनानां पतये नमः । य० १६-२०
नमो वञ्चते परिवञ्चते स्तायूनां पतये नमः ॥
नमो निषंगिण इषुधिमते तस्कराणां पतये नमः ॥
नमः सृकायिभ्यो जिघांसद्भ्यो मुष्णतां पतये नमः ।
नमोऽसिमद्भ्यो नक्तंचरद्भ्यो विकृन्तानां पतये नमः ।
य० १६-२१

( स्तेनानां पतये ) चोरांच्या अधिपतिला ( नमः ) शस्त्र किंवा दंड दिला जावा. ( वंचते, परिवञ्चते स्तायूनां पतये ) ठकविणाऱ्या, नाना प्रकारांनीं ठकविणाऱ्या, लुटारूंच्या नायकाला दंड

दिला जावा. ( निषंगिणे इषुधिमते तस्कराणां पतये नमः ) खड्ग धारण करणाऱ्या बाणधारी चोरांच्या स्वामीला दंड दिला जावा. ( सृकायिभ्यः जिघांसद्भ्यः मुष्णतां पतये नमः ) शस्त्रधारी घातपात करणाऱ्या डाकूंच्या मुख्याला दंड द्यावा. ( असिमद्भ्यः नक्तंचरद्भ्यः विकृन्तानां पतये नमः । ) तलवार धारण करून रात्रीच्या वेळीं भटकणाऱ्या व कापाकापी करणाऱ्यांच्या मुख्यांना दंड द्यावा.

या मंत्रांत स्तेन आदि जे शब्द आहेत ते सर्व रुद्रांचेंच स्वरूप किंवा रुद्रदेवतेची विभूति दाखविणारे आहेत. हे रुद्र जनतेला रडकुंडीस आणतात ही गोष्ट सर्वांना माहीत आहे. चोर, डाकू, खुनी, लुटारू हे सर्व जनतेला नाना परि सतावून सोडतात. हे रडकुंडीस आणतात ह्मणून यांना रुद्र ह्मणतात. राजे व राजपुरुष दुष्टांना रडकुंडीस आणतात ह्मणून ते रुद्र होत व चोर आदि दुष्ट लोक जनतेला रडकुंडीस आणतात ह्मणून तेही रुद्रच होत. ही राजे, राजपुरुष व चोर यां विषयींची गोष्ट वाचकांनीं येथें लक्षांत ठेवावी. दोघांमध्यें ही रडकुंडीस आणण्याचा धर्म समान आहे, परंतु " नमः " शब्दाच्या अर्थांत भेद आहे. " नमः " शब्दाचे अर्थ " नमन, वज्र शस्त्र, दण्ड, मेघांतील विद्युत् " इत्यादि आहेत. वज्र, शस्त्र व दंड हे शत्रूला व दुष्टांना नमवितात ह्मणून यांना " नमः " असें ह्मणतात. या ठिकाणीं सुद्धां " नमः " चा यौगिक अर्थ वाचकांना दिसून येईल. नमः शब्दाचा हा अर्थ निघण्टु नांवाच्या वैदिक कोशांत दिला आहे. वज्रामध्येंच दुष्टांना नम्र बनविण्याचें सामर्थ्य आहे. ह्मणून वज्रालाही " नमः " असें ह्मणतात.

या अर्थाची मदत घेऊनच वरील मंत्रांत नमः चा अर्थ शस्त्र किंवा दंड असा केला आहे.

परमात्मा दुष्टांना रडवितो ह्मणून परमात्म्याचें नांव रुद्र आहे. असें असतां रुद्रांच्या रूपांत "चोरांचा प्रवेश कसा झाला?" अशा तऱ्हेची शंका येथें वाचकांच्या मनांत उत्पन्न होणें साहजिक आहे. या शंकेचें समाधान एक मोठा लेख लिहूनच होऊं शकेल. तथापि आह्मी येथें अतिसंक्षेपानेंच या शंकेचें समाधान करणार आहों. वाचकांनीं याचा विचार करावा.

अंतःकरणाच्या गुहेंत परमात्मा लपलेला असतो; चोरही डोंगरपर्वतांच्या गुहांतून लपलेला असतो. कितीही शोधण्याचा प्रयत्न केला तरीही परमात्मा प्रत्यक्ष होत नाहीं; त्याचप्रमाणें प्रवीण चोरसुद्धां प्रत्यक्ष सहसा होत नाहीं. चोर ज्याप्रमाणें न समजतां धन लांबवितो, त्याप्रमाणें परमेश्वरही ज्या दुष्ट मनुष्याचें धन लांबवावयाचें असेल, तें त्यास न समजतांच लांबवितो. याप्रमाणें कवीच्या दृष्टीनें समानता पहावयाची झाली, तर परमेश्वर व चोर यांच्यामध्यें समानता कशांत आहे व विषमता कोठें आहे याचें ज्ञान वाचकांना होईल. हा विषय अतिशय गूढ असून यावेळीं तो पूर्णपणें समजणें कठीण आहे; ह्मणून येथें इतकेंच पुरे आहे. पुढें वाचकांची जसजशी अधिक गति वेदामध्यें होईल, तसतशी आपोआपच खात्री होईल.

---

## पाठ ८

( महाभारत भीष्मपर्व अ० १०० )

सञ्जय उवाच ।

अभिमन्युः रथोदारः पिशङ्गैस्तुरगोत्तमैः ।
अभिदुद्राव तेजस्वी दुर्योधनबलं महत् ॥ १ ॥
विकिरञ्शरवर्षाणि वारिधारा इवाम्बुदः ।
न शेकुः समरे क्रुद्धं सौभद्रमरिसूदनम् ॥ २ ॥

शस्त्रौघिणं गाहमानं सेनासागरमक्षयम् ।
निवारयितुमप्याजौ त्वदीयाः कुरुनन्दन ॥ ३ ॥
तेन मुक्ता रणे राजञ्शराः शत्रुनिबर्हणाः ।
क्षत्रियाननयञ्शूरान्प्रेतराजनिवेशनम् ॥ ४ ॥
यमदण्डोपमान्घोराञ्ज्वलिताशीविषोपमान् ।
सौभद्रः समरे क्रुद्धः प्रेषयामास सायकान् ॥ ५ ॥
स रथान्रथिनस्तूर्णं हयांश्चैव ससादिनः ।
गजारोहांश्च सगजान्दारयामास फाल्गुनिः ॥ ६ ॥
तस्य तत्कुर्वतः कर्म महत्संख्ये महीभृतः ।
पूजयाञ्चक्रिरे हृष्टाः प्रशशंसुश्च फाल्गुनिम् ॥ ७ ॥
तान्यनीकानि सौभद्रो द्रावयामास भारत ।
तूलराशिमिवाकाशे मारुतः सर्वतो दिशम् ॥ ८ ॥
तेन विद्राव्यमाणानि तव सैन्यानि भारत ।
त्रातारं नाध्यगच्छन्त पङ्के मग्ना इव द्विपाः ॥ ९ ॥
विद्राव्य सर्वसैन्यानि तावकानि नरोत्तम ।
अभिमन्युः स्थितो राजन्विधूमोऽग्निरिव ज्वलन् ॥ १० ॥
न चैनं तावका राजन्विषेहुररिघातिनम् ।
प्रदीप्तं पावकं यद्वत्पतङ्गाः कालचोदिताः ॥ ११ ॥
प्रहरन्सर्वशत्रुभ्यः पाण्डवानां महारथः ।
अदृश्यत महेष्वासः सवज्र इव वासवः ॥ १२ ॥
हेमपृष्ठं धनुश्चास्य ददृशे विचरद्दिशः ।
तोयदेषु यथा राजन्भ्राजमाना शतह्रदा ॥ १३ ॥
शराश्च निशिताः पीता निश्चरन्ति स्म संयुगे ।
वनात्फुल्लद्रुमाद्राजन्भ्रमराणामिव व्रजाः ॥ १४ ॥
तथैव चरतस्तस्य सौभद्रस्य महात्मनः ।
रथेन काञ्चनाङ्गेन ददृशुर्नान्तरं जनाः ॥ १५ ॥

मोहयित्वा कृपं द्रोणं द्रौणिं च सबृहद्बलम् ।
सैन्धवं च महेष्वासो व्यचरल्लघु सुष्ठु च ॥ १६ ॥
मण्डलीकृतमेवास्य धनुः पश्याम भारत ।
सूर्यमण्डलसंकाशं दहतस्तव वाहिनीम् ॥ १७ ॥
तं दृष्ट्वा क्षत्रियाः शूराः प्रतपन्तं तरस्विनम् ।
द्विफाल्गुनमिमं लोकं मेनिरे तस्य कर्मभिः ॥ १८ ॥
तेनार्दिता महाराज भारती सा महाचमूः ।
बभ्रमत्तत्र तत्रैव योषिन्मदवशादिव ॥ १९ ॥
द्रावयित्वा महासैन्यं कम्पयित्वा महारथान् ।
नन्दयामास सुहृदो मयं जित्वेव वासवः ॥ २० ॥
तेन विद्राव्यमाणानि तव सैन्यानि संयुगे ।
चक्रुरार्तस्वनं घोरं पर्जन्यनिनदोपमम् ॥ २१ ॥
श्रुत्वा तु निनदं घोरं तव सैन्यस्य भारत ।
मारुतोद्धतवेगस्य सागरस्येव पर्वणि ।
दुर्योधनस्तदा राजन्नार्ष्यशृङ्गिमभाषत ॥ २२ ॥

सञ्जय उवाच=तेजस्वी रथोदारो रथश्रेष्ठः अभिमन्युः विशं-सैस्तुरगोत्तमैः महत् दुर्योधनवलं अभिदुद्राव ॥१॥ अम्बुदा वारि-धारा इव शरवर्षाणि विकिरन् । अरिसूदनं शत्रुनाशकं सौभद्रं सु-भद्रापुत्रं अभिमन्युं समरे कुरुं न शेकुः॥२॥ हे कुरुनंदन ! त्वदीयाः स्वपक्षीयाः अक्षयं सेनासागरं गाहमानं क्षत्रौघिणं अभिमन्युं आजौ युद्धे निवारयितुं अपि न शेकुः ॥ ३ ॥ हे राजन् ! तेन अभिमन्युना रणे मुक्ताः शत्रुनिबर्हणाः शत्रुनाशकाः शराः बाणाः शूरान् क्षत्रि-यान् प्रेतराजनिवेशनं यमसदनं अनयन् ॥ ४ ॥ समरे क्रुद्धः सौभद्रः ज्वलिताशीविषोपमान् यमदण्डोपमान् घोरान् सायकान् बाणान् प्रेषयामास ॥ ५ ॥ स फाल्गुनिः फाल्गुनस्य अर्जुनस्य पुत्रः
*

तूर्णं सायकं सरथान् रथिनः, ससादिनो हयान्, सगजान् गजारो-
हान् च दारयामास ॥ ६ ॥ तस्य तन्महत्कर्म संख्ये युद्धे कुर्वतः
दृष्ट्वा महीभृतो राजानः कालानि अभिमन्युं पूजयांचक्रिरे तं प्रश-
शंसुश्च ॥ ७ ॥ हे भारत ! सौभद्रः तानि अनीकानि सर्वतो दिशं
द्रावयामास, मारुतः तूलराशीन् आकाशे इव ॥ ८ ॥ हे भारत !
तेन विद्राव्यमाणानि तव सैन्यानि, पंके कर्दमे मग्ना द्विपा गजा
इव, त्रातारं नाध्यगच्छन्त न लब्धवन्तः ॥ ९ ॥ हे नरोत्तम ! ताव-
कानि सर्वसैन्यानि विद्राव्य, हे राजन् ! विधूमोऽग्निरिव ज्वलन्
अभिमन्युः स्थितः ॥ १० ॥ हे राजन् ! एवं अरिघातिनं अभिमन्युं
तावका योधाः न विषेहुः । कालचोदिताः कालप्रेरिताः पतंगा
यद्वत् प्रदीप्तं पावकम् ॥ ११ ॥ पांडवानां महारथः महेष्वासः अभि-
मन्युः सर्वशत्रुभ्यः प्रहरन् सवज्रो वासव इंद्र इव अदृश्यत ॥ १२ ॥
हे राजन् ! अस्य हेमपृष्ठं धनुः दिशः विचरत् ददृशे । यथा तोयदेषु
मेघेषु शतह्रदा विद्युत् राजमाना ॥ १३ ॥ हे राजन् ! निशिताः
पीताः शराः संयुगे युद्धे निश्चरन्ति स्म । फुल्लद्रुमात् वनात् भ्रम-
राणां व्रजा इव ॥ १४ ॥ तथैव तस्य महात्मनः सौभद्रस्य चरतः
काञ्चनीयेन रथेन अन्तरं जना न ददृशुः ॥ १५ ॥ कृपं द्रौणिं
अश्वत्थामानं, सबृहद्बलं बृहद्बलेन सहितं सैन्धवं सिंधुराजानं
मोहयित्वा महेष्वासो महाधनुर्धारी लघु सुष्ठु च व्यचरत् ॥ १६ ॥
हे भारत ! अस्य तव वाहिनीं दहतः धनुः मंडलीकृतं सूर्यमंडल-
संकाशं एव पश्याम ॥ १७ ॥ शूराः क्षत्रियाः तं तरस्विनं प्रतपन्तं
दृष्ट्वा, तस्य कर्मभिः इमं लोकं भूलोकं द्विफाल्गुनं मेनिरे ॥ १८ ॥
हे महाराज ! सा भारती महाचमूः तेन अर्दिता ॥ मदविह्वला योषि-
दिव तत्र तत्रैव व्यभ्रमत् ॥ १९ ॥ महासैन्यं द्रावयित्वा, महारथान्
कंपयित्वा, सुहृदः नंदयामास, वासव इन्द्रो मयं जित्वा इव ॥ २० ॥
तेन संयुगे विद्राव्यमाणानि तव सैन्यानि पर्जन्यनिनदोपमं घोरं

आर्तस्वनं चमूः ॥ २१ ॥ हे भारत ! मारुतोद्धतवेगस्य सागरस्य पर्वणि इव, तव सैन्यस्य तं घोरं निनदं श्रुत्वा हे राजन् ! तदा दुर्योधनः आर्ष्यशृङ्गिं अलंबुषं राक्षसमभाषत ॥ २२ ॥

## समासाः ।

१ तुरगोत्तमः = तुरगेषु उत्तमः ।
२ दुर्योधनबलं = दुर्योधनस्य बलम् ।
३ शरवर्षं = शराणां वर्षम् ।
४ सेनासागरः = सेना एव सागरः ।
५ प्रेतराजनिवेशनम् = प्रेतानां राजा । तस्य निवेशनम् ।
६ यमदण्डोपमः = यमस्य दण्डः । तस्य उपमा यस्य ।
७ विधूमः = विगतः धूमः यस्मात् ।
८ फुल्लद्रुमं = फुल्लाः द्रुमा यस्मिन् ।
९ मारुतोद्धतवेगः = मारुतेन उद्धतः वेगः यस्य ।

शब्द.

तुरगः = घोडा
अम्बुदः = मेघ
तोयदः = ,,
जलदः = ,,
गाहमानः = प्रवेश करणारा
वाहिनी = सेना

प्रेतराजः = यम
तूलः = कापूस
पंकः = चिखल
द्विपः = हत्ती
कांचनं = सुवर्ण, सोनें
योषित् = स्त्री

# पाठ ९

## औषधि

वैदिक शब्दांची एक विशिष्ट पद्धति या पाठांत सांगावयाची आहे. कित्येक शब्दांचें प्रथमाक्षरच लुप्त होत असतें. औषधि किंवा ओषधि हा शब्द मुळांत "दोषधि" असा आहे. यांतील पहिल्या 'द्'काराचा लोप होऊन दोषधिचा ओषधि असा शब्द बनतो. याचा अर्थ

## दोष+धि=दोष धुवून काढणारी

असा होतो. शरिरांत जितके दोष, रोगबीजें किंवा आयुष्य क्षीण करणारीं कारणें असतात, त्या सर्वांना वनस्पति धुवून स्वच्छ करते; म्हणून वनस्पतीला वस्तुतः "दोष+धि" म्हटलें पाहिजे. परंतु तिला म्हणतात मात्र ओषधि. आतां यांविषयींचे कांहीं मंत्र पहाः—

या ओषधीः पूर्वा जाता देवेभ्यस्त्रियुगं पुरा ।
मनै नु बभ्रूणामहं शतं धामानि सप्त च ॥ ७५ ॥

यजु० १२-७५

( याः ओषधीः ) ज्या औषधी ( देवेभ्यः ) देवांच्या ( त्रियुगं पुरा पूर्वाः जाताः ) पूर्वी तीन युगें उत्पन्न झाल्या होत्या, त्या ( बभ्रूणां ) भरणपोषण करणाऱ्या औषधींचीं ( शतं सप्त च धामानि ) शंभर व सात स्थानें आहेत असें मी ( मनै नु ) मानतों.

शतं वो अम्ब धामानि सहस्रमुत वो रुहः ।
अधा शतक्रत्वो यूयमिमं मे अगदं कृत ॥ ७६ ॥

हे ( अम्ब ) रक्षक औषधि ! ( वः शतं धामानि ) तुमचीं शंभर स्थानें आहेत. ( उत वः रुहः सहस्रं ) व तुमचे अंकुर हजारों आहेत.

( अधा ) त्याचप्रमाणें ( यूयं शतक्रत्वः ) तुह्मी शंभर कर्में करणारी यनून ( इमं मे अगदं कृत ) या माझ्या रोग्याला निरोगी करा.

ओषधीः प्रतिमोदध्वं पुष्पवतीः प्रसूवरीः ।
अश्वा इव सजित्वरीर्वीरुधः पारयिष्णवः ॥ ७७ ॥

( पुष्पवतीः ) फुलें असणाऱ्या ( प्रसूवरीः ) सख देणाऱ्या औषधि ( वीरुधः ) वनस्पति ( पारयिष्णवः ) रोगांच्या पलीकडे पोंचविणाऱ्या आहेत, या ( अश्वा इव सजित्वरीः ) घोड्यांप्रमाणें वेगवान् अर्थात् आपलें कार्य करण्यास पूर्णपणें समर्थ आहेत. यांपासून ( प्रतिमोदध्वम् ) आनंदित व्हा !

ओषधीरिति मातरस्तद्वो देवीरुपब्रुवे ।
सनेयमश्वं गां वास आत्मानं तव पूरुषः ॥ ७८ ॥

औषधि ( मातरः ) माता आहेत. हे ( देवीः ) दिव्य औष-धींनो ! तसेंच हे पुरुषा ! ( तत् वः उपब्रुवे ) मी तुह्मांला असें सांगतों कीं ( अश्वं, गां, वासः, आत्मानं ) घोडा, गाय, वस्त्र व माझा आत्मा यांना ( सनेयं ) निरोगी होऊन मी प्राप्त करवीं.

( अहं यत् इमाः ओषधीः ) मी ज्या या औषधि ( वाजयन् हस्ते आदधे ) बल वाढवून हातांत पकडल्या, तर ( यथा पुरा जीवगृभः ) पूर्वीपासूनच रोगानें पकडलेला प्राणी ज्याप्रमाणें नाश पावतो त्याचप्रमाणें ( यक्ष्मस्य आत्मा नश्यति ) माझ्या रोगाचें बीजही नष्ट होतें.

यस्यौषधीः प्रसर्पथाङ्गमङ्गं परुष्परुः ।

ततो यक्ष्मं वि बाधध्व उग्रो मध्यमशीरिव ॥ ८६ ॥

हे औषधींनो ! ( उग्रः ) क्षत्रिय ( मध्यमशीः इव ) मधलीं मधलीं मर्मस्थानें ज्याप्रमाणें कापून काढतो, त्याप्रमाणें ( यस्य अंगं अंगं परुः परुः ) ज्याच्या अंगांच्या प्रत्येक भागांत जोडीजोडीनें तुम्ही ( प्रसर्पथ ) प्रवेश करतां ( ततः यक्ष्मं वि बाधध्व ) त्या त्या ठिकाणीं तुम्ही रोगांना प्रतिबंध करा !

याः फलिनीर्या अफला याश्च पुष्पिणीः ।

बृहस्पतिप्रसूतास्ता नो मुञ्चन्त्वंहसः ॥ ८९ ॥

( याः फलिनीः ) ज्या फळें येणाऱ्या, ( या अफलाः ) ज्या फळें न येणाऱ्या व ( याः च पुष्पिणीः ) ज्या फुलें येणाऱ्या औषधि आहेत, ( ताः बृहस्पतिप्रसूताः ) त्यांची ज्ञात्या मनुष्याकडून योजना झाल्यावर ( नः अंहसः मुञ्चतु ) आमचा पापरूपी रोगापासून त्या बचाव करोत.

या ओषधीः सोमराज्ञीर्बह्वीः शतविचक्षणाः ।

तासामसि त्वमुत्तमाऽरं कामाय शं हृदे ॥ ९२ ॥

( सोम-राज्ञीः ) ज्या औषधींचा राजा सोम आहे व ( बह्वीः शतविचक्षणाः ) पुष्कळ शेंकडों प्रकारच्या शुभ गुणांनीं युक्त आहेत ( तासां त्वं उत्तमा असि ) त्यांमध्यें तूं उत्तम आहेस ( कामाय अरं ) व इच्छित कार्याला पर्याप्त व ( हृदे शं ) हृदयाला आनंददायक आहेस.

या ओषधीः सोमराज्ञीर्विष्ठिता पृथिवीमनु ।
बृहस्पतिप्रसूता अस्यै संधत्त वीर्यम् ॥ ९३ ॥

ज्या सोमराजाच्या राज्यामध्यें राहणाऱ्या औषधि पृथ्वीवर ( अनु-वि-स्थिताः ) येऊन राहिल्या आहेत, त्यांनी ( बृहस्पति-प्रसूताः ) विद्वानाकडून योजना झाल्यावर त्या ( अस्यै वीर्यं संधत्त ) याच्याकरतां वीर्य धारण करोत.

ओषधयः समवदन्त सोमेन सह राज्ञा ।
यस्मै कृणोति ब्राह्मणस्तं राजन्पारयामसि ॥ ९६ ॥

ब्राह्मण ज्यास आह्मांला देतो ( तं ) त्याला, हे राजन् ! ( पारयामसि ) आह्मी पार घेऊन जातों, असें सोमराजाबरोबर औषधि बोलतात.

नाशयित्री बलासस्यार्शस उपचितामसि ।
अथो शतस्य यक्ष्मणां पाकारोरसि नाशनी ॥ ९७ ॥

( बलासस्य ) कफ, ( अर्शसः ) मूळव्याधि, ( उपचितां ) सूज आदींचा ( नाशयित्री असि ) तूं नाश करणारी आहेस. ( अथो ) व ( यक्ष्मणां शतस्य ) रोगांच्या शेंकडों भेदांचा तसेंच ( पाकारोः ) पक्व होऊन उत्पन्न होणाऱ्या रोगांचा ( नाशनी असि ) नाशकर्त्री तूं आहेस.

याप्रमाणें वाचकांनीं औषधि-प्रकरणाचा अभ्यास करावा.

—::०::—

न किंचिदवमन्यन्ते नराः पण्डितबुद्धयः ॥ २६ ॥
निश्चित्य यः प्रक्रमते नान्तर्वसति कर्मणः ।
अवन्ध्यकालो वश्यात्मा स वै पण्डित उच्यते ॥ २७ ॥

आर्यकर्मणि रज्यन्ते भूतिकर्माणि कुर्वते ।
हितं च नाभ्यसूयन्ति पण्डिता भरतर्षभ ॥ २८ ॥

न हृष्यत्यात्मसंमाने नावमानेन तप्यते ।
गांगो हृद इवाऽक्षोभ्यो यः स पण्डित उच्यते ॥ २९ ॥

तत्त्वज्ञः सर्वभूतानां योगज्ञः सर्वकर्मणाम् ।
उपायज्ञो मनुष्याणां नरः पण्डित उच्यते ॥ ३० ॥

श्रुतं प्रज्ञानुगं यस्य प्रज्ञा चैव श्रुतानुगा ।
असंभिन्नार्यमर्यादः पण्डिताख्यां लभेत सः ॥ ३१ ॥

अश्रुतश्च समुन्नद्धो दरिद्रश्च महामनाः ।
अर्थांश्चाकर्मणा प्रेप्सुर्मूढ इत्युच्यते बुधैः ॥ ३२ ॥

स्वमर्थं यः परित्यज्य परार्थमनुतिष्ठति ।
मिथ्या चरति मित्रार्थे यश्च मूढः स उच्यते ॥ ३३ ॥

अकामान्कामयति यः कामयानान्परित्यजेत् ।
बलवन्तं च यो द्वेष्टि तमाहुर्मूढचेतसम् ॥ ३४ ॥

अमित्रं कुरुते मित्रं मित्रं द्वेष्टि हिनस्ति च ।
कर्म चारभते दुष्टं तमाहुर्मूढचेतसम् ॥ ३५ ॥

संसारयति कृत्यानि सर्वत्र विचिकित्सते ।
चिरं करोति क्षिप्रार्थे स मूढो भरतर्षभ ॥ ३६ ॥

श्राद्धं पितृभ्यो न ददाति दैवतानि न चार्चति ।
सुहृन्मित्रं न लभते तमाहुर्मूढचेतसम् ॥ ३७ ॥

अनाहूतः प्रविशति अपृष्टो बहु भाषते ।

पृथिवी ) ती आमची मातृभूमि आमच्या (भूतस्य भव्यस्य पत्नी) भूत-भविष्य-वर्तमानाची पालनकर्त्री आहे; ती ( नः उरुं लोकं कृणोतु ) आम्हांकरतां विस्तृत स्थान करो ! अर्थात् आम्हांला विस्तृत स्थान देवो !

[ २ ]

असंबाधं मध्यतो मानवानां यस्या उद्वतः प्रवतः समं बहु ।
नानावीर्या ओषधीर्या बिभर्ति पृथिवी नः प्रथतां राध्यतां नः ॥ २॥

( यस्याः मानवानां मध्यतः ) ज्या मातृभूमीतील-मनुष्यांच्या मध्यें ( उद्वतः, [illegible] वतः, समं बहु असंबाधं ) उच्चता, नीचता व समता यांविषयीं अत्यन्त निर्वैरता आहे व ( या नानावीर्या ओषधीः बिभर्ति ) जी नाना प्रकारच्या वीर्यांनीं युक्त असलेल्या औषधींचें धारणपोषण करते, ती ( नः पृथिवी ) आमची मातृभूमि ( नः प्रथतां राध्यतां ) आमच्या कीर्तीचें साधन करो. अर्थात् या मातृभूमीच्यामुळें आमची प्रसिद्धि होवो !

[ ३ ]

यस्याश्चतस्रः प्रदिशः पृथिव्या यस्यामन्नं कृष्टयः संबभूवुः ।
या बिभर्ति बहुधा प्राणदेजत्सा नो भूमिर्गोष्वप्यन्ने दधातु ॥ ४॥

( यस्याः पृथिव्याः चतस्रः प्रदिशः ) ज्या मातृभूमीच्या चारी दिशांतून ( कृष्टयः ) विविध होती ( यस्यां अन्नं संबभूवुः ) जिच्यामध्यें अन्न उत्पन्न करतात व त्यापासून ( या ) जी भूमि ( एजत् प्राणत् बहुधा बिभर्ति ) हिंडणाऱ्या व फिरणाऱ्या प्राणिमात्रांना अनेक प्रकारांनीं पुष्ट करते, ( सा नो भूमिः ) ती आमची मातृभूमि आम्हांला ( गो॰ अपि अन्ने दधातु ) गाईमध्यें व समामध्यें धारण करो.

[ ४ ]

यस्यां पूर्वे पूर्वजना विचक्रिरे यस्यां देवा असुरानभ्यवर्तयन् ।
गवामश्वानां वयसश्च विष्ठा भगं वर्चः पृथिवी नो दधातु ॥ ५ ॥

( यस्यां पूर्वे पूर्वजना विचक्रिरे ) जिच्यामध्यें आमच्या प्राचीन पूर्वजांनीं विविध पराक्रम केले होते, ( यस्यां देवाः असुरान् अभ्यवर्तयन् ) ज्या मातृभूमीमध्यें देवांनीं असुरांचा पराभव केला होता, तसेंच जी ( गवां अश्वानां वयसः च विष्ठाः ) गाई, घोडे व बगळे आदि पक्षी यांना विशेष स्थान देते, ती ( नः पृथिवी ) आमची मातृभूमि आम्हांला ( भगं वर्चः दधातु ) ऐश्वर्य व तेज देवो !

अंक २०



# संस्कृत-स्वयं-शिक्षक.

( संस्कृत भाषा शिकण्याचा सोपा उपाय )

भाग २० वा.



लेखक व प्रकाशक
श्रीपाद दामोदर सातवळेकर
स्वाध्याय-मंडल, औंध, (जि० सातारा)



द्वितीय आवृत्ति



शके १८५२, सन १९३०



मूल्य ८ आने

दिक्षेचा देष्ट आपल्या कपाळीं न येतां, अधर्माचरण करणाऱ्यांनाच तो भोगावयास लागावा व ईश्वरी कृपेची संततधार आपणांवर वर्षत रहावी.

२

नमस्ते अस्तु विद्युते नमस्ते स्तनयित्नवे ।
नमस्ते भगवन्नस्तु यतः स्वः समीहसे ॥ यजु० ३६ । २१

हे ईश्वरा ! ( विद्युते ते नमः अस्तु ) विशेष तेजःस्वरूपी अशा तुला नमस्कार असो. ( स्तनयित्नवे ते नमः ) मोठा शब्द करणाऱ्या तुला माझा नमस्कार असो. हे ( भगवन् ) ऐश्वर्यसंपन्न ईश्वरा ! ( यतः ) ज्या स्थानापासून तूं ( स्वः ) आपल्या निजानंदांत निमग्न राहून ( सं ईहसे ) विविध चेष्टा अथवा प्रेरणा करतोस त्या स्थानीं ( ते नमः अस्तु ) तुला नमस्कार असो.

ईश्वर अत्यंत तेजस्वी, परम ऐश्वर्यानें युक्त, शब्दांचा प्रवर्तक तसाच अखंड आनंदमय आहे. म्हणून त्याला नमस्कार करणें योग्य आहे. त्याची पूजा करणें, तसेंच त्याची भक्ति करणेंही आवश्यक आहे.

( ३ )

यतो यतः समीहसे ततो नो अभयं कुरु ।
शं नः कुरु प्रजाभ्योऽभयं नः पशुभ्यः ॥ यजु० ३६ । २२

हे ईश्वरा ! ( यतः यतः ) ज्या ज्या स्थानापासून तूं ( सं ईहसे ) प्रेरणा करतोस ( ततः ) त्या त्या स्थानापासून ( नः अभयं कुरु ) तूं आम्हां सर्वांना अभयदान दे. ( नः प्रजाभ्यः ) आमच्या संततीला ( शं अभयं ) कल्याणकारक असें अभय ( कुरु ) दे आणि ( नः पशुभ्यः ) आमच्या सर्व पशूंनाही तुझें ( अभयं कुरु ) अभयदान असूं दे

ईश्वर आम्हां सर्वांना अभय देवो, आमची संतति आणि आमचे पशू यांना तो भयरहित करो, अर्थात् आम्हा सर्वांचे तो पूर्ण कल्याण करो. तो सर्व प्रकारें सर्वांचें कल्याण करीत ही असतो. परंतु येथें जी प्रार्थना आहे

तशा प्रकारची प्रार्थना मनुष्यानें करावी, व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या निर्भयवृत्तींत सदा रममाण व्हावें.

४

नमः सायं नमः प्रातर्नमो रात्र्या नमो दिवा ।
भवाय च शर्वाय चोभाभ्यामकरं नमः ॥
अथर्ववेद ११।२।१६

( भवाय ) सर्वांना उत्पन्न करणारा आणि ( शर्वाय ) सर्वांचें दुःख नाहींसे करणारा जो ईश्वर त्याला सायंकाळीं, प्रातःकाळीं, रात्रीच्या वेळीं व दिवसा ( नमः अकरम् ) मी नमस्कार करतों.

दिवसांतून सकाळीं, दुपारीं, सायंकाळीं व रात्रीं नियमाच्या वेळीं ईश्वराची स्तुति, प्रार्थना आणि उपासना भक्तीनें आणि प्रेमानें करावी.

५

ता अस्य नमसा सहः सपर्यन्ति प्रचेतसः ।
व्रतान्यस्य सश्चिरे पुरूणि पूर्वचित्तये वस्वीरनु स्वराज्यम् ॥
ऋग्वेद १।८४।१२

( स्वराज्यं अनु वस्वीः ) स्वराज्य प्राप्तिला अनुकूल असा उद्योग करणारे ( ताः प्रचेतसः ) ते ज्ञानी लोक ( अस्य सहः ) या ईश्वरी शक्तीची ( नमसा सपर्यन्ति ) नमस्कारानें पूजा करतात. तसेंच ( अस्य पुरूणि व्रता ) या विविध नियमांचें ( सश्चिरे ) पालन करतात; म्हणून त्यांपासून ( पूर्व-चित्तये ) अपूर्व लाभाची प्राप्ति होते.

स्वतःचा उत्कर्ष इच्छिणाऱ्या सर्व लोकांनी परमेश्वरी शक्तीचें, परमेश्वराच्या महान् कृत्यांचें आणि त्याच्या अमर सत्तेचें चिंतन करावें आणि भक्तीनें त्याची पूजा करावी. असें करण्यानें त्यांना अपूर्व लाभ होतील.

( ६ )

यदिन्द्र ब्रह्मणस्पतेऽपि मृषा चरामसि ।
प्रचेता न अङ्गिरसो दुरितात्पात्वंहसः ॥

अथर्ववेद ६।४५।२

हे ( इन्द्र ) प्रभो ! हे ( ब्रह्मणस्पते ) ज्ञानाच्या स्वामी ! ( यत् ) जर ( अपि मृषा चरामसि ) आम्हाकडून असत्य आचरण घडलें असेल तर ( दुरितात् अंहसः ) त्या सर्व पापापासून ( आंगिरस प्रचेता ) विशेष ज्ञानी व विद्वान् ( न पातु ) आमचें रक्षण करो

या जगाचा प्रभु एकच आहे व तो सर्वज्ञ आहे; तो सर्वांहून श्रेष्ठ आहे कोणीही मनुष्य परमेश्वराला न समजू देता कोणतेंही पाप करू शकत नाहीं. म्हणून ईश्वराची भक्ति करावी व श्रद्धायुक्त होऊन त्याची प्रार्थना करावी की, " हे परमेश्वरा, आमच्या हातून वाईट कृत्य कधीं ही न घडेल व पापापासून आमचा बचाव होईल अशा प्रकारची प्रेरणा तू आम्हा सर्वांना करावीस "

## सूचना.

याप्रमाणें मन्त्रांतील शब्दांचा अर्थ पहावा आणि शब्दार्थांचें मनन करून मंत्रातील भावार्थ समजून घेण्याचा प्रयत्न करावा म्हणजे लहान मन्त्रातून ही गंभीर भावार्थ निघू शकतो, कारण भावार्थांत प्रत्येक शब्दाच्या अर्थाच्या स्पष्टीकरणाबरोबरच त्यांतील तात्पर्यही घ्यावयाचें असतें या पद्धतीनें अभ्यास करणाऱ्यांना फारच फायदा होतो

---

# पाठ २ रा.

## वैदिक स्वर.

**उदात्तश्चानुदात्तश्च स्वरितश्च स्वरास्त्रयः ।**
**ऱ्हस्वो दीर्घः प्लुत इति कालतो नियमा अचि ।। शिक्षा.११.**

उदात्त, अनुदात्त व स्वरित असे तीन प्रकारचे स्वर आहेत व उच्चारण्यास लागणाऱ्या लघु अथवा दीर्घ कालाप्रमाणें ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत असेही स्वरांचे तीन भेद होतात.

यांपैकीं उदात्त, अनुदात्त, व स्वरित हे स्वराच्या खालीं वर आघातानें व्यक्त होतात व ऱ्हस्व, दीर्घ आणि प्लुत यांना स्वरोच्चारास लागणारा *अल्प व दीर्घ काल कारणीभूत होतो.*

ऱ्हस्व स्वर— अ, इ, उ, ऋ, ऌ.
दीर्घ स्वर— आ, ई, ऊ, ॠ, ए, ऐ, ओ, औ.

ऱ्हस्व स्वराचा काळ एक मात्रा, दीर्घ स्वराचा काळ दोन मात्रा आणि प्लुत स्वराचा काळ तीन मात्रा आहे. ऱ्हस्व स्वर दुप्पट लांब उच्चारला असतां तो दीर्घ स्वर बनतो. व दीर्घ स्वर अधिक दीर्घ उच्चारल्यानें प्लुत स्वर बनतो. उदाहरणार्थः—

ऱ्हस्व – हे राम ।
दीर्घ – हे रामा २ऽ-ऽ- ।
प्लुत – हे रामा ३ऽ-ऽ-ऽ- ।

**अकार दुप्पट लांब केला कीं दीर्घ बनतो व तिप्पट लांब केला कीं प्लुत बनतो. हाच *नियम इतर स्वरांना हि लागू आहे.***

ऱ्हस्व स्वरांना गुरुत्व प्राप्त करून देणारीं *अन्य कारणें आहेत तीं पुढील* प्रमाणेंः—

१ ऱ्हस्व स्वर अनुस्वारयुक्त असल्यास तो गुरु समजला जातो. असें–' रामं, ' यांतील अन्त्य अकार हा गुरु आहे.

२ विसर्गयुक्त ऱ्हस्व स्वर असेल तर तो हा गुरु समजला जातो. जसें, ' रामः ' यांत विसर्गांच्या पूर्वी असलेला अकार गुरु आहे.

३ संयुक्त अक्षराच्या पूर्वीचा ऱ्हस्व स्वर दीर्घ अथवा गुरु मानतात. जसें " इन्द्र " शब्दांतील " न्द्र " हें जोडाक्षर पुढें आल्यानें मागील ऱ्हस्व इकार गुरु मानतात

४ या नियमास अपवाद– प्र आणि ह्र या संयुक्त अक्षरापूर्वी येणारा ऱ्हस्व स्वर विकल्पानें गुरु समजला जातो. अर्थात् जरूरीप्रमाणें तो ऱ्हस्व अथवा दीर्घ समजला येतो.

५ पदापर्यंत चरणाच्या शेवटचा स्वर ऱ्हस्व असला तरी तो दीर्घ स्वराप्रमाणें समजतात.

याप्रमाणें परिस्थितिप्रमाणें ऱ्हस्व स्वर गुरु समजला जातो. ऱ्हस्व स्वराची एक मात्रा, दीर्घ स्वराच्या दोन आणि प्लुत स्वराच्या तीन मात्रा असतात. छंदोबद्ध रचना करावयाच्या वेळीं या मात्रा मोजाव्या लागतात.

दुसऱ्यांना हाक मारण्याच्या वेळीं बहुधा प्लुत स्वर उच्चारला जातो, जसें, " हे रामा ३ऽऽऽ ! " ऱ्हस्व आणि दीर्घ स्वराचा उच्चार आपण शब्द उच्चारतांना सर्वत्र करतों. ऱ्हस्व, दीर्घ अथवा प्लुत स्वरोच्चारण हें स्वर उच्चारतांना आपण जो थोडा अथवा दीर्घ काळ घेतों, त्यावर अवलंबून असतें हें यावरून लक्षात येईलच.

यापूर्वी असें सांगितलें आहे कीं, स्वराच्या उच्च, नीच किंवा संयुक्त आघातामुळें स्वराचे उदात्त, अनुदात्त आणि स्वरित असे तीन भेद होतात; अर्थात् हे स्वर आघाताचे आहेत. वैदिक भाषा सध्यां प्रचलित नसल्यानें या आघातांच्या स्वरूपाची बरोबर कल्पना आपणांस करतां येत नाहीं; तथापि बहुतेक सर्व भाषेत न्यूनाधिक प्रमाणानें हे आघात पहावयास

सापडतात इंग्रजी भाषेंत कांहीं विशेष स्वरावर (दाब) जोर देतात व कांहींवर देत नाहींत मराठी भाषेंत ही तसेंच आहे जसें, 'ही गोष्ट असीच आहे' यांत 'शी' अक्षरावर जोर आहे. हे आघात निरनिराळ्या भाषेत निरनिराळ्या तऱ्हेनें देतात एवढेंच ! परंतु आघात दिले जातात यांत शंका नाहीं

वेदमंत्रात हे आघात अथवा दाब अक्षराच्या खालीं आडवी व अक्षरावर उभी रेघ मारून दाखविले जातात तशींच अन्य पुष्कळ चिन्हें आहेत. तीं खालीं दिलेल्या वाजसनेयि संहितामंत्रावरून दिसून येतील

पुवित्रेस्त्थोवैष्ण्णव्युसवितुर्वं÷प्प्रसुवऽउत्त्पुनाम्म्यच्छिद्रेणपुवित्रेणसूर्य्यस्यरुश्मिभि÷ ॥ देवीरापोऽअग्ग्रेगुवोऽअग्ग्रेपुवोग्ग्रऽइममुद्द्ययुज्ञन्नंयताग्ग्रेयुज्ञपंतिर्ठ॰मुधातुंय्युज्ञपंतिन्देवुयुवंम ॥ १२ ॥

यावरून स्वरोच्चार करण्याचीं किती चिन्हें या मंत्रात आहेत तें दिसून येईल ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद यांच्या मंत्राच्या उच्चाराचीं चिन्हें भिन्नभिन्न आहेत, परंतु येथें आपणास त्या सर्वांचा विचार करण्याचें कारण नाहीं, फक्त आपणांस उदात्त, अनुदात्त व स्वरित एवढ्याचाच विचार कर्तव्य आहे. हीं स्वरचिन्हें महत्वाचीं आहेत व इतर चिन्हें गौण आहेत

या वैदिक स्वराचा उच्चार भिन्नभिन्न रीतीनें होतो, अर्थातच उदात्त, अनुदात्त आणि स्वरित स्वर भिन्नभिन्न रीतीनें उच्चारले जातात या स्वरोच्चारणांत जर अशुद्धपणा आला तर अर्थाचा अनर्थ ही घडून येतो. म्हणून वेदोच्चार करण्यासाठीं या स्वराचें अचूक ज्ञान होणें फारच अवश्य आहे

अग्निमींळे पुरोहितं युज्ञस्यं देवमृत्विजंम् ।
होतांरं रत्नुधातंमम् ॥ ऋ. १।१।१

या मंत्रांत कांहीं अक्षरांच्या खालीं, तर कांहीं अक्षरांच्या डोक्यावर रेघा आहेत व कित्येक अक्षरें रेघारहित आहेत. हीं स्वरचिन्हें अशीं कां येतात व त्यांचा या अक्षरांशीं काय संबंध असतो तें आतां पहावयाचें आहे.

यासंबंधीं पुढील ४थ्या पाठांत जें सांगितलें आहे त्याचा लक्षपूर्वक अभ्यास केल्यास या विषयासंबंधीं अवश्य तें ज्ञान मिळण्यास अडचण पडणार नाहीं म्हणून वाचकांनीं या स्वरबोधक पाठाचें अध्ययन मननपूर्वक करून त्यापासून फायदा करून घ्यावा.



# पाठ ३ रा.

*या पाठांत वाचकांनीं खालीं दिलेल्या मंत्राचें अध्ययन करावें-*

१

पाहि नो अग्ने रक्षसः पाहि धूर्तेरराव्णः।
पाहि रीषत उत वा जिघांसतो बृहद्भानो यविष्ठ्य।

ऋ. १।३६।१५

हे ( बृहत्-भानो ) विशेष तेजस्वी ! हे ( यविष्ठ्य ) बलवान् ( अग्ने ) प्रकाशाच्या देवा, ईश्वरा ! ( नः ) आम्हां सर्वांचें ( रक्षसः ) राक्षसांपासून ( पाहि ) रक्षण कर. ( धूर्तेः अराव्णः ) धूर्त स्वार्थी लोकांपासून ( पाहि ) रक्षण कर. ( जिघांसत. ) ठार करण्याची इच्छा करणाऱ्या ( उत वा ) तसेंच ( रीषतः ) विनाश करणाऱ्या शत्रूंपासून ( पाहि ) आम्हां सर्वांचें रक्षण कर.

हे ईश्वरा ! तूं आम्हां सर्वांचा बचाव क्रूर, राक्षस, दुष्ट, धूर्त, स्वार्थी इत्यादि लोकांपासून कर. तूं सर्वांहून प्रबल, सर्वांना तेज देणारा व सर्वांना प्रेरणा करणारा आहेस, म्हणून आम्हां सर्वांना स्वतःचें रक्षण करण्यास समर्थ बनव आणि आम्हांला तेजस्वी व यशस्वी कर.

( २ )

विजानीह्यार्यान्ये च दस्यवो बर्हिष्मते रन्धया शासदव्रतान् ।
शाकी भव यजमानस्य चोदिता विश्वेत्ता ते सधमादेषु चाकन ॥
ऋ० १।५१।८

हे ईश्वरा ! ( आर्यान् विजानीहि ) आर्यांना अर्थात् सत्यधर्मीयांना जाण आणि ( ये च दस्यवः ) जे चोर, घातक अथवा हिंसक आहेत, अशांनाही जाण. ( बर्हिष्मते ) यज्ञ म्हणजे सत्कर्म करणाऱ्यासाठीं ( अ-व्रतान् ) नियम न पाळणाऱ्या लोकांना ( शासत् रंधय ) शासन करून तूं शिक्षा कर. तूं ( शाकी भव ) समर्थ आहेस. तसेंच तूं ( यजमानस्य चोदिता ) सत्कर्म करणाऱ्या पुरुषाला प्रेरणा करणारा आहेस. ( ते ) तुझीं ( ता विश्वा ) तीं तीं सर्व कर्में मी ( सधमादेषु ) आनंद प्राप्ति हाच ज्यांनी पुरुषार्थ तो साधण्या साठीं सहाय्यक व्हावीं म्हणून ( इत् चाकन ) खरोखर इच्छितों,

हे ईश्वरा ! आम्हां सर्वांत जे खरे धर्मात्मे, तसेंच जे दुराचारी, अधार्मिक व नियमाविरुद्ध आचरण करणारे आहेत त्या सर्वांना तूं पहा. जे सज्जन आहेत त्यांचें रक्षण कर व दुर्जन आहेत त्यांचें दंडन कर. तूंच हें सर्व कर्म करण्यास समर्थ आहेस. तूंच सर्वांना पुरुषार्थ करण्याची प्रेरणा देणारा आहेस आणि तुझी कृतिच आम्हां सर्वांचा आनंद वाढविण्याच्या कामीं सहाय्यकारी होत असते म्हणून आम्ही सर्व ही अशी प्रार्थना करतों.

अशा प्रकारचे मंत्र मनुष्यांना धर्माचे नियम घालून देण्याचें कार्य करीत असतात, म्हणून त्यांपासून जो बोध घेणें योग्य आहे, तो खालीं दिला आहे.

( १ ) प्रथम सज्जन कोण व दुर्जन कोण याचा विचार करावा. ( २ ) त्यांमध्यें पुरुषार्थी कोण व नियमभंग करणारे कोण हें ठरवावें. ( ३ ) नंतर सज्जनांचें रक्षण करून दुर्जनांना शिक्षा करावी. ( ४ ) आपलें सामर्थ्य वाढवावें. ( ५ ) सत्कृत्य करणारे पुरुषार्थी असतील त्यांना सहाय्य करावें. ( ६ ) या प्रकारें वर्तन करून इहलोकची उन्नति प्राप्त करून घ्यावी.

या प्रकारचा अर्थ निघणारे या मंत्राचे भाग पुढीलप्रमाणे आहेत.
"(१) आर्यान् विजानीहि ये च दस्यवः, (२-३) बर्हिष्मते शासत्, अव्रतान् रन्धय, (४) शाकी भव, (५) यजमानस्य चोदिता, (६) ते ता विश्वा सधमादेषु चाकन।"

व्यवहारांत याप्रमाणें मंत्रातून आपल्या आचरणासाठीं बोध प्राप्त करून घ्यावा. वेदांतील मंत्रापासून मानवी व्यवहारासंबंधीं बोध अशा प्रकारें मनुष्यास करून घेतां येतो.

वधैर्दुःशंसाँ अप दूढ्यो जहि दूरे वा ये अन्ति वा के चिदत्रिणः ।
अथा यज्ञाय गृणते सुगं कृध्यग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥
ऋ. १।९४।९

हे (अग्ने) प्रकाश देणाऱ्या ईश्वरा! (वधैः) वध करण्यास साधनाभूत अशा शस्त्रांनी (दुःशंसान्) दुष्ट (दूढ्यः) दुर्बुद्धियुक्त लोकांना (अपजहि) ठार कर. जे (दूरे वा ये अन्ति वा) दूर आहेत अथवा जवळ आहेत, तसेंच (ये के च) जे कोणी (अत्रिणः) सर्वभक्षक स्वार्थी आहेत त्या सर्वांना दूर कर. (अथा) नंतर (यज्ञाय गृणते) यज्ञ करणाऱ्याचा (सुगं कृधि) मार्ग सुगम कर. हे प्रभो! तुझ्याशीं (सख्ये) असलेल्या मैत्रीमुळें (वयं मा रिषाम) आमचा नाश न होवो.

हे ईश्वरा! दुष्ट दुर्जनांपैकीं जवळ अथवा दूर असणाऱ्या लोकांना मजपासून एकदम दूर कर. स्वार्थी, जे निवळ आपल्या पोटाच्या पाठीमागें लागणारे त्यांनाही योग्य तो दंड कर. तसेंच यज्ञ म्हणजे सत्कर्म करणाऱ्याच्या उन्नतीचा मार्ग सोपा कर. हे प्रभो! आम्ही तुझ्यापाशीं मित्रत्वानें वागलों तर आम्हाला कधींही कष्ट होणार नाहींत.

या मंत्रांतील व्यवहारोपयोगी बोध पुढीलप्रमाणें घेतां येईल (१) दुष्टाच्या अपराधांना योग्य शिक्षा द्यावी, (२) स्वार्थी व स्वतः च्या सुखोपभोगांत गुंग असणाऱ्यांना योग्य मार्गास लावावें, (३) सत्कर्मरत व

( ५ )

तवाहमग्न ऊतिभिर्मित्रस्य च प्रशस्तिभिः ।
द्वेषोयुतो न दुरिता तुर्याम मर्त्यानाम् ॥

ऋग्वेद ५ । ९ । ६

पदः- तव । अहम् । अग्ने । ऊतिभिः । मित्रस्य । च । प्रशस्तिभिः । द्वेषःऽयुतः । न । दुरिता । तुर्याम । मर्त्यानाम् ।

अन्वय- हे अग्ने ! मित्रस्य तव प्रशस्तिभिः ऊतिभिः द्वेषःऽयुतः न मर्त्यानां दुरिता तुर्याम ॥

अर्थ— हे ( अग्ने ) प्रकाश देणाऱ्या ईश्वरा ! ( मित्रस्य तव ) तूं जो मित्र त्या तुझ्या (प्रशस्तिभिः ऊतिभिः) प्रशंसनीय रक्षणांनीं सुरक्षित होऊन ( द्वेषः युतः न ) द्वेषयुक्त लोकांसारखे अहित करणारे जे ( मर्त्यानां ) मनुष्यप्राणी त्यांच्या ( दुरिता तुर्याम ) दुष्ट कृत्यांपासून दूर राहून आम्ही सुरक्षित असावें.

भावार्थ— हे ईश्वरा ! तूं आमचा मित्र व उत्तम संरक्षक आहेस. तुझ्या अद्भुत संरक्षणानें युक्त असलेले आम्ही दुष्ट मनुष्यांच्या कृतींपासून आमचा स्वतःचा बचाव करूं, कारण जो तुझ्या रक्षणाच्या कृपाछत्राखालीं आला, त्याला भेवडावण्यास या जगांत कोण समर्थ आहे ?

अग्नि हा शब्द आग अशा अर्थी आहे, परंतु अग्नीला ही ज्यानें निर्माण केला, त्या ईश्वराला ही वेदांत " अग्नि " असें नांव दिलेलें आहे.

" न " शब्द निषेधार्थी वापरण्यांत येतो, परंतु वेदांमध्यें तो " इव " ( सारखा ) या अर्थी योजतात.

याप्रमाणें वाचकांनीं अर्थ लिहिण्याचा व मंत्रही पाठ करण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे त्यापासून त्यांस अत्यंत लाभ होतील.

---

# पाठ ४ था
## वैदिक स्वर

वेदमंत्रातील अक्षराच्या शिरोभागीं अथवा खालीं उभ्या व आडव्या रेषा असतात त्यांना स्वर म्हणतात हे स्वर उच्च व नीच उच्चाराचे द्योतक आहेत या स्वराचे उदात्त, अनुदात्त आणि स्वरित असे तीन भेद असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे या रेषांना अनुसरून वर अथवा खालीं आघात करून मंत्राक्षरें उच्चारिलीं जातात व तसें करणें जरूरही आहे, तसें न केलें तर कधीं कधीं अगदीं विरुद्ध अर्थंही होत असतो.

उदात्त स्वराला कोणतेंही चिन्ह दिलें नसल्यानें स्वरचिन्हरहित अक्षराला उदात्त समजावें अनुदात्त स्वराचें चिन्ह म्हणजे अक्षराखालीं असणारी आडवी रेघ ( — ) होय, आणि स्वरित चिन्हाची खूण ही अक्षरा च्या डोक्यावर उभी असलेली रेषा ( । ) होय बहुधा प्रत्येक शब्दांत एक स्वर सोडून इतर सर्व स्वर अनुदात्त असतात

अनुदात्तं पदमेकवर्जम् ॥ अष्टाध्यायी ६।१।१५८

" पदातील एक स्वर सोडून बाकीचे स्वर अनुदात्त असतात "

उदात्ताचें उच्चारण उच्च, अनुदात्ताचें उच्चारण खालच्या भागावर जोर देऊन व स्वरिताचें उच्चारण या दोन्हींच्या संयुक्त उच्चाराप्रमाणें असतें.

उच्चैरुदात्तः । नीचैरनुदात्तः ।
समाहारः स्वरितः ॥ अष्टाध्यायी

उदात्ताचें उच्चारण उच्च, अनुदात्ताचें नीच व स्वरिताचें उच्चारण मिश्रित असतें

या वरील विवरणावरून सर्व गोष्टींचें बरोबर स्पष्टीकरण होईलच असें नाहीं, म्हणून थोडें अधिक सुबोध विवरण करणें जरूर आहे, वाचकांनीं लक्षांत ठेवावें कीं, वेदमंत्राचा उच्चार करतांना स्वरचिन्हाकडे लक्ष पुरविलें

अत्यंत जरूर आहे; अशुद्ध स्वरोच्चारानें मंत्राचा अर्थ बदलतो. यासंबंधीं व्याकरणांतील वचन पुढें दिलें आहे--

> मन्त्रो हीनः स्वरतो वर्णतो वा
>
> मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह ॥ शिक्षा ५२. ॥

स्वर आणि वर्ण यांचे चुकीचे उच्चार करण्यानें मंत्र हा आपला योग्य अर्थ प्रकट करूं शकत नाहीं. तसेंच--

> व्याघ्री यथा हरेत्पुत्रान्दंष्ट्राभ्यां न च पीडयेत् ।
>
> तद्वद्वर्णाः प्रयोक्तव्याः ॥ शिक्षा.

" वाघीण आपल्या पिलांना आपल्या जबड्यांत धरून नेते, पण तिचे दांत जसे तिच्या पिलांना पीडा करूं शकत नाहींत त्याप्रमाणें जपून अक्षरांचा उच्चार करावा. "

हें सर्व सांगण्याचें कारण इतकेंच कीं, प्रत्येकानें अक्षराचा उच्चार बरोबर रीतीनें करावा. म्हणूनच वेदाचें योग्य गुरूपाशीं अध्ययन करणें आवश्यक असतें. स्वराच्या चुकीच्या उच्चारकरण्यानें " इंद्रशत्रु " या शब्दाचा अगदीं विरुद्ध अर्थ कसा होतो, हें ही सोदाहरण शिक्षाग्रंथांत सांगून दिलें आहे. या सर्व विवेचनावरून वैदिक भाषेंत स्वरांचें महत्त्व किती आहे, हें वाचकांच्या लक्षांत येईल.

उदात्त, अनुदात्त आणि स्वरित स्वरांचा अथवा त्यांच्या चिन्हांचा संबंध केवळ स्वरांशींच असतो, यांचा व्यंजनांशीं बिलकुल संबंध नसतो, हें वाचकांना माहीत आहेच.

प्रत्येक शब्दांत एकाहून अधिक उदात्त स्वर मुळींच नसतो, हा सर्वसाधारण नियम पूर्वी सांगितला आहेच. सामासिक शब्दांत कांहीं ठिकाणीं एकाहून अधिक उदात्त स्वर येतात. या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेतल्यास शब्दांचे नऊ भेद होतात, असें वाचकांच्या लक्ष्यांत येईल. ते भेद खालील प्रमाणें--

१ अंतोदात्त- ज्यामध्यें शेवटचा स्वर उदात्त असतो. असें "अग्निः"
२ आद्योदात्त- ज्यामध्यें पहिला स्वर उदात्त असतो, असें "सोमः"
३ उदात्त— केवळ उदात्त स्वरानें युक्त असा शब्द. जसें "प्र"
४ अनुदात्त- फक्त अनुदात्त स्वरानें युक्त असा शब्द. असें "वः"
५ नीच स्वरित- खालील स्वरानें उच्चारला जाणारा स्वरित स्वराचा शब्द. जसें "वीर्यं"
६ मध्योदात्त- ज्यामध्यें मध्य स्वर उदात्त असतो असा शब्द. असें "हविषा ■
७ स्वरित- उदात्त व अनुदात्त या दोन्ही स्वरांच्या गुणधर्मांचा संयोग जेथें होतो असा स्वरयुक्त शब्द असें "स्वः"
८ द्व्युदात्त- ज्यांत दोन स्वर उदात्त असतात तो. असें "बृहस्पतिः"
९ त्र्युदात्त- ज्यामध्यें तीन स्वर उदात्त असतात तो. असें. "इन्द्रा-

२ नियम दुसरा— शब्दांत एकच स्वर असेल तर तो उदात्त असतो. जसें– " गौः, त्मा, क्ष्मा, भूः, आः, वां, स्नु, धीः, अर, स्मः, कः, यः, मा, तत्, यत्, ये, " इत्यादि शब्द एका स्वरानें युक्त असल्यानें त्या सर्व शब्दांतील स्वर उदात्त आहेत.

या नियमाला अपवाद म्हणजे अस्मद् किंवा युष्मद् शब्दाचीं " मा, त्वा, ते, मे, नः, वः, " इत्यादि एकस्वरयुक्त शब्द होत. त्यांत एकच स्वर असून ते अनुदात्त आहेत. तसेंच " चित्, इ, स्मीं, स्तुः " इत्यादि जरी एकच स्वर असलेले शब्द आहेत तरी ते सर्व अनुदात्त आहेत. तसेंच " स्वः " इत्यादि एकस्वरयुक्त शब्द स्वरितच आहेत. हे थोडेसे अपवाद वगळल्यास वरील नियम सर्व ठिकाणीं लागू पडतात. आतांपर्यंत आम्ही एक स्वर असलेल्या शब्दांचा विचार केला; आतां दोन अथवा अधिक स्वर असलेल्या शब्दांचा विचार करूं. यासाठीं पूर्वीचे कांहीं वैदिक शब्दसिद्धीचे नियम लक्षांत ठेवणें जरूर आहे—

१ निरुक्तकार व कांहीं व्याकरणकार असें मानतात कीं वेदांतील शब्द यौगिक आहेत अर्थात ते धातूंना प्रत्यय लागून झाले आहेत. " नाम च धातुजमाह " म्हणजे " नाम हें धातूपासून बनलेलें असतें " उदाहरणार्थ अग्नि शब्द " अग् " धातूला " नि " प्रत्यय लागून झाला आहे व वन्हि शब्द ' वह ' धातूला " नि " प्रत्यय लागून झाला आहे. याप्रमाणेंच इतर शब्द ही अन्य धातूंना अन्य प्रत्यय लागून बनलेले असतात.

यावरून असें अनुमान काढतां येतें कीं, धातु व प्रत्यय यांच्या स्वरांच्या अनुसंधानानें शब्दाचे स्वर निश्चित करतां येतात, हा नियम सर्वसाधारणपणें खरा असला तरी या नियमाला पुष्कळ अपवाद ही आहेत. भगवान् पाणिनी मुनींनि धातुसंबंधींच्या पाठांत धातूंचे स्वर दिले आहेत व व्याकरणांत प्रत्ययांचे स्वर ही दिले आहेत. जर धातूंचे व प्रत्ययांच्या स्वरांचें ज्ञान बरोबर रीतीनें झालें, तर त्यापासून बनणाऱ्या पदांचे स्वर सहज समजतील; परंतु त्याला ही बरेच अपवाद आहेत त्यांचा पुढें विचार करूं.

# पाठ ५ वा

या पाठांत खालील मंत्रांचे अध्ययन करावें.

१

विशां कविं विश्पतिं शश्वतीनां नितोशनं वृषभं चर्षणीनाम् ।
प्रेतीषणिमिषयन्तं पावकं राजन्तमग्निं यजतं रयीणाम् ॥

ऋग्वेद. ६।१।८

पद- विशां । कविं । विश्पतिं । शश्वतीनां । निऽतोशनं । वृषभं ।
चर्षणीनां । प्रेति । इषणिं । इषयन्तं । पावकं । राजन्तं ।
अग्निं । यजतं । रयीणाम् ।

अन्वय- शश्वतीनां विशां कविं विश्पतिं नितोशनं चर्षणीनां
वृषभं प्रेतीषणिं इषयन्तं पावकं रयीणां यजतं राजन्तं
अग्निं ( स्तमः ) ।

१

नाना ह्यग्नेऽवसे स्पर्धन्ते रायो अर्यः ।
तूर्वन्तो दस्युमायवो व्रतैः सीक्षन्तो अव्रतम् ॥
ऋग्वेद ६।१४।३

पद— नाना । हि । अग्ने । अवसे । स्पर्धन्ते । रायः । अर्यः । तूर्वन्तः । दस्युं । आयवः । व्रतैः । सीक्षन्तः । अव्रतम् ॥

अन्वय— अग्ने ! अर्यः नाना रायः अवसे स्पर्धन्ते, आयवः दस्युं तुर्वन्तः व्रतैः अव्रतं सीक्षन्तः ।

अर्थ—हे (अग्ने) तेजस्व्या देवा ! (अर्यः) शत्रूंचीं (नाना रायः) नानाप्रकारचीं धनें (अवसे स्पर्धन्ते) स्वतःच्या रक्षणार्थ मोठी खटपट करीत असतात. (आयवः) मनुष्यें (दस्युं) शत्रुला (तूर्वन्तः) नष्ट करणारीं आपल्या (व्रतैः) व्रताचरणांनीं (अ-व्रतं) व्रत म्हणजे धर्म न पाळणाऱ्या मनुष्याला (सीक्षन्त) पराभूत करतात व वैभवास चढतात.

भावार्थ— हे ईश्वरा ! शत्रूंचीं नानाप्रकारचीं धनें स्वतःच्या रक्षणार्थ प्रयत्न करून राहिलीं आहेत, पण त्या सर्वांचा प्रयत्न आतां निष्फळ आहे. कारण आमचीं मनुष्यें शत्रूचा पराभव करून आपल्या शुद्ध धर्माचरणानें अधार्मिकांचा पराभव करतात. अर्थात् आम्हीं नियमपालन करणाऱ्या लोकांच्या समोर शत्रू उभा राहूंच शकत नाहीं. हे ईश्वरा, ही तुमची आम्हांवर मोठी कृपा आहे.

२

सुवीरं रयिमाभर जातवेदो विचर्षणे ।
जहि रक्षांसि सुक्रतो । ऋग्वेद ६।१६।२९

पद— सुवीरं । रयिं । आ-भर । जातवेदः । वि-चर्षणे । जहि । रक्षांसि । सु-क्रतो ।

अन्वय- हे जातवेदः विचर्षणे! सुवीरं रयिं आभर, हे सु-क्रतो रक्षांसि जहि।

अर्थ— हे ( जात-वेदः ) सर्व जाणणाऱ्या, हे ( विचर्षणे ) सर्वसाक्षी ईश्वरा ! ( सुवीरं रयिं ) उत्तम वीरांनीं युक्त असें धन ( आ भर ) आम्हांला दे. हे ( सुक्रतो ) उत्तम कर्म करणाऱ्या ! ( रक्षांसि जहि ) दुष्टांचा नाश कर.

हे ज्ञानी सर्वसाक्षी ईश्वरा ! आम्हांला उत्तम वीरांनीं युक्त असें धन दे. तसेंच हे उत्तम कर्म करणाऱ्या ईश्वरा ! क्रूर कर्मे करणाऱ्या दुष्टांना दूर कर.

या मंत्रांत " सु-वीरं रयिं आभर " [redacted] शब्दप्रयोग अनंत महत्वाचा आहे. धन असें पाहिजे कीं त्याबरोबर शौर्याची ही जोड असली पाहिजे, ज्या संपत्तीला शौर्याची जोड असणार नाहीं तें धन सुरक्षित राहणें कठीण असतें. हा मंत्र असें शिकवितो कीं प्रत्येकानें आपलें धन रक्षण करण्यासाठीं आपल्या अंगीं सामर्थ्य आणलें पाहिजे. अशक्त मनुष्यांचें धन कोणीही हिरावून नेण्याचा संभव असतो.

अर्थ-( सु-त्रामा ) उत्तम रक्षक, ( स्ववान् ) आत्मिक शक्तीनें युक्त, ( सु-मृळीकः ) उत्तम सुख देणारा, ( विश्व-वेदाः ) सर्वज्ञ, ( इन्द्रः ) प्रभु, आपल्या ( अवोभिः ) संरक्षक शक्तींसह आमचा सहायक ( भवतु ) होवो. तो ( द्वेषः बाधतां ) द्वेष करणाऱ्यांना दूर करो. ( अभयं कृणोतु ) आम्हांला निर्भय करो. आम्ही ( सुवीर्यस्य पतयः स्याम ) उत्तम शौर्याचे स्वामी व्हावें

भावार्थ— परमेश्वर आमचें उत्तम रक्षण करणारा आहे, त्याच्या ठिकाणीं विलक्षण आत्मिक शक्ती आहे. तो सर्वांना सुख देणारा व सर्वज्ञही आहे. आपल्या रक्षण करणाऱ्या शक्तीनें तो आमचें रक्षण करो, द्वेषभाव नाहींसा करो व आम्हाला निर्भय करो. आम्ही त्याच्या कृपेनें शौर्य, धैर्य, वीर्य इत्यादि गुणांचे स्वामी बनावें.

(५)

तस्य वयं सुमतौ यज्ञियस्यापि भद्रे सौमनसे स्याम ।
स सुत्रामा स्ववाँ इन्द्रो अस्मे आराच्चिद् द्वेषः सनुतर्युयोतु ॥
ऋग्वेद ६।४७।१३

पद—तस्य । वयं । सुमतौ । यज्ञियस्य । अपि । भद्रे । सौमनसे । स्याम । सः । सु-त्रामा । स्व-वान् । इन्द्रः । अस्मे । आरात् । चित् । द्वेषः । सनुत । युयोतु ।

अन्वय— तस्य यज्ञियस्य सुमतौ भद्रे सौमनसे च वयं स्याम । सः सुत्रामा स्ववान् इन्द्रः अस्मे आरात् चित् द्वेषः सनुतः युयोतु ।

अर्थ— ( तस्य यज्ञियस्य ) त्या पूजनीय परमेश्वराच्या ( सुमतौ भद्रे सौमनसे च ) सुमतीच्या अथवा उत्तम मनाच्या आंत (वयं स्याम) आम्ही रहावें. अर्थात् आम्हीं असें आचरण ठेवावें कीं आमच्या विषयीं त्याचें मन नेहमीं प्रसन्न राहील. ( सः ) तो ( सु-त्रामा ) उत्तम रक्षक आणि ( स्ववान् ) आत्मशक्तीनें युक्त असा ( इन्द्र ) प्रभु आहे. तो ( अस्मे

आरात् चित् ) आमच्या जवळून अथवा दुरून ( द्वेषः ) द्वेष करणाऱ्या शत्रूंना ( सनुतः ) आंतल्या आंत ( युयोतु ) नष्ट करो.

भावार्थ— परमेश्वर परम पूज्य आहे. आम्ही असें आचरण करावें कीं, त्याचें मन आमच्याविषयीं नेहमीं प्रसन्न रहावें व त्याच्या दयेचा आनंद वर्षाव आमच्यावर होत रहावा. तो प्रभु आमचा उत्तम रक्षक, अप्रतिम आत्मिक बलानें संपन्न व सर्वश्रेष्ठ असा आहे. म्हणून आमची प्रार्थना आहे कीं आमच्या सर्व शत्रूंना त्यानें पिटाळून लावावें.

## सूचना.

याप्रमाणें पद, अन्वय, अर्थ व भावार्थ स्वतः लावण्याचा प्रयत्न करावा. यत्न करूनही न समजेल तर तितकें सहाय्य पद्यांचें व त्यांच्या अर्थांचें घ्यावें. याप्रमाणें स्वावलंबी बनल्यास वेदमंत्रांचा अर्थ करण्याच्या कामांत फारच लवकर प्रगती होईल.



# पाठ ६ वा.

## वैदिक स्वर.

भगवान् पाणिनिमुनींनीं आपल्या धातुपाठांत जवळ जवळ दोन हजार धातु दिले आहेत व त्यांचे दहा गण केलेले आहेत. या धातूंमध्यें कोणते धातु उदात्त व कोणते अनुदात्त हें सर्व त्यांनीं दिलेलें आहे.

त्याचप्रमाणें शब्दसिद्धीचे उदात्त, अनुदात्त अथवा स्वरित प्रत्यय कोणते तेंही सांगितलें आहे.

७ " होतारम् " या पदांत 'हो' उदात्त आहे, 'ता' अनुदात्त आहे, परंतु तो उदात्तानंतर आल्यानें वरीलप्रमाणेंच स्वरित झाला; नंतर 'र' हा अनुदात्त आहे परंतु तो अनुदात्तानंतर आल्यानें अनुदात्ततर झाला.

८ "रत्न-धा-तमम्" या शब्दांत रत्न हीं दोनही अक्षरें अनुदात्त आहेत. 'धा' उदात्त आहे या उदात्तानंतर अनुदात्त 'त' आल्यानें वर सांगितलेल्या नियमाप्रमाणें तो स्वरित झाला व त्याच्या नंतरचा 'म' मुळचा अनुदात्त असता अनुदात्ततर झाला.

आतापर्यंत पदाच्या स्वराविषयीं जें विवेचन केलें तें वाचकांनीं चांगलें समजेपर्यंत वारंवार मनन करावें, म्हणजे हा विषय त्यास चांगला समजेल हा विषय पक्का होण्याकरितां स्वरांचे नियम खालीं दिले आहेत.

( १ ) स्वरोच्चाराला जो कमी अधिक काळ लागतो त्याप्रमाणें स्वराचे "ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत," असे तीन भेद होतात.

( २ ) स्वराच्या आघाताप्रमाणें "उदात्त, अनुदात्त आणि स्वरित," असे तीन भेद होतात. उदात्ताचा आघात तोंडाच्या वरील भागांत, अनुदात्ताचा खालील भागांत आणि स्वरिताचा दोंनी भागांत होतो.

( ३ ) अनुदात्त स्वराचें चिन्ह अक्षराखालीं रेघ मारून दर्शवितात, उदात्तास चिन्ह नाहीं. स्वरिताचें चिन्ह अक्षरावर उभी रेघ मारून दर्शवितात.

( ४ ) प्रायः शब्दांत एक स्वर सोडून इतर सर्व स्वर अनुदात्त असतात

( ५ ) शब्दात एकच स्वर असेल तर तो प्रायः उदात्त असतो.

( ६ ) वेदांतील शब्द यौगिक आहेत. अर्थात् ते धातु आणि प्रत्यय लागून बनले आहेत.

( ७ ) धातूचे स्वर धातुपाठांत आणि प्रत्ययाचे स्वर व्याकरणांत सांगितलेले आहेत. या दोहोंचा मेळ घालून शब्दाचा स्वर निश्चित करतां येतो.

( ८ ) प्रायः पदाचा अन्त्य स्वर उदात्त असतो.

( ९ ) एका मागून एक स्वरित स्वर ( अक्षरावर उभ्या रेघा असलेले ) कधींही येत नाहींत. अनुदात्त चिन्हें मात्र एकामागून एक अशीं एकापेक्षां अधिकही येऊं शकतात.

( १० ) उदात्तामागून उदात्त आल्यास अन्त्य स्वर उदात्त राहून मागील अनुदात्त बनतो.

( ११ ) सर्व क्रियापदें बहुधा अनुदात्त असतात.

( १२ ) स्वरितानंतर अनुदात्त येईल तर त्या अनुदात्ताचें खालील चिन्ह लिहित नाहींत.

( १३ ) उदात्तानंतर अनुदात्त येईल तर तो स्वरित बनतो.

आतांपर्यंत इतके नियम सांगितले आहेत. हे नियम उदाहरणां सहित दिले आहेत. तरी वाचकांनीं मननपूर्वक अभ्यास केल्यास स्वरांसंबंधीं सर्व गोष्टी त्यांना समजतील; तरी याचें अध्ययन मनःपूर्वक केलें जाईल अशी आशा आहे.



# पाठ ७

या पाठात खाली दिलेल्या मंत्राचे अध्ययन करा:—

(१)

पाहि नो अग्ने रक्षसो अजुष्टात्पाहि धूर्तेररुषो अघायोः ।
त्वा युजा पृतनायूँरभिष्याम् ॥ ऋग्वेद ७ । १ । १३

पदच्छेदः— पाहि । नः । अग्ने । रक्षसः । अ-जुष्टात् । पाहि । धूर्तेः । अररुषः । अघ—आयोः । त्वा । युजा । पृतनायून् । अभि । स्याम् ।

अन्वय हे अग्ने ! अजुष्टात् रक्षसः नः पाहि । अररुषः धूर्तेः अघायोः नः पाहि । त्वा युजा पृतनायून् अभिष्याम् ॥

अर्थ— हे ( अग्ने ) तेजस्वी ईश्वरा ! ( अजुष्टात् ) दीन ( रक्षस ) राक्षसांपासून ( न पाहि ) आमचे सर्वांचे रक्षण कर ( अररुष धूर्ते ) अनुदार धूर्त ( अघ-आयोः ) अशा पापी लोकांपासून आमचा ( पाहि ) बचाव कर. ( त्वा युजा ) तुझ्या साहाय्याने असणारे आम्ही (पृतनायून्) सैन्य घेऊन चढाई करणाऱ्या शत्रूचा ( अभिष्याम् ) पराभव करू

भावार्थ– हे ईश्वरा ! दुष्ट, दुर्जन, धूर्त, धोकेबाज, पापी अशा लोकांपासून आमचे रक्षण कर तुझी कृपा आमच्यावर राहील तर आम्ही सर्व प्रकारच्या शत्रूचा पराभव करू शकू

(२)

यत इन्द्र भयामहे ततो नो अभयं कृधि ।
मघवञ्छग्धि तव तन्न ऊतिभिर्विद्विषो वि मृधो जहि ॥
ऋग्वेद ८ । ६१ । १३

पदः— यतः । इन्द्र । भयामहे । ततः । नः । अभयं । कृधि । मघवन् । शग्धि । तव । तत् । नः । ऊतिभि. । वि । द्विष । वि । मृधः । जहि ॥

अन्वय— हे इन्द्र ! यतः भयामहे, ततः नः अभयं कृधि। हे मघवन् ! शग्धि। तव ऊतिभिः नः द्विषः मृधः च वि वि जहि ॥

अर्थ– हे ( इन्द्र ) प्रभो! ( यतः भयामहे ) जेथून आम्हांस भीति वाटते ( ततः ) तेथून ( नः ) आम्हांला ( अभयं कृधि ) निर्भय कर. हे (मघवन् ) धनसंपन्न प्रभो ! तूं ( शग्धि ) शक्तिमान आहेस, म्हणून ( तव ऊतिभिः ) तुझ्या रक्षण करण्याच्या शक्तीच्या सामर्थ्यानें ( नः द्विषः ) आमचे शत्रु, तसेंच आम्हांला ( मृधः ) ठार करणारे जे लोक असतील त्यांना ( वि वि जहि ) पूर्ण पराभूत कर.

भावार्थ– हे परमेश्वरा ! आम्हांस निर्भय कर; कोठूनही आम्हांस भय प्राप्त न होवो. तूं समर्थ रक्षणकर्ता आहेस म्हणून आम्ही तुझ्या कृपेनें सुरक्षित झाल्यास आम्हांला कोठूनही व कोणापासूनही भय नाहीं. कारण तूं देखील आमच्या शत्रूंचा, द्वेषकर्त्यांचा नाश करतील आणि तुझ्या रक्षणाखालीं सुरक्षित राहून नेहमीं आम्ही विजयी होऊं.

( ३ )

त्वं नः पश्चादधरादुत्तरात्पुर इन्द्र नि पाहि विश्वतः ।
आरे अस्मत्कृणुहि दैव्यं भयमारे हेतीरदेवीः ॥

ऋग्वेद ८।६१।१६

पद— त्वं । नः । पश्चात् । अधरात् । उत्तरात् । पुरः । इन्द्र । निपाहि । विश्वतः । आरे । अस्मत् । कृणुहि । दैव्यं । भयं । आरे । हेतीः । अदेवीः ।

अन्वय— हे इन्द्र ! त्वं पश्चात्, अधरात्, उत्तरात्, पुरः च विश्वतः च नि पाहि। दैव्यं भयं अस्मत् आरे कृणुहि अदेवीः हेतीः आरे ॥

अर्थ— हे ( इन्द्र ) प्रभो ! ( त्वं ) तूं ( पश्चात्, अधरात्, उत्तरात् ) मागून, खालून, वरून ( पुरः विश्वतः च ) पुढून व सर्व बाजूंनीं

( निपाहि ) आमचें रक्षण कर तसेंच ( दैव्य भय ) दैविक भयाला ( अस्मत् आरे ) आम्हा सर्वांपासून दूर ( कृणुहि ) कर तसेंच ( अदेवा हती ) राक्षसी दास हा आम्हा सर्वांपासून ( आरे ) दूर राहात

भावार्थ— हे ईश्वरा ! तू आम्हा सर्वांचें सब बाजूनीं रक्षण कर, सर्व बाजूनीं आम्हाला निर्भय बनव विद्युत्पात, अवर्षण इत्यादि दैवी आपत्ति आमच्यावर न कोसळात व अन्य विपत्तीहा आमच्यापासून दूर राहोत

यदिन्द्र ब्रह्मणस्पतेऽपि मृषा चरामसि ।
प्रचेता न आंगिरसो दुरितात्पात्वंहस ॥

अथर्व० ६।४।१२

पद— यत् । इन्द्र । ब्रह्मणस्पते । अपि । मृषा । चरामसि । प्रचेता । न । आंगिरस । दुरितात् पातु । अंहस ।

अन्वय— हे इन्द्र ! ब्रह्मणस्पते ! यत अपि मृषा चरामसि दुरितात् अंहस प्रचेता आंगिरस न पातु ।

अर्थ— हे प्रभो, हे ज्ञानपते ! जर आम्ही खोटा व्यवहार केला असेल तर त्या पापापासून ज्ञानी अंगिरसप्रभृक देव आमचें रक्षण करो

५

त्वं विश्वस्य मेधिर दिवश्च ग्मश्च राजसि ।
स यामनि प्रति श्रुधि ॥ ऋग्वेद १।२५।२०

पद— त्वं । विश्वस्य । मेधिर । दिव । च । ग्म । च । राजसि । स । यामनि । प्रति । श्रुधि ॥

अन्वय— हे मेधिर ! त्वं विश्वस्य दिव ग्म च राजसि, स त्वं यामनि प्रति श्रुधि ॥

अर्थ— हे ( मेधिर ) बुद्धिदात्या ईश्वरा ! ( त्वं ) तू ( विश्वस्य दिव ग्म च ) सर्व द्युलोक व पृथ्वी यांचा ( राजसि ) राजा आहेस ( स ) तो तू आमची ( यामनि प्रतिश्रुधि ) प्रार्थना श्रवण कर

भावार्थ— हे बुद्धिदात्या ईश्वरा! तूं सर्व जगाचा खरा राजा आहेस, तो तूं आमची प्रार्थना श्रवण कर.

६

स नो दूराच्चासाच्च नि मर्त्यादघायोः।
पाहि सदमिद्विश्वायुः। ऋग्वेद० १।२७।३

पद— सः। नः। दूरात्। च। आसात्। नि। मर्त्यात्। अघायोः। पाहि। सदं। इत्। विश्व-आयुः।

अन्वय— हे ईश्वर। सः त्वं दूरात् च आसात् च अघायोः मर्त्यात् विश्वायुः सदं इत् नः नि पाहि।

अर्थ— हे ईश्वरा! (सः त्वं) तो तूं (दूरात् च आसात् च) दुरून अथवा जवळून (अघ-आयोः मर्त्यात्) पापी मनुष्यांपासून (विश्व आयुः सदं इत्) सर्व आयुष्यभर सदा सर्वदा (नः) आमचें सर्वांचें (नि पाहि) रक्षण कर.

७

त्वं हि नः पिता वसो त्वं माता शतक्रतो बभूविथ।
अधा ते सुम्नमीमहे॥ ऋग्वेद ८।९८।११

पद— त्वं। हि। नः। पिता। वसो। त्वं। माता। शत-क्रतो। बभूविथ। अधा। ते। सुम्नं। ईमहे॥

अन्वय— हे वसो शतक्रतो! त्वं हि नः पिता च त्वं माता बभूविथ। अधा ते सुम्नं ईमहे॥

अर्थ— हे (वसो) सर्वांचें निवासस्थान असणाऱ्या (शतक्रतो) शेंकडों सत्कृत्यें करणाऱ्या ईश्वरा! (त्वं हि नः पिता) तूंच आमचा पिता आणि (त्वं माता बभूविथ) तूंच आमची माता आहेस. (अधा) म्हणून आम्ही सर्व (ते सु-म्नं) तुझ्या उत्तम विचारांना (ईमहे) प्राप्त करून घेतों.

भावार्थ— हे ईश्वरा, तू सर्वांचा पिता व सर्वांची माता आहेस, म्हणून तुझ्या कृपादृष्टीची आम्ही इच्छा करतों.

सूचना

वाचकांनीं याप्रमाणें मंत्रांचे अर्थ लावण्याचा प्रयत्न करावा. या रीतीनें प्रयत्न केल्यास मंत्रार्थ लावण्यांत फारच लवकर प्रगती होईल. शक्य तों मंत्र पाठ करण्याचा ही वाचकांनीं प्रयत्न करावा.

---

# पाठ ८ वा.

## वैदिक स्वर.

पूर्वीच्या पाठांत वैदिक स्वरांचा त्याचप्रमाणें प्रत्येक पदाच्या स्वराचा ही विचार करण्यांत आला आहे. आता तींच पदें मंत्रांत कशा प्रकारें येतात व त्यांचे स्वर कोणत्या कारणानें बदलत असतात, याचा विचार करूं—

अ॒ग्निमी॑ळे पु॒रोहि॑तं य॒ज्ञस्य॑ दे॒वमृ॒त्विज॑म् ।
होता॑रं रत्न॒धात॑मम् ॥ ऋग्वेद १।१।१

१ यांतील पहिला अ अनुदात्त आहे आणि त्याचें चिन्ह त्याच्या खालीं आलेलें आहे.

२ दुसरें अक्षर ग्नि उदात्त आहे म्हणून त्याला कसलें ही चिन्ह नाहीं.

३ तिसरें अक्षर मी आहे. हें वास्तविक अनुदात्त आहे, परंतु उदात्ताच्या नंतर तें आल्यानें नियमाप्रमाणें तें स्वरित झालें आहे. (नियम १३ पहा). या नियमाप्रमाणें स्वरित झाल्यानें या अक्षराच्या डोक्यावर स्वरिताचें चिन्ह उभी रेषा आलेली आहे.

४ चवथें अक्षर ळे (अथवा डे) हें अनुदात्त आहे. परंतु तें अनुदात्ताच्या नंतर आलें आहे, त्यामुळें त्यास अनुदात्ततर म्हणतात. अनुदात्तपणामुळें या अक्षराला कसलेंही चिन्ह नाहीं.

५ पांचवें अक्षर पु अनुदात्त आहे व त्याचें चिन्ह त्याच्या खालीं आहे हें अक्षरही पूर्वी आलेल्या नियमाप्रमाणें अनुदात्ताच्या मागून आल्यानें अनुदात्ततर व्हावयास पाहिजे होतें, परंतु त्याच्या पुढें रो हें उदात्त अक्षर आल्यानें पु अक्षर उदात्तच झालें.

६ सहावें अक्षर रो उदात्त आहे, म्हणून त्याला कसलें ही चिन्ह नाहीं.

७ सातवें अक्षर हि हें देखील पूर्वीप्रमाणेंच स्वरित असल्यानें त्याची खूण त्याच्या डोक्यावर उभी आहे

८ आठवें अक्षर तं पूर्ववत् अनुदात्ततर आहे, म्हणून त्याला कसलेंही चिन्ह नाहीं·

९ नववें अक्षर य अनुदात्त आहे व त्याचें चिन्ह त्याच्याखालीं आहे.

१० दहावें अक्षर ज्ञ उदात्त आहे म्हणून कसलेंही चिन्ह नाहीं.

११ अकरावें अक्षर स्य स्वरित आहे, त्याचें स्वरित चिन्ह त्याच्या डोक्यावर उभें आहे.

१२ बारावें अक्षर दे अनुदात्त आहे. स्य या स्वरित अक्षराच्या पुढें दे अनुदात्त अक्षर आल्यानें वास्तविकपणें तें अनुदात्ततर व्हावयास पाहिजे होतें, परंतु "दे" पुढें उदात्त "व" आल्यानें तो अनुदात्तच राहिला आणि त्याच्याखालीं अनुदात्ताचें चिन्ह आलें.

१३ तेरावें अक्षर व उदात्त आहे म्हणून त्याला कसलेंही चिन्ह नाहीं.

१४ चौदावें अक्षर मृ अनुदात्त आहे. उदात्त व अक्षरानंतर तें पूर्वोक्त स्य प्रमाणें स्वरित होणें जरूर होतें. परंतु, पुढें त्वि हें उदात्त अक्षर आल्यानें स्वरित बनलें नाहीं व अनुदात्तच राहिलें त्यामुळें त्याच्या खालीं स्वरचिन्ह दिलें आहे.

१५ पंधरावें अक्षर त्वि उदात्त असल्यानें कसलेंही चिन्ह नाहीं.

१६ सोळावें अक्षर ज अनुदात्त आहे, परंतु तें उदात्ताच्या मागून आल्यानें स्वरित चिन्ह त्याच्या डोक्यावर आहे.

१७ सतरावें अक्षर हो उदात्त आहे म्हणून त्यास कोणतें ही चिन्ह नाहीं.

१८ अठरावें अक्षर ता अनुदात्त आहे, परंतु तें उदात्ताच्या मागून आल्यानें स्वरित बनलें, यासाठीं त्याच्या डोक्यावर चिन्ह आहे.

१९ एकोणिसावें अक्षर र अनुदात्त आहे परंतु तें पूर्वी सांगितल्या प्रमाणें अनुदात्ततर झालें म्हणून त्याला स्वरचिन्ह नाहीं.

२० विसावें र अक्षर वरील प्रमाणेंच अनुदात्ततर आहे.

२१ एकविसावें त्न अनुदात्त आहे. पुढें धा उदात्त आल्यानें याच्याखालीं स्वरचिन्ह दिलें आहे.

२२ बाविसावें अक्षर धा उदात्त आहे म्हणून तें स्वरचिन्हरहित आहे.

२३ तेविसावें अक्षर त पूर्वोक्त कारणानें स्वरित असल्यानें त्याचें चिन्ह त्याच्या डोक्यावर उभें आहे.

२४ चोविसावें अक्षर म पूर्वोक्त नियमाप्रमाणें अनुदात्ततर आहे म्हणून कसलें ही स्वरचिन्ह त्यास नाहीं.

वरील विवेचनावरून स्वरित स्वर कोठें बनतो व अनुदात्ततर स्वर कोठें बनतो हें वाचकांना समजून येईल

# समासामधील स्वर.

समासामध्ये स्वरांसंबंधी कांहीसा फेरफार होतो, त्यासंबंधी सामान्य नियम खालीं दिले आहेत.

(१) पदामध्यें एक स्वर सोडून बाकी सर्व स्वर अनुदात्त असतात. म्हणून समासांत एकत्र आलेल्या शब्दांचे मूळ स्वर कसेंही असले तरी त्यांचा समास बनल्यावर त्यामध्यें एका शब्दाचाच उदात्त स्वर शिल्लक राहतो व बाकीचे सर्व स्वर अनुदात्त होतात.

( २ ) समासांत सामान्यतः असा नियम आहे कीं, इतर समासांत उत्तर पद आपला स्वर कायम राखतें व पूर्वपदाचे स्वर अनुदात्त होतात. तसेंच बहुव्रीहि समासांत देखील पूर्वपद आपला स्वर कायम ठेवतें व उत्तर पदांतील स्वर अनुदात्त बनतात.

( ३ ) तत्पुरुष समासांत ही बहुतेक वरील प्रमाणेंच होतें.

( ४ ) कृदन्तें अथवा उत्तरपदसमासांत ही पूर्वपदाचा उदात्त स्वर कायम राहतो आणि उत्तर पदाचा स्वर बदलतो.

पूर्वी दिलेल्या मंत्रांत " पुरो-हितं " आणि " रत्न-धा-तमं " हीं सामासिक पदें आहेत. वर सांगितलेल्या नियमाप्रमाणें पुरः शब्दाचा उदात्त स्वर बदलला नाहीं; परंतु हितं पद मात्र अनुदात्त झालें. वस्तुतः " पुरः " आणि " हितं " हे दोनही शब्द अन्तोदात्त आहेत तथापि पूर्वी सांगितलेल्या नियमाप्रमाणें पहिल्या पदाचा स्वर तसाच कायम राहिला व दुसऱ्या पदाचे सर्व स्वर अनुदात्त बनले. परंतु उदात्ताच्या नंतर अनुदात्त आल्यानें " हि " अक्षर स्वरित चिन्हवालें झालें.

"रत्न-धा-तमं" शब्दांत तीन भाग आहेत. यांतील रत्न शब्द आद्युदात्त आहे, परंतु पुढे धा धातु आल्यानें उपपदतत्पुरुष समास बनला व त्यामुळे रत्नधा शब्द अन्त्योदात्त बनला, आणि "तम" प्रत्यय तर मूळचाच अनुदात्त त्यामुळें " त " हा पूर्वी सांगितलेल्या नियमाप्रमाणें स्वरित बनला व म

( ३ )

प्र तुविद्युम्नस्य स्थविरस्य घृष्वेर्दिवो ररप्शे महिमा पृथिव्याः ।
नास्य शत्रुर्न प्रतिमानमस्ति न प्रतिष्ठिः पुरुमायस्य सह्योः ॥
ऋग्वेद ६।१८।१२

पदच्छेद -प्र । तुवि-द्यु-म्नस्य । स्थविरस्य । घृष्वेः । दिवः । ररप्शे । महिमा । पृथिव्याः । न । अस्य । शत्रुः । न । प्रतिमानम् । अस्ति । न । प्रतिष्ठिः । पुरुमायस्य । सह्योः ॥

अन्वय- तुविद्युम्नस्य स्थविरस्य घृष्वेः महिमा दिवः पृथिव्याः प्र ररप्शे । न अस्य शत्रुः । न प्रतिमानं अस्ति । पुरुमायस्य सह्योः प्रतिष्ठिः न ।

अर्थ- ( तुवि-द्युम्नस्य ) अत्यंत तेजस्वी ( स्थविरस्य ) स्थिर अथवा पुराण पुरुष आणि ( घृष्वेः ) दुष्टांचा नाश करणारा अशा ईश्वराचा ( महिमा ) महिमा ( दिवः पृथिव्याः ) द्युलोक व पृथ्वीलोक यांच्या ( प्र ररप्शे ) बाहेर ही पसरला आहे ( न अस्य शत्रुः ) याला कोणी शत्रुही नाहीं व ( न अस्य प्रतिमान ) याच्या तोडीचा ही कोणी नाहीं या ( पुरु मायस्य ) अपार बुद्धिमान व ( सह्योः ) शक्तीच्या ईश्वराला ही दुसरा कसलाही ( प्रतिष्ठि न ) आधार नाही अर्थात् तोच सर्वांचा आधार आहे

भावार्थ- ईश्वर अत्यंत तेजस्वी, दुष्टांचा नाश करणारा व मोठा पुराण पुरुष आहे, त्याचा महिमा सर्व जगभर पसरला आहे. त्याला कोणी शत्रु नाहीं न त्याच्या बरोबरीचेंही या जगांत कोणी नाहीं या अनंतशक्ति ईश्वराला सोडून या जगात कोणालाही दुसरा कसलाही आधार नाहीं.

( ४ )

स नः पितेव सूनवेऽग्ने सूपायनो भव
सचस्वा नः स्वस्तये ॥ ऋग्वेद १।१।९

आमच्या शत्रूंचे बल नष्ट होऊन आमचा सर्वदा विजय होवो

३

त्वे इन्द्राप्यभूम विप्रा धियं वनेम ऋतया सपन्तः ।
अवस्यवो धीमहि प्रशस्तिं सद्यस्ते रायो दावने स्याम ॥

ऋग्वेद २।११।१२

अन्वय व अर्थ- हे ( इन्द्र ) प्रभो ! आम्ही सर्व ( विप्रा. ) ज्ञानी लोक ( त्वे अभूम ) तुझ्या ठिकाणी अर्थात् तुझे होऊन राहू ( ऋतया सपन्तः ) सरळ मार्गाने व्यवहार करणारे होऊन ( धियं वनेम ) बुद्धि आणि कर्म या दोहोंची सिद्धि मिळवू. आम्ही सर्व ( अवस्यव ) स्वतःचे रक्षणाचा यत्न करणारे लोक ( प्रशस्ति धीमहि ) तुझे गुण सतत धारण करू व ( सद्य ) लागलीच ( ते राय ) तुझ्या धनाच्या ( दावने ) दानास आम्ही ( स्याम ) योग्य होऊ

भावार्थ- हे ईश्वरा ! आम्ही सर्व तुझे होऊन राहू, सरळ मार्गाने जाऊन कर्माची सिद्धि प्राप्त करून घेऊ आम्ही सर्व स्वतःच्या रक्षणाचा पुरुषार्थ साधू व तुझ्या शुभ गुणांचे चिंतन करू असे करण्याने तू जे धनाचे दान करतोस त्याचे भागीदार आम्ही सर्व बनू

४

यो जात एव प्रथमो मनस्वान् देवो देवान्क्रतुना पर्यभूषत् ॥
यस्य शुष्माद्रोदसी अभ्यसेतां नृम्णस्य मह्ना स जनास इन्द्रः ॥

ऋग्वेद २।१२।१

अन्वय व अर्थ- ( य. प्रथम. देवः ) जो आदि ईश्वर ( जात. एव ) प्रकट होताच ( मनस्वान् ) मनन शक्तीने श्रेष्ठ बनून आपल्या ( क्रतुना ) कर्माने ( देवान् पर्यभूषत् ) देवांना शोभा देता झाला, ( यस्य शुष्मात् ) ज्याच्या सामर्थ्याने ( रोदसी ) द्युलोक व पृथ्वीलोक ( अभ्यसेतां ) यांना धरकाप सुटतो ( स ) तोच देव, हे ( जनासः ) लोक हो ! ( नृम्णस्य मह्ना ) मानसिक शक्तीच्या सामर्थ्याने युक्त ( इन्द्र. ) असा प्रभु आहे

भावार्थ— आदिदेव परमेश्वर प्रथमपासून मानसिक शक्तींनी संपन्न असून आपल्या प्रशंसनीय कर्मांनी सर्व देवांना अलंकृत करतो, याचे सामर्थ्य इतके आहे की, त्याच्या भयाने द्युलोक व पृथ्वीलोकही कंप पावतात हे लोकहो! तोच सर्व जगाचा एकमात्र प्रभु आहे व सर्वांहून अधिक समर्थ आहे

( ५ )

यस्मान्न ऋते विजयन्ते जनासो यं युध्यमाना अवसे हवन्ते ॥
यो विश्वस्य प्रतिमानं बभूव यो अच्युतच्युत्स जनास इन्द्रः ॥

ऋग्वेद २।१२।९

अन्वय व अर्थ— हे ( जनास. ) लोक हो! ( यस्मात् ऋते ) ज्याच्या शिवाय ( जनास न विजयन्ते ) लोक विजय मिळवू शकत नाहीत, ( युध्यमाना ) लढत असता ( अवसे ) रक्षणार्थ ( यं हवन्ते ) ज्याची प्रार्थना करतात व ( यः ) जो ( विश्वस्य प्रतिमानं बभूव ) सर्व जगाला आदर्श होऊन राहिला आहे तसेच ( अ-च्युत-च्युत् ) ज्याच्या ठायी अचल ललनांना चैतन्य देण्याचे सामर्थ्य आहे, तोच इन्द्र होय

भावार्थ— परमेश्वराची कृपा नसेल तर लोकांना विजय कधीही प्राप्त व्हावयाचा नाही, म्हणून युद्धाच्या वेळी सर्व लोक त्याची प्रार्थना मनोभावाने करितात तो परमेश्वर विश्व बनविण्याच्या बाबतीत आदर्श झाला आहे, तसेच तो इतका समर्थ आहे की मोठमोठ्या सामर्थ्यसंपन्नांनाही तो हलवून सोडतो, परंतु त्याला हलविण्यास मात्र कोणी समर्थ नाही

( ६ )

अस्माकमग्ने मघवत्सु धारयानामि क्षत्रमजरं सुवीर्यम् ।
वयं जयेम शतिनं सहस्रिणं वैश्वानर वाजमग्ने तवोतिभिः ॥

आमच्या शत्रूंचे वर नष्ट होऊन आमचा सर्वदा विजय होवो.

२

ये इन्द्राप्युषम विप्रा धियं वनेम ऋतया सपन्तः ।
अवस्यवो धीमहि प्रशस्तिं सद्यस्ते रायो दावने स्याम ॥

ऋग्वेद २।११।१२

अन्वय व अर्थ- हे ( इन्द्र ) प्रभो ! आम्ही सर्व ( विप्राः ) ज्ञानी लोक ( ते अभूम ) तुझ्या ठिकाणीं अर्थात् तुझे होऊन राहू. ( ऋतया सपन्तः ) सरळ मार्गाने व्यवहार करणारे होऊन ( धियं वनेम ) बुद्धि आणि कर्म या दोहोंची सिद्धि मिळवू. आम्ही सर्व ( अवस्यवः ) स्वत.चे रक्षणाचा यत्न करणारे लोक ( प्रशस्ति धीमहि ) तुझे गुण मनात धारण करू व ( सद्यः ) तत्काळच ( ते रायः ) तुझ्या धनाच्या ( दावने ) दानास आम्ही ( स्याम ) योग्य होऊ

भावार्थ- हे ईश्वरा ! आम्ही सर्व तुझे होऊन राहू. सरळ मार्गाने जाऊन कर्माची सिद्धि प्राप्त करून घेऊ आम्ही सम स्वतःच्या रक्षणाचा पुरुषार्थ साधू व तुझ्या शुभ गुणांचे चिंतन करू असे करण्याने तू जे धनाचें दान करशील त्यास योग्य होण्यास आम्ही सर्व यत्न.

३

यो जात एव प्रथमो मनस्वान् देवो देवान्क्रतुना पर्यभूषत् ॥
यस्य शुष्माद्रोदसी अभ्यसेतां नृम्णस्य मह्ना स जनास इन्द्रः ॥

ऋग्वेद २।१२।१

अन्वय व अर्थ- ( य. प्रथमः देवः ) जो आदि ईश्वर ( जात. एव ) प्रकट होताच ( मनस्वान् ) मनन शक्तीने श्रेष्ठ बनून आपल्या ( क्रतुना ) कर्माने ( देवान् पर्यभूषत् ) देवाना शोभा देता झाला, ( यस्य शुष्मात् ) ज्याच्या सामर्थ्याने ( रोदसी ) द्युलोक व पृथ्वीलोक ( अभ्यसेतां ) याना थरकांप सुटतो ( स ) तोच देव, हे ( जनासः ) लोक हो ! ( नृम्णस्य मह्ना ) मानसिक शक्तीच्या सामर्थ्याने युक्त ( इन्द्रः ) असा प्रभु आहे

भावार्थ— आदिदेव परमेश्वर प्रथमपासून मानसिक शक्तींनी संपन्न असून आपल्या प्रशंसनीय कर्मांनी सर्व देवांना अलंकृत करतो. याचे सामर्थ्य इतके आहे की, त्याच्या भयाने द्युलोक व पृथ्वीलोकही कंप पावतात हे लोकहो! तोच सर्व जगाचा एकमात्र प्रभु आहे व सर्वाहून अधिक समर्थ आहे.

( ७ )

यस्मान्न ऋते विजयन्ते जनासो यं युध्यमाना अवसे हवन्ते ।
यो विश्वस्य प्रतिमानं बभूव यो अच्युतच्युत्स जनास इन्द्रः ॥
ऋग्वेद २।१२।९

अन्वय व अर्थ— हे ( जनासः ) लोक हो ! ( यस्मात् ऋते ) ज्याच्या शिवाय ( जनास न विजयन्ते ) लोक विजय मिळवू शकत नाहीत, ( युध्यमानाः ) लढत असता ( अवसे ) रक्षणार्थ ( य हवन्ते ) ज्याची प्रार्थना करतात व ( य ) जो ( विश्वस्य प्रतिमानं बभूव ) सर्व जगाचा आदर्श होऊन राहिला आहे तसेच ( अ-च्युत-च्युत् ) ज्याच्या जवळ अचेतनाला चैतन्य देण्याचे सामर्थ्य आहे, तोच इन्द्र होय

भावार्थ— परमेश्वराची कृपा नसेल तर लोकांना विजय कधीही प्राप्त व्हावयाचा नाही, म्हणून युद्धाच्या वेळी सर्व लोक त्याची प्रार्थना मनोभावाने करितात. तो परमेश्वर विश्व बनविण्याच्या बाबतीत आदर्श झाला आहे, तसेच तो इतका समर्थ आहे की मोठमोठ्या सामर्थ्यसंपन्नांनाही तो हलवून सोडतो; परंतु त्याला हलविण्यास मात्र कोणी समर्थ नाही

( ८ )

अस्माकमग्ने मघवत्सु धारयानामि क्षत्रमजरं सुवीर्यम् ।
वयं जयेम शतिनं सहस्रिणं वैश्वानर वाजमग्ने तवोतिभिः ॥
ऋग्वेद ६।८।६

अन्वयासह अर्थ- हे ( वैश्वानर अग्ने ) विश्वरूपा मार्गदर्शक व प्रकाश देणाऱ्या देवा ! ( अस्माक मघवत्सु ) आमच्यांतील धनिकांमध्ये ( सुवीर्यं ) उत्तम पराक्रमानें युक्त ( अ-नामि ) कधीही नमणारें न

ते विंशतिपदे यत्ताः संप्रहारं प्रचक्रिरे ।
आसीद्वाद्य इवावर्तो मुहूर्तमुदधाविव ॥ १२ ॥

शूराणां युद्ध्यमानानां निघ्नतामितरेतरम् ।
संग्रामस्तुमुलो राजन्प्रावर्तत सदारुणः ॥ १३ ।

प्रवर्तमाने संग्रामे तस्मिन्नविभयङ्करे ।
द्रोणस्य मिषतो व्यूहं भित्त्वा प्राविशदार्जुनिः ॥ १५ ॥

तं प्रविष्टं विनिघ्नन्तं शत्रुसंघान्महाबलम् ।
हस्त्यश्वरथपत्त्यौघाः परिवव्रुरुदायुधाः ॥ १६ ॥

नानावादित्रनिनदैः क्ष्वेडितोत्क्रुष्टगर्जितैः ।
हुंकारैः सिंहनादैश्च तिष्ठ तिष्ठेति निःस्वनैः ॥ १७ ॥

घोरैर्हलहलाशब्दैर्मांऽगास्तिष्ठेहि मामिति ।
असावहममित्रेति प्रवदन्तो मुहुर्मुहुः ॥ १८ ॥

बृंहितैः शिञ्जितैर्हासैः करनेमिस्वनैरपि ।
संनादयन्तो वसुधामभिदुद्रुवुरार्जुनिम् ॥ १९ ॥

तेषामापततां वीरः शीघ्रयोधी महाबलः ।
क्षिप्रास्त्रो न्यवधीद्राजन्मर्मज्ञो मर्मभेदिभिः ॥ २० ॥

ते हन्यमाना विवशा नानालिङ्गैः शितैः शरैः ।
अभिपेतुः सुबहुशः शलभा इव पावकम् ॥ २१ ॥

ततः सूतो हेमभाण्डपरिच्छदान् सुवर्णालंकारयुक्तान् त्रिहाय-न् त्रिवर्षीयान् हयान् अश्वान् आनु संनोदयामास । सुमित्रेण ारथिना द्रोणानीकाय प्रेषितास्ते वाजिनः अश्वाः ॥ १० ॥ हे ाजन् महावेगपराक्रमम् द्रोणं अभ्यद्रवन्, तथा यान्तं तं अभिम-ं उदीक्ष्य दृष्ट्वा, सर्वे द्रोणपुरोगमा ते अभ्यवर्तन्त, पाण्डवाश्च अन्वयु. ॥ ११ ॥ ते विंशतिपदे यत्ताः संयताः संप्रहारं प्रच-

क्रिरे। उदधौ समुद्रे गाङ्गः आवर्त इव मुहूर्तं आसीत् ॥ १२
शूराणां युध्यमानानां इतरेतरं निघ्नतां, हे राजन् !
तुमुलः संग्रामः प्रावर्तत ॥१३॥ तस्मिन्नतिभयंकरे संग्रामे
द्रोणस्य मिषतः पश्यतः एव आर्जुनिः अभिमन्युः व्यूहं
अभ्यन्तरं प्राविशत् ॥१४॥ तं महाबलं व्यूहमध्ये प्रविष्टं
विनिघ्नन्तं उदायुधाः उद्यतायुधाः हस्त्यश्वरथपत्त्यौघाः
परितः ययुः॥१६॥नानावादित्रनिःस्वनैः क्ष्वेडितोत्कृष्टगर्जितैः
हुंकारैः सिंहनादैः च "तिष्ठ तिष्ठ" इति निःस्वनैः ॥ १७ ॥
हलाहलाशब्दैः "मा गा, तिष्ठ, मां यहि, अमित्र ! असौ अहं
इति मुहुः मुहुः वारंवारं प्रवदन्त.॥ १८॥ बृंहितैः शिञ्जितैः
हासैः करनेमिस्वनैरपि वसुधां संनादयन्त आर्जुनिं अभिदुद्रुवुः॥ १९
शीघ्रयोधी महाबलः वीरः क्षिप्रास्त्रः अभिमन्यु। हे राजन्!
युद्धमर्मज्ञः अभिमन्यु मर्मभेदिभिः नानालिङ्गैः शरैः आपततां
न्यवधीत् ॥ २० ॥ नानालिङ्गैः शितैः शरैः विवशाः हन्यमानाः ते
वीराः पावकं शलभा इव सुबहुशः अभिपेतुः ॥ २१ ॥

अंक २१



# संस्कृत-स्वयं-शिक्षक.

( संस्कृत भाषा शिकण्याचा सोपा उपाय. )

## भाग २१ वा.




लेखक व प्रकाशक

श्रीपाद दामोदर सातवळेकर

स्वाध्याय-मंडल, औंध, (जि० सातारा.)





द्वितीय आवृत्ति.



शके १८५२, सन १९३०.

---

मूल्य ५ आणे.

आयं गौः पृश्निरक्रमीत् । ऋ० १०।१८८।१

" ( आय ) ही ( गौः ) भूमि ( पृश्नि ) अंतरिक्षात ( अक्रमीत् ) फिरत किंवा जात असते या मंत्रात गौ शब्द पृथ्वीवाचक आहे व पृथ्वीची गति येथें सूचित केली आहे. तसेंच—

मया गावो गोपतिना सचध्वमयं वो गोष्ठ
इह पोषयिष्णु. ॥ ऋ० ३।१४।६

" हे ( गाव. ) गायींनो ! ( मया गोपतिना ) मी जो गोपाळ त्याच्या-सह ( सचध्व ) मिळून रहा, ( इह अयं ) येथें हा ( पोषयिष्णु ) पालन करणारा ( व गोष्ठ ) तुमचा गोठा आहे येथें गौ शब्द ( अर्थात् गाय ) गाय या अर्थी आहे. परंतु आलंकारिक दृष्ट्या घेतल्यास त्याच पदाचा अर्थ इन्द्रिय मन- होण्याचाही संभव आहे

या प्रकारचीं दुसरीं पुष्कळ उदाहरणं मंत्रांमध्ये सांपडतात वेदांमध्यें कित्येक वेळीं " अशाकरिता पूर्णांचा प्रयोग केला जातो. " अर्थात् " गो " शब्दाचा उपयोग गायीपासून होणाऱ्या किंवा मिळणाऱ्या कोणत्याही वस्तूकरिता केला जातो हा विषय फारच गहन आहे, तथापि संक्षेपानें थोडीं उदाहरणें येथ देत आहों—

" गो " शब्द गायीच्या दुधाबद्दल खालील मंत्रात उपयोजिला आहे

गोभि श्रीणीत मत्सरं ॥ ऋ० ९।४६।४

" ( गोभि ) गायीच्या दुधाबरोबर ( श्रीणीत ) शिजवा ( मत्सर ) सोमरसाला " अर्थात् गायीचें दूध घेऊन त्यात सोमरस घालून दोन्ही बरोबरच शिजवा

य मंत्रात " मत्सर " शब्द सोमरसाचा वाचक आहे मत्सर शब्दाचा दुसरा अर्थ लोभ असा आहे पण तो येथें इष्ट नाहीं मत्सर शब्द " मद् " ( हर्ष पावणे ) या धातूपासून झाला आहे

वरीलप्रमाणेंच "गो" शब्द गायीचें दूध, दही, लोणी, तूप, चामडें, चामड्याच्या वाद्या इत्यादींबद्दल वापरतां येतो; कारण हे सर्व पदार्थ गायीपासून बनतात. याचें उदाहरण—

अंशुं दुहन्तो अध्यासते गवि । ऋ० १०।९४।९

"(अंशुं) सोमरस (दुहन्तः) काढणारे (गवि) गायीच्या कातड्यावर (अध्यासते) बसतात." येथें 'गो' शब्दाचा अर्थ गायीचें कातडें अथवा नुसतें कातडें असा आहे. तसेंच खालील उदाहरण पहा—

गोभिः सन्नद्धो असि वीळयस्व । ऋ० ६।४७।२६

"(गोभिः) गायीच्या कातड्याच्या दोऱ्यांनीं (सन्नद्धः) बांधला गेलेला तूं रथ आहेस; यास्तव (वीळयस्व) तूं बळकट बन." येथें "गो" शब्दाचा अर्थ गायीच्या चामड्यापासून बनविलेली दोरी असा आहे.

याप्रमाणें 'गो' शब्दाचे अनेक अर्थ वेदांमध्यें आहेत. गायीपासून जितके पदार्थ बनतात अथवा मिळतात, त्या सर्वांना गो हा एकच शब्द आहे. धनुष्याची दोरी कातड्याच्या तांतीपासून बनते म्हणून तिलाही गो असेंच नांव आहे. याप्रकारें अनुसंधानपूर्वक अर्थ ठरविणें व समजून घेणें योग्य आहे.

## दोन धातूंपासून बनलेले शब्द.

कांहीं शब्द एकाच धातूपासून बनतात, तर कांहीं शब्द दोन अथवा अधिक धातूंपासून सिद्ध होतात. उदाहरणार्थ— 'हिरण्य' शब्द घ्या. या शब्दाचे दोन भाग आहेत. "हिर्+रण्य" या दोन पदांत 'रण्य' पद रमणीय पदाचें संक्षिप्त रूप आहे. 'रमणीय, रणीय, रण्य, रण्य' अशा प्रकारें हें संक्षिप्त रूप झाल्याचें दिसून येतें, म्हणून 'रम्' धातूपासून हा शब्द बनला आहे असें समजावें.

"हि" अथवा "हिर्" पद "हृ" धातूपासून झालें आहे. हृदय शब्द 'हिर्दय' असा कांहीं अशिक्षित लोक उच्चारतात; त्यांतील 'दय' शाईंसा

होऊन हिर् असें रूप राहिलें तेंच येथें घ्यावयाचें आहे. 'हिर्+रण्य' हा शब्द अशा प्रकारें बनला आहे. हृदयाला जें रमणीय वाटतें तें 'हिरण्य' होय हा याचा तात्पर्यार्थ होय. हें हिरण्य नाम धनाला दिलेलें आहे. धन, दौलत, संपत्ति इत्यादि गोष्टी प्रत्येक मनुष्याच्या मनाला आनंद देणाऱ्या असतात म्हणून धनाला 'हिरण्य' असें नाव आहे, हें यावरून समजेल.

"हृ" धातूचा अर्थ 'हरण करणें' असाही आहे. एक स्थानाहून हरण करून जें दुसऱ्या स्थळावर घेऊन जातां येतें तें हिरण्य होय. धन हें नेहमीं एकाजवळून दुसऱ्याकडे जात असतें म्हणून त्यास हिरण्य म्हणतात. असें—

हिरण्यपाणिमूतये सवितारमुपह्वये ॥ ऋ० १।२२।५

"(हिरण्यपाणिं) सुवर्णासारख्या कांतिमान् हातांनीं अर्थात् किरणांनीं युक्त (सवितारं) सूर्याला स्वतःच्या (ऊतये) रक्षणार्थ (उपह्वये) मी प्रार्थितों." येथें हिरण्य शब्द धनरूपी सुवर्णासारख्या चमकदार अशा अर्थानें योजलेला आहे. याप्रकारें वाचकांनीं शब्दांच्या व्युत्पत्तीचें ज्ञान करून घ्यावें.



# पाठ २ रा.

या पाठांत खालील मंत्राचें अध्ययन करा—

शं नो मित्रः शं वरुणः शं नो भवत्वर्यमा ।
शं न इन्द्रो बृहस्पतिः शं नो विष्णुरुरुक्रमः ॥

वा० यजु० ३६।९

"(मित्र) सर्वांचा मित्र ईश्वर (नः शं) आम्हां सर्वांना कल्याणप्रद होवो (वरुण) सर्वांहून श्रेष्ठ ईश्वर (शं) कल्याणकारी होवो. (अर्यमा) न्यायी ईश्वर (नः शं) आम्हां सर्वांचें कल्याण करो (इन्द्र) परम

ऐश्वर्यसंपन्न प्रभु ( नः शं ) आम्हां सर्वांना कल्याणप्रद होवो. (बृहस्पति.) मोठ्या वाणीचा ईश्वर ( शं ) आमचा कल्याणकर्ता होवो, तसेंच ( उरुक्रमः विष्णुः ) महापराक्रमी व्यापक ईश्वर ( नः शं ) आम्हांस कल्याणप्रद होवो. "

शं नो वातः पवतां शं नस्तपतु सूर्यः
शं नः कनिक्रदद्देवः पर्जन्यो अभिवर्षतु ॥ वा० यजु० ३६।१०

" ( वातः) वायु (नः शं) आम्हां सर्वांना कल्याणकारी होऊन (पवतां) वहात राहो. ( सूर्यः ) सूर्य ( नः ) आम्हां सर्वांना ( शं तपतु ) कल्याणकारी होऊन तापत राहो. ( कनिक्रदद् ) गर्जना करणारा ( पर्जन्यः देव. ) मेघराज देव ( नः ) आम्हां सर्वांसाठीं ( शं वर्षतु ) कल्याणप्रद अशा वृष्टीचा वर्षाव करो. "

अहानि शं भवन्तु नः शँ रात्रीः प्रति धीयताम्।
शं न इन्द्राग्नी भवतामवोभिः शं न इन्द्रावरुणा रातहव्या ।
शं न इन्द्रापूषणा वाजसातौ शमिन्द्रासोमा सुविताय शंयो ॥
वा० यजु० ३६।११

(नः) आम्हां सर्वांना (अहानि शं भवन्तु) दिवस कल्याणकारक होवोत, ( रात्रीः शं प्रतिधीयतां ) रात्रीचा समय आम्हां सर्वांचें कल्याण धारण करो. ( अवोभिः ) सर्व प्रकारच्या रक्षणांनीं युक्त ( इन्द्राग्नी ) ऐश्वर्यवान् व तेजस्वी ( नः शं भवतां ) आम्हां सर्वांना कल्याणकारक होवोत. ( रातहव्या ) अन्न देणारे ( इन्द्रावरुणौ ) ऐश्वर्यवान् व श्रेष्ठ ( नः शं ) आम्हां सर्वांना कल्याणप्रद होवोत. ( इन्द्रापूषणौ ) ऐश्वर्यवान् व पोषणकर्ता ( वाजसातौ ) अन्नदानप्रसंगीं ( नः शं ) आम्हांस कल्याणकर्ते होवोत. ( इन्द्रासोमौ ) ऐश्वर्यवान् व विद्वान् ( सुविताय ) उत्तम गतीसाठीं व ( शं योः ) शांतिसौख्य आणि दुःखप्रतिकार यांसाठीं सहायक बनोत. अर्थात् प्रत्येक काळ व प्रत्येक शक्ति आम्हां सर्वांसाठीं शुभदायक बनोत.

अभी पु णः सखीनामविता जरितॄणाम् ।
शतं भवास्यूतिभिः ॥ ऋ० ४।३१।३

"हे ईश्वरा ! तूं ( नः ) आम्हां सर्वांना ( सखीनां ) सर्व मित्रांना व ( जरितॄणां ) सर्व उपासकांना ( शतं ऊतिभिः ) शेकडों प्रकारच्या रक्षणांनीं ( अभि सु अविता ) सर्व प्रकारें उत्तम रक्षक ( भवसि ) होतोस."

आम्हां सर्वांचें, मित्रांचें व उपासकांचें तूं शेकडों प्रकारांनीं अत्यंत उत्तम रक्षण करतोस. हे प्रभो ! तुझ्यासारखा दुसरा कोणीही रक्षक नाहीं. तुझे रक्षणाचे मार्ग व साधनें हीं असंख्य आहेत.

अग्ने त्वं नो अन्तम उत त्राता शिवो भवा वरूथ्यः ॥
वसुरग्निर्वसुश्रवा अच्छा नक्षि द्युमत्तमं रयिं दाः ॥ ऋ०५।२४।१

"हे ( अग्ने ) तेजस्वी ईश्वरा ! ( नः त्वं अन्तमः ) आम्हांसाठीं तूं समीप राहतोस म्हणून तूं आमचा ( त्राता ) रक्षक, ( शिवः ) कल्याणकर्ता व ( वरूथ्यः ) श्रेष्ठ आहेस. ( अग्नि ) तेजस्वी ( वसुः ) सर्वांचा निवासक, ( वसुश्रवाः ) निवास करण्यास योग्य अशीं अन्नादि देणारा, ( अच्छा-नक्षि ) आम्हांस उत्तम प्रकारें प्राप्त हो व आम्हांस ( द्युमत्तमं ) उत्तम तेजस्वी ( रयिं दाः ) धन दे."

परमेश्वर आम्हां सर्वांना अत्यन्त समीप आहे. त्याच्याहून अधिक जवळ दुसरें कोणी नाहीं. तोच सर्वांचा रक्षक, कल्याण करणारा व सर्वांचे श्रेष्ठ प्राप्तव्य आहे. तो सर्वांचें उत्तम प्रकारें रक्षण करतो व सर्वांचें पोषण करतो. तो आम्हां सर्वांना प्राप्त होवो व आम्हांला उत्तम धन देवो.

त्वां वर्धन्ति क्षितयः पृथिव्यां त्वां राय उभयासो जनानाम् ॥
त्वं त्राता तरणे चेत्यो भूः पिता माता सदमिन्मानुषाणाम् ॥
ऋ० ६ । १ । ५

"हे ईश्वरा ! ( क्षितयः ) पृथ्वीवर राहणारे लोक ( त्वां वर्धन्ति ) तुला वाढवितात; तुझ्या महिम्याचा प्रसार करतात. ( जनानां ) मनुष्यांचें

( उभयासः रायः ) दोन्ही प्रकारचे धन तुझा महिमा प्रकाशित करतें. तूंच ( त्राता ) सर्वांचा तारक आहेस व ( तरणे चेत्यः ) दुःखांतून तारून नेण्यास ( भूः ) योग्य आहेस. तसेच तूंच ( मनुष्याणां ) मनुष्यांची माता, पिता इत्यादि ( सदं इत ) सर्वदा तूंच आहेस. "

हे ईश्वरा ! सर्व ज्ञानी लोक तुझा महिमा वाढवीत असतात सर्वांना तूंच स्थूल अथवा सूक्ष्म धन देतोस दुःखांतून पार होण्यास सर्वांनीं तुझें ज्ञान प्राप्त करून घेणें जरूर आहे; कारण तूच सर्वांचा आई, बाप, भाऊ इत्यादि आहेस.

तं सध्रीचीरूतयो वृष्ण्यानि पौंस्यानि नियुतः सश्चुरिन्द्रम् ।
समुद्रं न सिंधव उक्थशुष्मा उरुव्यचसं गिर आ विशन्ति ॥
ऋ० ६ । ३६ । ३

" ( तं इन्द्रं ) त्या प्रभूच्या जवळ ( ऊतयः सध्रीचीः ) रक्षक शक्ति राहतात; तसेच ( वृष्ण्यानि पौंस्यानि ) उत्साहवर्धक शक्ति ( नियुतः ) एकमेकांशी नियुक्त होऊन ( सश्चुः ) सेवा करीत असतात. ( सिंधवः समुद्रं न ) ज्याप्रमाणें नद्या समुद्राला मिळतात, त्याप्रमाणें ( उक्थशुष्मा गिरः ) बलयुक्त अशी स्तुति करणारी वाणी ( उरुव्यचसं ) सर्वव्यापक ईश्वराच्या जवळ ( आ विशन्ति ) पोंचते. "

परमात्म्याच्या जवळ सर्व प्रकारचें संरक्षक सामर्थ्य व अनंत सामर्थ्यही आहे. प्रत्येक मनुष्य आपल्या वाणीनें त्याची प्रार्थना करीत असतो व प्रत्येकानें त्याची प्रार्थना करणें आवश्यकच आहे. कोणत्याही भाषेच्या द्वारें व कोठेंही राहून केलेली प्रार्थना त्या परमेश्वराजवळ जाऊन पोंचते.

## सूचना.

या पाठांत आलेली देवतांची अनेक नांवें एका परमेश्वराचींच आहेत त्या देवतांच्या नांवांचा बोध करून घेणें म्हणजे एकमेवाद्वितीय अशा परमेश्वराचाच बोध करून घेणें होय; कारण " एकाच सद्वस्तूचें वर्णन ज्ञानी लोक अनेक तऱ्हेनें करतात, " हें वेदांच्या मंत्रद्वारें स्पष्ट केलें आहे.

---

येथ आलंकारिक रीतिने घेरणाऱ्या शत्रूचा वध करून त्याच्या रक्ताची नदी वाहविल्याचेंही वर्णन आहे, परंतु तो अर्थ गुप्त आहे

( ४ )

"रात्री" शब्द "रा" ( दान करणें ) धातूपासून झाला आहे रात्र ही सुखाचें अथवा विश्रांतीचें दान करते, सर्व प्राणिमात्र रात्रीच्या वेळीं विश्रांति घेतात "रम्' धातूपासूनही हा शब्द होतो "रमयति भूतानि" जी प्राणिमात्रास रममाण करते ती रात्र होय उदाहरण—

ह्वयामि रात्रीं जगतो निवेशनीं
ह्वयामि देवं सवितारमूतये ॥ ऋ० १।३५।१

"( जगत ) जंगम जगाच्या ( निवेशनीं ) निवेशक ( रात्रीं ) रात्रीची मी ( ह्वयामि ) स्तुति करतों व ( ऊतये ) रक्षणार्थ ( देवं सवितारं ) सूर्यदेवाची ( ह्वयामि ) स्तुति करतों " "येथें रात्री शब्दाचा प्रयोग आहे तो जगाला विश्रांति देणारी असा अर्थाने आहे 'जगत्' ( गच्छति इति जगत् ) शब्दाचा येथें अभिप्रेत अर्थ हालचाल करणारे प्राणी असा आहे.

( ५ )

"अश्व" शब्दाचा अर्थ घोडा ' अश् " धातूचा अर्थ भक्षण करणें, खाणें, व्यापणें असा आहे तो मार्ग खातो ( अध्वान् अश्नुते ) किंवा मार्ग व्यापून टाकतो म्हणून त्याला अश्व म्हणतात. अथवा ( अशानः ) फार खाणारा आहे, पुष्कळ खाऊन तें पचविणारा असा घोडा हा पशु आहे

मानुषा पर्यश्वं नयन्ति ॥ ऋ० १।१६२।४

"( मानुषा ) माणसें ( अश्व ) घोड्याला ( परि नयन्ति ) चोहोंकडे नेतात अर्थात् फिरवतात " येथें घोड्यावर बसून चोहोंकडे फिरविण्याचे वर्णन आहे.

( ६ )

" मनुष्य " " मनन करून राहतो " अर्थात् " मनन करून आपलीं कर्में करतो तो मनुष्य होय. मन् धातूपासून [redacted] शब्द बनला आहे. मानवप्राण्याप्रमाणें अन्य प्राणी मननशील नाहींत. " मनु " पासून झालेले ते मनुष्य असा अर्थानेंही हा शब्द उपयोगांत आणतात.

( ७ )

" संग्राम " शब्द युद्धवाचक आहे. ( सं ) एकत्र होऊन ( ग्राम ) मिळणें या अर्थाचा हा शब्द आहे अथवा ( संगतौ ग्रामौ ) दोन गांवचे लोक एकमेकांविरुद्ध भिडतात, त्यांच्यांत लढा पडतो, त्यालाही संग्रामच नांव आहे. संग्राम शब्द युद्धवाचक असला तरी त्याच्या व्युत्पत्तीवरून दोन ( सं+ग्राम ) गांवांतील लोकांचा आपसांतील झगडा किंवा भिडाफ असा अर्थ त्यांत स्पष्ट आहे.

( ८ )

" वज्र " शब्द शस्त्र, तलवार, खड्ग, इत्यादि अर्थांनीं येतो. वर्ज् धातूपासून हा शब्द बनतो. ( वर्जयति इति वज्रः ) जो शत्रूंचें वर्जन करतो, जो शत्रूंना दूर पिटाळून लावतो, तो वज्र नांवास पात्र होय. हातांत शस्त्र असल्यास शत्रू आपल्यापासून दूर ठेवतां येतो.

( ९ )

" आत्मा " शब्द " अत् " ( सतत गमन करणें ) धातूपासून बनला आहे. आत्म्याच्या ठिकाणीं सतत गति आहे, हालचाल करण्याची शक्ति याच्यांत आहे, जड शरीरांना हा हलवितो, शरीरांना चालविण्याची शक्ति याच्यांत आहे, म्हणून त्याला आत्मा म्हणतात. आत्म्याचा अर्थ 'संचालक' असाही आहे.

( १० )

वेदांमध्यें शब्द बनवितांना धातूंच्या अक्षरांची उलटापालटही होते. जसें-हिंस् (हिंसा करणें) यापासून "सिंह" शब्द बनतो व त्याचा अर्थ हिंसक

परमेश्वराचा जो आत्मिक व अलौकिक आनंद आहे, तो खरोखर सर्व लोकांना हितकर आहे तो सर्वांना यथायोग्य प्रमाणांत धन वाटून देतो व सूर्यादि देवतांच्या ठिकाणीं उत्कृष्ट बलाची स्थापना करतो

कविमग्निमुपस्तुहि सत्यधर्माणमध्वरे ।
देवममीवचातनम् ॥ ऋ० १।१२।७

"( अध्वरे ) यज्ञांत सत्कर्म करण्याच्या वेळीं (अमीव-चातन) रोग दूर करणाऱ्या, ( सत्य-धर्माण ) सत्य नियमाचें पालन करणाऱ्या ( कविं ) कवीची ( अग्नि देव ) तेजस्वी परमात्मदेवाची ( स्तुहि ) प्रशंसा कर "

परमात्मा देव आरोग्यदाता, सत्य नियमाचें पालन करणारा, कवि म्हणजे शब्दाचा प्रवर्तक व अत्यंत तेजस्वी आहे, म्हणून तो स्तुति करण्यास योग्य आहे त्याची स्तुति करण्यानें उपासकाच्या अंगीं तेजस्विता वाढते

समानं नीळं वृषणो वसानाः सञ्जग्मिरे महिषा अर्वतीभिः ।
ऋतस्य पदं कवयो नि पान्ति गुहा नामानि दधिरे पराणि ॥
ऋ० १०।५।२

"(वृषण) बलवान्, (महिषा) मोठी इच्छा धारण करणारे, (अर्वतीभि वसाना) चालक शक्तींसह राहणारे सज्जन, ( समानं नीळं ) समान एक आश्रयस्थानाला ( सञ्जग्मिरे ) एकत्र होऊन पोंचतात ( कवय ) ज्ञानी लोक ( ऋतस्य पद ) सत्याच्या स्थानाचें ( नि पान्ति ) संरक्षण करतात व ( गुहा ) बुद्धीच्या ठिकाणीं ( पराणि नामानि ) श्रेष्ठ नावें ( दधिरे ) धारण करतात "

श्रेष्ठ मनुष्य आपल्या प्रबल इच्छाशक्तीच्या जोरावर त्या एकाच ईश्वराच्या आश्रयस्थानाला प्राप्त करून घेतात ज्ञानी लोक नेहमीं सत्य ग्रहण करतात व असत्याचा त्याग करतात म्हणून प्रत्येकानें आपल्या बुद्धींत श्रेष्ठ विचार धारण करून आपणास श्रेष्ठ बनवावें

ऋतस्य हि वर्तनयः सुजातमिषो वाजाय प्रदिवः सचन्ते ।
अधीवासं रोदसी वावसाने घृतैरन्नैर्वावृधाते मधूनाम् ॥
ऋ० १० । ५ । ४

( ऋतस्य ) सत्याचे ( प्र-दिवः वर्तनयः ) अत्यन्त तेजस्वी सनातन मार्ग ( इषः वाजाय ) मनाची इच्छा व अन्न यांसाठीं ( सचन्ते ) सहाय करतात. जे ( रोदसी ) द्युलोक व पृथ्वी ( सुजातं ) उत्तम प्रसिद्ध ( अधिवासं ) सर्व व्यापक ईश्वराला ( वावसाने ) राहावयास जागा देणारे आहेत. ते ( घृतैः ) तुपाच्या द्वारें व ( मधूनां अन्नैः ) मधुर अन्नाच्या योगानें ( वावृधाते ) सर्वांना पुष्ट करतात.

सनातन सत्य धर्ममार्गाचें पालन करण्यानें सर्व लोकांचें मनोगत पूर्ण होतें; व त्या योगानें सर्व लोक बलवान ही होऊं शकतात. कारण पूजनीय ईश्वर सर्वव्यापक आहे व तो सर्वांना तूप अन्न इत्यादींनीं पुष्ट करतो; म्हणून त्याच्या उपासनेनें सर्वांना बल प्राप्त होतें.

असच्च सच्च परमे व्योमन्दक्षस्य जन्मन्नदितेरुपस्थे ।
अग्निर्ह नः प्रथमजा ऋतस्य पूर्व आयुनि वृषभश्च धेनुः ॥
ऋ १० । ५ । ७

( दक्षस्य जन्मन् ) बलाच्या उत्पत्तीच्या प्रसंगीं, (अ-दितेः) अविनाशी मूल प्रकृतीच्या ( उपस्थे ) जवळच्या स्थानावर ( परमे व्योमन् ) अत्यंत विस्तृत आकाशांत ( सत् च ) तीन्ही कालांत असणारें एक अधिकारी आत्मतत्त्व व ( अ-सत् च ) त्या आत्म्याहून भिन्न पदार्थ असे दोन पदार्थ होते. याच्या ( पूर्वे आयुनि ) पूर्व अवस्थेमध्यें ( ह नः ) निश्चयपूर्वक आम्हां सर्वांच्या ठिकाणीं ( ऋतस्य प्रथमजाः ) सत्य धर्माचा पहिला प्रवर्तक ( अग्निः ) तेजस्वी ईश्वर प्रकाशित झाला व त्याच्या बरोबरच (वृषभः) बलवान आत्मा व ( धेनुः ) कामधेनु अर्थात् बुद्धि ही होती.

प्रकृति व ईश्वर अनादिकालापासून आहेत. ईश्वर प्रकृतीच्या ठिकाणीं बलाचा संचार करतो तोच सत्यधर्मांचा पहिला प्रवर्तक आहे. बल व पोषण.

शक्ति, बलवान आत्मा व सुबुद्धि, हीं सर्व परमेश्वराबरोबर रहात असतात- अर्थात् परमेश्वरापासून सर्वांना बल प्राप्त होतें; व परमात्म्यापासून उत्तम बल प्राप्त होऊन हीं सर्वजण योग्य रीतीनें आपलें कार्य करण्यांत साफल्य मानतात व उत्तम फल प्राप्त करून घेतात.

यमोदनं प्रथमजा ऋतस्य प्रजापतिस्तपसा ब्रह्मणेऽपचत् ।
यो लोकानां विधृतिर्नाभिरेषात्तेनौदनेनाति तराणि मृत्युम् ॥
अथर्व ४।३५।१

( ऋतस्य प्रथमजाः ) सत्याचा पहिला प्रवर्तक जो ( प्रजापतिः ) प्रजापति परमेश्वर त्यानें ( तपसा ) आपल्या तेजाच्या योगानें (यं ओदनं) सृष्टिरूपी तांदूळ ( ब्रह्मणे अपचत् ) ज्ञानासाठीं अथवा ब्रह्मासाठीं शिजविलें, व ( यः ) जो ( लोकानां विधृतिः ) लोकांना विशेष धारण करणारा व जो सर्वांच्या ( नाभिः ) मध्यभागीं विराजमान आहे त्यानें (तेन ओदनेन) शिजविलेल्या त्या सृष्टिरूपी तांदुळाच्या योगानें आम्ही ( मृत्युं अतितराणि ) मृत्यूच्या पार होतों.

परमेश्वरानें या विश्वाच्या भांड्यांत सृष्टिरूपी अन्न शिजविलें आहे. तें वनविन्यास त्यानें आपलीच उष्णता ( तेज ) उपयोगांत आणली व त्या तेजानें किंवा उष्णतेनें हें अन्न तयार केलें. तो ईश्वर सर्वांना आधारभूत आहे व सर्व सृष्टीच्या मध्यें असतो. त्यानें तयार केलेलें हें अन्न सेवन करून व त्यापासून बळ संपादून आम्ही मृत्युच्या पार जाऊं.

सूचना— पाठकांनीं यासमाणें मंत्राचे अर्थ करावेत. व ते मनन करून समजून घ्यावे.

---

# पाठ ५ वा

शब्दानुकरणानें कांहीं शब्द बनतात. कावळा " काँ काँ " शब्द करतो म्हणून त्याला संस्कृतांत काक असें नांव आहे. त्याचप्रमाणें टिट्टिभ पक्षी ( टिटवी ) 'टिट् टिट्' शब्द करीत असल्यानें त्या शब्दावरून त्याला टिट्टिभ असें नांव पडलें आहे.

औपमन्यव नामक व्याकरणाचार्याचें असें मत आहे कीं हे शब्द केवळ शब्दानुकरणानें बनले नसून यांनाही यौगिक अर्थ आहेत. पण इतर कांहीं व्याकरणाचार्य असे शब्द केवळ शब्दानुकरणानेंच बनले आहेत असें मानतात. यासंबंधीं प्रायः सर्वसंमत असे निरुक्तीचे ( व्युत्पत्ति ) नियम खालीं दिले आहेत.

( १ ) ज्या पदांत स्वर, धातु, प्रत्यय इत्यादि स्पष्टपणें दिसत असतात, त्यांची निरुक्ति व्याकरणांत सांगितलेल्या नियमांप्रमाणेंच करणें योग्य आहे. जसें-दिव् धातु + अ प्रत्यय= " देव " असा शब्द सिद्ध झाला. येथें देव शब्दाची व्युत्पत्ति स्पष्ट आहे.

( २ ) ज्या ठिकाणीं वर लिहिल्याप्रमाणें व्याकरणांत सांगितल्याप्रमाणें स्पष्ट अशी शब्दाची व्युत्पत्ति दिसून येत नाहीं तेथें अर्थाला प्राधान्य देऊन अर्थाच्या धोरणानें धातूची कल्पना करून व्युत्पत्ति व अर्थ करणें जरूर असतें. जसें " नि गम् " धातूपासून " निघण्टु " शब्द बनला आहे. येथें धातु स्पष्टपणें दिसत नाहीं. म्हणून शब्दाच्या अर्थानें मूळ धातूचा संबंध अशा ठिकाणीं पहावा लागतो.

( ३ ) जेथें अर्थसाम्य नसेल व धातूही स्पष्टपणें दिसून येत नसेल तेथें वर्णसाम्यानें योग्य धातूची कल्पना करून अर्थ करावा. उदाहरणार्थ-" गम् " धातूपासून " गौ " शब्द बनला आहे. येथें केवळ " ग " या अक्षरासच साम्य आहे. त्यांत गम् अथवा अन्य एखादा धातु मुळींच दिसून येत नाहीं, म्हणून अक्षर सादृश्यानें येथें धातु घेतला जातो.

अक्षराच्या अथवा वर्णांच्या साम्यावरून व्युत्पत्ति शोधून काढण्यासंबंधीं म्हाळीं दिलेले नियम विशेष लक्ष्यांत ठेवावेत—

( १ ) धातूच्या पहिल्या अक्षराचा अवशेष-जसें "प्र+दा" धातूला "त" प्रत्यय लागून "प्रत्त" रूप होतें. यांतील दा धातूचें प्रथमाक्षर जें द् त्याचा अवशेष "द्+त=त्त झाला आहे वास्तविक 'प्रदात' रूप व्हावयास पाहिजे, परंतु तसें होत नाहीं या नियमाचें हें उदाहरण झालें

( २ ) प्रथमाक्षराचा लोप अस् धातूच्या प्रथमाक्षराचा लोप होऊन अस् धातूची "स्त, सन्ति," अशीं रूपें होतात त्याप्रमाणें रूपें होणारे धातु.

( ३ ) कांहीं धातूंतील अंत्य अक्षराचा लोप होतो उदाहरणार्थ "गम्" धातूला त्वा प्रत्यय लागून अन्त्य मकाराचा लोप होऊन "गत्वा" असें रूप होतें.

( ४ ) कांहींतील उपान्त्य अथवा मध्याक्षराचा लोप होतो 'गम्' धातूपासून "जगमतु" रूप व्हावयाचें, पण तसें न होता "जग्मतु" असें रूप होतें येथें "गम्" धातूच्या ग अक्षरांतील अ वर्णाचा लोप झाला त्यामुळें गम् चें ग्म बनते व 'जग्मतु जग्मु' इत्यादि रूपें होतात.

( ५ ) कांहीं पदांतील उपान्त्य अक्षराची वृद्धि होते जसें- "राजन्" शब्दाचें रूप "राजा" असें होते 'दण्डिन्' शब्दाचें "दण्डी" असें रूप होतें येथें अन्त्य न चा लोप झाला असून उपान्त्य अ अथवा ई दीर्घ झाली

( ६ ) कोठें कोठें कित्येक अक्षरांचा लोप होत असतो जसें "याच्" (याचना करणें) या धातूचें वेदांतील रूप "यामि" होतें, "याचामि" होत नाहीं धातु मधील "चा" अक्षराचा लोप झाला "तत्वा यामि" ( ऋ० १।२४।११ ) या मन्त्रात "यामि" शब्द "याचामि" शब्दाबद्दल आला आहे.

( ७ ) कांहीं शब्दांत दोन वर्णांचाही लोप होतो जसे "त्रि+ऋच्" यापासून "तृच" शब्द बनतो येथें त्रि अक्षरांतील र्+इ अर्थात् "रि" चा लोप होऊन केवळ 'त्+ऋच्' मिळून 'तृच' शब्द झाला आहे.

( ८ ) कांहीं शब्दांत आद्याक्षराचा विपर्यय होतो. जसें " द्युत् " धातूपासून " द्योतिष " शब्द बनण्याऐवजीं " ज्योतिष " शब्द बनला आहे. तसेंच " हन् " धातूपासून " घन " शब्द बनला आहे. भिद् धातूपासून " बिन्दु " शब्द झाला आहे.

( ९ ) कांहीं शब्दांत अक्षरांच्या जागा बदलल्या जातात; म्हणजे आद्याक्षर शेवटीं व अंत्याक्षर आरंभीं येतें. जसें सृज् धातूपासून " सर्जु " शब्द बनावयास पाहिजे पण त्याऐवजीं "रज्जू" शब्द बनला आहे. सर्जूचा 'रज्जू' बनून त्यापासून रज्जू शब्द होतो. कस् धातूपासून " कसिता " असा शब्द बनण्याच्या ऐवजी " सिकता " असा शब्द बनतो. कृत् धातूपासून " कर्तु " बनण्याऐवजीं " तर्कु " असा शब्द बनतो.

( १० ) कांहीं शब्दांत अन्त्याक्षराचा विपर्यय होतो. जसें " मिह् " धातूपासून " मेघ, " " वह् " धातूपासून " ओघ " " गाह् " धातूपासून " गाध " या प्रमाणें शब्द बनतात. अन्त्य " ह् " च्या ऐवजीं वरील धातूंत अन्य वर्ण झाले आहेत. तसेंच " वह् " धातूपासून " वध " व " मह् " धातूपासून मधु असे शब्द बनले आहेत.

( ११ ) कधीं कधीं नवें अक्षर मध्यें घुसडलें जातें. जसें अस् (फेंकणें) धातूपासून " आस्यत् " शब्द होतो. येथें मध्यें यकार घुसला आहे. वृ ( वार ) या निवारण करणें अशा अर्थाच्या धातूपासून 'द्वार' शब्द बनला आहे; या शब्दांत दकार घुसला आहे.

वरील नियम वाचकांनीं चांगले लक्षांत ठेवल्यास त्यांना शब्दसिद्धीच्या बाबींचें उत्तम ज्ञान होईल. कारण या नियमांना अनुसरूनच बहुतेक सर्व शब्दांची व्युत्पत्ति सिद्ध केली जाते. वाचकांनीं या नियमांचें चांगलें मनन करावें व वैदिक शब्दांत या नियमांप्रमाणें कसें कार्य घडून आलें आहे तें पहावें. आतांपर्यंत हे सर्वसाधारण नियम सांगण्यांत आले; परंतु आणखी कांहीं विशेष नियम आहेत कीं ज्यामध्यें धातूचें स्वरूप देखील बदलून जातें. असे नियम खालीं दिले आहेत—

(१२) कांहीं क्रियापदांचें संप्रसारण होतें. धातूंतील य, र, ल, व, यांच्या ठिकाणीं इ, उ, ऋ, ऌ होणें यास संप्रसारण असें म्हणतात, जसें. यज् धातूपासून इष्टि, इष्टवान्, इष्ट्वा, इष्ट इत्यादि शब्द बनतात; या शब्दांत य च्या ठिकाणीं इ झाली आहे. 'अव्' धातूच्या वकाराच्या ठिकाणीं उकार होऊन " ऊति " शब्द रक्षण अशा अर्थी बनला आहे. " प्रथ् " धातूपासून " पृथु " शब्द बनला आहे, यांत रकाराच्या ठिकाणीं ऋ झाला. तसेंच " म्रद् " धातूपासून " मृदु " शब्द बनला आहे.

(१५) दोन शब्दांचा संयोग होऊन कांहीं शब्द बनतात. वेदांतील पुरुष हा शब्द घ्या. सकृत्दर्शनीं तो समास आहे असें वाटत नाहीं. तथापि तो समास आहे. जसें–पुरुष, (पुर+उष, पुर्–वस, पुरि–वस, पुरि–वष्) अर्थात् जो पुरींत म्हणजे नगरांत राहतो, वसति करतो, निजतो त्यास पुरुष म्हणतात. [illegible] शब्द पुर+वस या दोन शब्दांपासून झाला आहे, व वस् मधील वकाराचा उकार बनून " पुर+उष "=पुरुष असा शब्द बनला. याचें उदाहरण पहा—

वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकस्तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम्॥
ऋग्वेद.

" वृक्षाप्रमाणें स्तब्ध राहून (दिवि) द्युलोकांत म्हणजे आकाशांत (एकः) एक (तिष्ठति) रहात असतो. (तेन पुरुषेण इदं सर्वं) त्या पुरुषानें म्हणजे आत्म्यानें हें सर्व (पूर्णं) परिपूर्ण झालेलें आहे. " या मंत्रांत पुरुष शब्द आत्मा या अर्थानें आला आहे. नगरांत राहणारा मनुष्य अशा अर्थी ही पुरुष शब्दाचा प्रयोग होतो. देहनिवासी असा ही या शब्दाचा अर्थ आहे. याप्रमाणें पुरुष शब्दाचे त्या त्या ठिकाणच्या संदर्भाप्रमाणें अनेक अर्थ होऊं शकतात. अर्थात् शरीररूपी पुरींत राहणारा तो जीवात्मा, नगररूपी पुरींत राहणारा तो नागरिक मनुष्य व जगत् रूपी पुरींत राहणारा तो परमात्मा असे 'पुरुष' शब्दाचे अनेक अर्थ होतात.

वेदांतील शब्दांचे अर्थ त्यांच्या क्षेत्रमर्यादेप्रमाणें केले पाहिजेत हें विशेष ध्यानांत धरण्यासारखें आहे. कांहीं शब्द असे आहेत कीं त्यांच्या क्षेत्रविस्तारामुळें त्यांचे अनेक अर्थ होतात. उदाहरणार्थ इन्द्र शब्द.इन्द्र शब्दाचा अर्थ शरीराच्या क्षेत्रांत राहणारा जीवात्मा, राष्ट्राच्या क्षेत्रांत राहणारा राजा व जगाच्या क्षेत्रांत राहणारा परमात्मा असा तीन प्रकारचा आहे.याप्रमाणें अर्थ करण्याच्या कामांत या व्युत्पत्तिच्या योगानें आपणांस बरेंच सहाय्य होईल.



## पाठ ६ वा.

या पाठांत खालील मंत्रांचें अध्ययन करावें—

इळा सरस्वती मही तिस्रो देवीर्मयोभुवः ।
बर्हिः सीदन्त्वस्रिधः ॥

ऋ० १।१३।९

( इळा ) मातृभाषा, ( सरस्वती ) मातृसंस्कृति व ( मही ) मातृभूमि या ( तिस्रः देवीः ) तीन देवता ( मयोभुवः ) कल्याण करणाऱ्या आहेत. म्हणून या तीन्ही देवता ( बर्हिः ) अंतःकरणांत ( अ-स्रिधः ) न विसरतां किंवा अंतःकरणपूर्वक ( सीदन्तु ) स्थिर राहोत.

" इळा " शब्द भाषावाचक आहे; इळा व इडा हे दोन्ही शब्द "इळ्' धातूपासून झाले आहेत. इडा अथवा इळा शब्दाचे पुष्कळ अर्थ आहेत. परंतु येथें भाषा हा अर्थ अपेक्षित आहे. अर्थ स्पष्ट होण्यासाठीं वरील मंत्रांत "मातृभाषा" असा अर्थ केला आहे. जी ज्या लोकांची भाषा ती त्यांची मातृभाषा असेंच म्हटलें जातें.

" सरस्वती " शब्दाचा मूळ अर्थ(सरस्) प्रवाहानें युक्त असा आहे. अनादि प्रवाहानें म्हणजे गुरुशिष्यपरंपरेच्या द्वारें जी विद्या किंवा संस्कृति

चालत आलेली असते त्या प्रवाहमय संस्कृतीला सरस्वती असें नाव आहे.
''मही''शब्दाचा अर्थ भूमि आहे, येथें मातृभूमि हा अर्थ अपेक्षित आहे
या तीन्ही देवींची प्रत्येक मनुष्यानें उपासना करणें योग्य आहे या तीन्ही देवींचे उपासक राष्ट्रांत जितक्या अधिक प्रमाणांत असतील तितका त्या राष्ट्राचा अधिक अभ्युदय होईल म्हणून या देवींना योग्य स्थान प्रत्येक मनुष्याच्या हृदयांत मिळणें अवश्य आहे असें वेदानें सांगलें आहे या तिन्ही देवी कल्याण करणाऱ्या आहेत म्हणून प्रत्येक मनुष्याच्या मनांत त्यांच्याविषयीं आदर भाव जागृत असावा व प्रत्येकानें त्यांच्या करितां तनमनधन अर्पण करण्यास तयार असावें.

तिस्रो देवीर्बर्हिरेदं सदन्त्विडा सरस्वती मही ।
भारती गृणाना ॥ अथर्व० ५।२७।९

तिस्रो देवीर्बर्हिरेदं सदन्त्विडा सरस्वती भारती। मही गृणाना॥
वा० यजु० २७। १९

( इडा ) वाणी ( सरस्वती ) विद्या व ( मही भारती ) पोषणकर्त्री भूमि या ( तिस्र देवी ) तीन देवता ( गृणाना ) प्रशंसा केल्या जाणाऱ्या ( बर्हि सदन्तु ) मनांत बसोत ( राहोत ) अर्थात् यांना मनांत योग्य व आदरणीय स्थान मिळो

सरस्वती साधयन्ती धियं न इळा देवी भारती विश्वतूर्तिः।
तिस्रो देवीः स्वधया बर्हिरेदमच्छिद्रं पान्तु शरणं निषद्य ॥
ऋ० २।३।८

( नः धियं साधयन्ती ) आमच्या बुद्धीला साधन करणारी ( सरस्वती ) विद्या, ( इळा ) मातृभाषा, तसेंच ( विश्वतूर्ति भारती ) सर्वांहून विशेष मातृभूमि या ( तिस्र देवी ) तीन देवता ( स्व-धया ) आपल्या धारणा-शक्तीं सहित ( इद बर्हि ) हें यज्ञस्थान अर्थात् जें मन आहे त्यास ( शरण निषद्य ) आश्रय देऊन ( अ-छिद्र ) दोषरहित रीतीनें ( पान्तु ) रक्षण करोत

विद्या, भाषा व मातृभूमि या तीन देवता अत्यंत शक्तिमान् आहेत. आपल्या सामर्थ्याने आम्हांला आश्रय देऊन यांनी येथील आमचा शतसांवत्सरिक यज्ञ पूर्ण करावा. अर्थात् आमच्या संपूर्ण आयुष्यांत आमच्या कडून या तीन देवतांची भक्ति होत रहावी.

आ भारती भारतीभिः सजोषा इळा देवैर्मनुष्येभिरग्निः ।
सरस्वती सारस्वतेभिरर्वाक् तिस्रो देवीर्बर्हिरेदं सदन्तु ॥
ऋ० ७।२।८

( भारतीभिः भारती ) भारतीच्या अर्थात् भूमीच्या वरील जनतेसह मातृभूमि, ( देवैः मनुष्यैः इळा ) दिव्य मनुष्यांसह मातृभाषा व ( सारस्वतेभिः सरस्वती ) विद्याभक्तांसह विद्यादेवी, याप्रमाणें या तीन्ही देवता ( सजोषाः ) सारख्याच प्रेमानें ( अर्वाक् ) आम्हांजवळ येऊन ( बर्हिः ) आमच्या अंतःकरणांत ( सदन्तु ) बसोत अर्थात् वास करोत.

प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत या तिन्ही देवतांसंबंधी भक्ति असणें अवश्य आहे. ( १ ) सर्व देशबांधवांसह मातृभूमि, ( २ ) मातृभाषा बोलणाऱ्यांसह मातृभाषा व ( ३ ) समान संस्कृतीवाल्यांसह मातृसंस्कृति अशा या तीन देवींची उपासना प्रत्येक माणसानें करणें अवश्य आहे.

पावका नः सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती ।
यज्ञं वष्टु धियावसुः ॥
ऋ० १।३।१०

( पावका ) पवित्र करणारी, ( धिया-वसुः ) बुद्धीच्या बरोबर राहणारी, ( वाजेभिः वाजिनीवती ) अनेक बलांनीं युक्त ( सरस्-वती ) सरस्वती देवी ( नः ) आमच्या ( यज्ञं ) यज्ञाची ( वष्टु ) इच्छा करो. अर्थात् आमच्या संपूर्ण कर्मांत विद्या विराजमान होऊन राहो.

सरस्वती विद्यादेवी मनुष्यांना पवित्र करणारी, बुद्धीबरोबर राहून कार्य करणारी व विविध सत्कर्मांनी युक्त अशी देवी आहे. ही देवी आमच्या वाजीला पूर्णत्व देणारी होवो.

चोदयित्री सूनृतानां चेतन्ती सुमतीनाम् ।
यज्ञं दधे सरस्वती ॥

ऋ० १।३।११

ही (सरस्वती) विद्यादेवी (सूनृतानां) उत्तम भावनांची (चोदयित्री) प्रेरक, (सुमतीनां चेतन्ती) उत्तम कल्पनांना चैतन्य देणारी अशी आहे. ती आमच्या वाणीच्या यज्ञाला (दधे) धारण करो.

विद्यादेवीच्या योगानें मनांत उत्तम व शुभ अशा भावना प्रकट होतात. बुद्धीस पावित्र्य येतें, म्हणून विद्यादेवीच्या योगानें आमचा वाग्यज्ञ पवित्र होवो.

महो अर्णः सरस्वती प्रचेतयति केतुना ।
धियो विश्वा विराजति ॥ ऋ० १।३।१२

(सरस्वती) विद्यादेवी (महः अर्णः) मोठ्या हालचाल करणाऱ्या समुद्राप्रमाणें आहे. ती (केतुना) विज्ञानाच्या योगानें (प्रचेतयति) चेतना उत्पन्न करते व (विश्वा धियः) सर्व बुद्धींना (विराजति) प्रकाशित करते.

ज्याप्रमाणें समुद्रांत नेहमीं हालचाल होत असते त्याप्रमाणें विद्या देखील लोकांमध्यें हालचाल उत्पन्न करते. विद्यादेवीच्या सामर्थ्याचा अंत लागणें फार कठीण आहे. जेथें विद्येचे संस्कार होतात तेथें उन्नतिसंबंधीं हालचाल अथवा चळवळ उत्पन्न होते. विद्या देखील आपल्या ज्ञानद्वारानें सर्वांना चेतना व उत्साह देते व सर्वांची बुद्धी प्रकाशित करते अर्थात् विद्येच्या प्रकाशानें प्रकाशित झालेली बुद्धी ही सर्व विश्वांचें राज्य करते.

प्र णो देवी सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती ।
धीनामवित्र्यवतु ॥ ऋ० ६।६१।४

(वाजेभिः वाजिनीवती) अनेक बलांनीं बलयुक्त (सरस्वती) विद्यादेवी (धीनां अवित्री) आमच्या बुद्धींचें रक्षण करणारी (नः प्र अवतु) आम्हां सर्वांचें उत्तम प्रकारें रक्षण करो.

विद्येनें अनंत सामर्थ्य प्राप्त होतें व बुद्धीवर चांगले संस्कार ही होतात. याप्रकारें शुभ विद्येनें विद्वान्, बलवान् व सुबुद्धिमान् होऊन प्रत्येक मनुष्यानें स्वतःचें रक्षक बनावें व कधींही परावलंबी राहूं नये-

त्वं देवि सरस्वत्यवा वाजेषु वाजिनि ।
रदा पूषेव नः सनिम् ॥ ऋ. ६।६१।६

हे (सरस्वति) विद्यादेवी, तूं (वाजेषु) बलवानांमध्यें (वाजिनि) बलयुक्त आहेस, म्हणून तू (अव) आमचें रक्षण कर. (पूषा इव) पोषकाच्या प्रमाणें (नः) आम्हाला (सनिं रद) धनादि भोग दे.

सरस्वती विद्यादेवीपासून अनेक प्रकारचें धन प्राप्त होतें. विद्येमुळें सुखाचीं साधनें वाढत असतात, तसेंच विद्यावृद्धीनें वैयक्तिक व सामुदायिक उन्नतिही होऊं शकते

# पाठ ७ वा.

## निरुक्ति.

" पयः" शब्द दूधवाचक व तसाच जलवाचक आहे. "पा" (पिणें) या धातूपासून हा शब्द बनला आहे. (पीयते तत् पयः) जें प्यालें जातें तें पय (दूध, जल इ० ) होय.

दुधाला दुसरें संस्कृत नांव क्षीर आहे. "क्षर्"(क्षरणें, झिरपणें)या धातूपासून तो झाला आहे. जें (क्षरति) स्तनापासून झिरपतें, त्यालाच क्षीर किंवा दूध म्हणतात.

'अंशु' शब्द सोमवाचक आहे. सोमवल्लि अथवा विशेषतः सोमरस याचा उल्लेख अंशु शब्दानें होतो. हा शब्द अश्+शं या दोन शब्दांपासून झाला आहे. ( अशनाय शं भवति ) खाण्यास जें हितकारी होतें तें; त्याचें उदाहरण खालीलप्रमाणें—

अंशुं दुहन्तो अध्यासते गवि ॥ ऋ० १०।९४।९

" ( अंशुं ) सोमाचा ( दुहन्तः ) रस काढणारे ( गवि ) कातड्यावर ( अध्यासते ) बसतात. येथें 'अंशुं' शब्दाचा उपयोग सोम अशा अर्थी केला आहे. भक्षण करण्यानें आनंद देणारा या अर्थानें हा शब्द येथें आहे.

" चर्म " शब्द " चर " ( चालणें ) या धातूपासून बनला आहे. शरीराच्या संपूर्ण बाह्य भागावर जें गेलें आहे किंवा पसरलें आहे तें चर्म होय.

" वृक्ष " शब्द " व्रश्च " ( छेदन करणें ) या धातूपासून झाला आहे. ( १ ) जो छेदला जातो किंवा ( २ ) ज्यानें शत्रू छेदला जातो अशा अर्थी हा शब्द बनला आहे.

पहिल्या अर्थाने घेतल्यास त्याचा अर्थ वृक्ष असा होतो व दुसरा अर्थ घेतल्यास लाकडापासून बनणारे धनुष्य असा अर्थ होतो. दुसऱ्या अर्थाचे उदाहरण—

वृक्षे वृक्षे नियता मीमयद्गौस्ततो वयः
प्रपतान्पूरुषादः ॥ ऋ० १०।२७।२२.

"(वृक्षे वृक्षे) प्रत्येक धनुष्यावर (नियता) चढविलेल्या अत्यंत ताणलेल्या शेळीच्या (गौ.) चर्मापासून बनलेली दोरी (मीमयत्) शब्द करते व (पूरुषादः) मनुष्यांना खाणाऱ्या (वयः) पाखरांसारख्या बाणांना (प्रपतान्) फेकते.

येथे तीन शब्द विशेष मनन करण्यासारखे आहेत—

(१) वृक्ष– लाकडापासून बनविलेले धनुष्य
(२) गौ–गाईच्या चामड्यापासून बनविलेली धनुष्याची दोरी
(३) वयः– बाणाचे पंख लावलेले बाण.

होणाऱ्या फळांनीं व फुलांनीं प्राणिमात्र रममाण होतात. ”

“ निर्ऋति ” शब्दाचा दुसरा अर्थ “ कष्ट, दुर्गति, वाईट अवस्था ” इत्यादि आहे. हा शब्द वरील शब्दाहून भिन्न आहे. हा शब्द “ निर्+ ऋच्छ ” ( “ कष्ट प्राप्त होणें ” ) या धातूपासून झाला आहे. जरी हे दोन शब्द दिसण्यांत एक आहेत तथापि त्या शब्दांच्या घटनेमध्यें किती अंतर आहे व त्यांच्या अर्थांमध्येंही किती फरक आहे तें वाचकांनीं पहावें. वस्तुतः हे दोन शब्द एकमेकांपासून अगदीं भिन्न आहेत.

“अंतरिक्ष” हा शब्द मधल्या पोकळीचा अंतरिक्षलोकाचा वाचक शब्द आहे. ( अंतरि ) मध्यें ( क्ष ) निवास करणारा; क्षि धातु निवास करणें अशा अर्थी आहे. हा शब्द सूर्य व पृथ्वी यांच्या मधील स्थानाचा वाचक आहे. [illegible] लोक आपल्या ( अंतरि ) आंत अनेक वस्तूंना ( क्ष ) निवास-स्थान देतो असा याचा अर्थ आहे

“ शंतनु ” = “ शं+तनु ” या दोन शब्दांपासून शंतनु शब्दाची उत्पत्ति आहे. ( शं ) सुखाचा ( तनु ) जो प्रसार करतो; तन् धातूचा अर्थ फैलाव करणें प्रसार करणें, असा आहे. दुसरा अर्थ, ( शं ) सुख आहे ( तनु ) ज्याच्या शरीरांत अथवा शरीरानें जो सुखी आहे तो शंतनु होय. या दुसऱ्या रीतीनें जो शब्द सिद्ध केला तो तन् धातूपासून बनलेला नसून दोन शब्दांचा समास होऊन झालेला आहे. वाचकांनीं याची पूर्व शब्दाशीं तुलना करून पहावी.

“ पुरोहित ” शब्दांत पुरः+हित असे दोन शब्द असून त्याचा अर्थ ( पुरः ) समोर, किंवा अग्रभागीं ( हितः ) ठासलेला असा आहे. सर्व कार्यांत जो पुढें ठेवला जातो तो पुरोहित.

“ स्वः ” शब्दाचे वेदांत पुष्कळ अर्थ आहेत त्यांत आदित्य असा ( अ-प्रमुख अर्थ आहे. ( सु + अर् = स्वर् = स्वः ) सु + अर् असे धी हा १० धात आहेत. ( सु ) उत्तम प्रकारच्या ( अर् ) गतीनें

[ अथर्ववेद १२ । १ ]

"वैदिक धर्मामध्यें" राष्ट्रीय व सार्वजनिक हिताची भावना श्रेष्ठ असल्यानें त्यांत मातृभूमिसंबंधीं अत्यंत आदरभाव असणें स्वाभाविक आहे. अथर्ववेदामध्यें एक "वैदिक राष्ट्रीय-गीत" अथवा "मातृभूमीचें सूक्त" आहे व तें मातृभूमीच्या भक्तीचें द्योतक म्हणून प्रसिद्ध आहे. सूत्रकारांनीं या सूक्ताचा विनियोग खालीलप्रमाणें केला आहे—

( १ ) ग्राम-पत्तनादि-रक्षणार्थं ।

( २ ) पुष्टिकामः,"" कृषिकामः,"" व्रीहियवाद्यकामः,"" धनधान्यादिकामः,"" मणिहिरण्यादिकामः,"" पृथिवीमहाशान्तिकामः,""भूमिकामः,""पृथिवीं उपतिष्ठते ।

"( १ ) गांवें, शहरें, राष्ट्रें इत्यादींच्या रक्षणप्रसंगीं, तसेंच ( २ ) पुष्टि, कृषि, धनधान्यादि मिळविण्याचा प्रयत्न करण्याच्या प्रसंगीं, भूमि प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नाच्या प्रसंगीं, तसेंच मातृभूमींत शांतता नांदत नसेल अशा वेळीं, देशांत पुनः शांतता प्रस्थापित करण्याच्या प्रसंगीं या "भूमि-सूक्ताचा" पाठ केला जातो.

म्हणून प्रत्येक वैदिकधर्मीयानें या सूक्ताचें अध्ययन व मनन करणें जरूर आहे. या सूक्तांतील कांहीं मंत्र खालीं दिले आहेत.

सत्यं बृहदृतमुग्रं दीक्षा तपो ब्रह्म यज्ञः पृथिवीं धारयन्ति ।
सा नो भूतस्य भव्यस्य पत्न्युरुं लोकं पृथिवी नः कृणोतु ॥१॥

( सत्यं ) सत्य, ( बृहत् ) बल, ( ऋतं ) न्याय्य व्यवहार, ( उग्रं ) क्षात्रतेज, ( दीक्षा ) दक्षता, ( तपः ) द्वंद्व सहन करण्याची शक्ति, (ब्रह्म) ज्ञान, ( यज्ञः ) सत्कार-संगति-दानात्मक शुभ कर्म, असे गुण ( पृथिवीं ) मातृभूमीस ( धारयन्ति ) धारण करतात. ( सा ) ती ( नः ) आमची ( पृथ्वी ) मातृभूमि, जी आमच्या ( भूतस्य ) भूत व ( भव्यस्य ) भविष्य तसेंच वर्तमान अवस्था यांचें ( पत्नी ) पालन करणारी आहे, ती (नः) आमच्यासाठीं ( उरुं लोकं कृणोतु ) विस्तृत स्थान देवो.

मातृभूमीच्या स्वातंत्र्याचें संरक्षण ज्या श्रेष्ठ सद्गुणांनीं होतें ते गुण पुढीलप्रमाणें:—( १ ) सत्यनिष्ठा, ( २ ) बलसंवर्धन, ( ३ ) न्याय्य व्यवहार, ( ४ ) प्रखर क्षात्रतेज, ( ५ ) कार्यदक्षता, ( ६ ) शीत, उष्ण इत्यादि द्वंद्वें सहन करण्याची शक्ति, ( ७ ) आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक ज्ञान व विज्ञान, ( ८ ) श्रेष्ठांचा मानमरातब, आपसांत ऐक्य व अनाथांना सहाय्य करण्याच्या कामीं आपलें कर्तव्य करणें इत्यादि गुणांची वाढ जनतेंत झाल्यानेंच मातृभूमीचें धारण होऊं शकतें या गुणांनीं ज्या मातृभूमीचें धारण होतें ती मातृभूमी, तेथील लोकांचें भूत, भविष्य व वर्तमानकालीन अवस्थांचें रक्षण करते व तेथील लोकांना स्वदेशांत पाहिजे तितकें विस्तृत स्थान, अर्थात् आपला फैलाव करण्यास जागा देते तात्पर्य पूर्वोक्त कीं वरील आठ गुणांनीं मातृभूमीच्या स्वातंत्र्याचें संरक्षण होतें व स्वदेशांत प्रत्येकास आपला विस्तार करण्यासाठीं भरपूर कार्यक्षेत्र मिळतें

असंबाधं मध्यतो मानवानां यस्या उद्वतः प्रवतः समं बहु ।
नानावीर्या ओषधीर्या बिभर्ति पृथिवी नः प्रथतां राध्यतां नः ॥२॥

( यस्या ) ज्या मातृभूमीच्या ( मानवानां ) मननशील मनुष्यांच्या ( मध्यतः ) मध्यें ( उत्—वतः ) उच्चता, ( प्र-वतः ) नीचता, तसेच ( समं ) समता यासंबंधीं ( बहु ) अतिशयच ( असं बाध ) निर्वैरता आहे व ( या ) जी ( नानावीर्या ओषधी ) नाना प्रकारच्या वीर्यांनीं युक्त औषधींचें ( बिभर्ति ) धारण पोषण करते, ती ( नः पृथिवी ) आमची मातृभूमि ( ■ प्रथतां ) आमच्या कीर्तीस ( राध्यतां ) साधनीभूत होवो

ज्या आमच्या राष्ट्रांत विचारशील मनुष्यांमध्यें परस्पर द्रोहभाव किंवा मत्सर नाहीं, तर उलट त्यांच्यांत पूर्ण ऐक्यच आहे व ज्यांच्यांत उच्चता, नीचता व समता यासंबंधीं मुळींच भांडणें नाहींत, तसेच जी आमची—मातृभूमी विविध गुणांनीं युक्त अशा अनंत औषधीवनस्पतींना प्रसवते, ती आमची मातृभूमि आमच्या यशाचा फैलाव करण्यास कारणीभूत होवो

यस्यां समुद्र उत सिन्धुरापो यस्यामन्नं कृष्टयः सं बभूवुः।
यस्यामिदं जिन्वति प्राणदेजत् सा नो भूमिः पूर्वपेये दधातु ॥ ३

( यस्या ) ज्या भूमीत ( समुद्रः ) समुद्र ( उत सिंधु ) व नद्या तसेंच ( आपः ) जलाशय पुष्कळ आहेत व ( यस्या ) ज्या भूमीत ( कृष्टय ) शेतें ( अन्न ) अन्न ( सं बभूवु ) उत्पन्न करतात, ( यस्या ) ज्या भूमीत ( इद प्राणत् ) श्वासोच्छ्वास करणारे व ( एजत् ) हालचाल करणारे प्राणिमात्र ( जिन्वति ) हिंडतात व फिरतात, ( सा ) ती ( भूमि. ) आमची मातृभूमि ( न ) आम्हाला ( पूर्व-पेये ) पूर्ण पेय अर्थात् खाण्यापिण्याचे सर्व पदार्थ ( दधातु ) देवो

ज्या आमच्या मातृभूमीस समुद्र, नद, नद्या, तलाव, कूप, झरे,इत्यादि विपूल आहेत, व ज्याच्या पाण्याच्या योगानें शेतकरी शेती करून विविध प्रकारची धान्यें उत्पन्न करतात, तसेंच जेथील अन्नाचें व पाण्याचें सेवन करून अनेक प्राणी जेथें आनंदानें वास्तव्य करतात, ती आमची मातृभूमि आम्हाला खाण्यापिण्याच्या उत्तमोत्तम वस्तु देत राहो अर्थात् मातृभूमी-पासून उत्पन्न होणाऱ्या अन्नानें दुसरे लोक पुष्ट होत राहून आम्हांस कांहीं ही खावयास मिळू नये अशी स्थिति कधींही प्राप्त न होवो.

यस्याश्चतस्रः प्रदिशः पृथिव्या यस्यामन्नं कृष्टयः संबभूवुः।
या बिभर्ति बहुधा प्राणदेजत् सा नो भूमिर्गोष्वप्यन्ने दधातु ४॥

( यस्या पृथिव्या ) ज्या मातृभूमीच्या ( चतस्रः प्रदिशः ) चारी दिशांच्या ठिकाणीं ( कृष्टय ) शेतकरी ( यस्या ) जिच्यांत ( अन्न ) अन्न ( संबभूवु ) उत्पन्न करतात व त्यापासून ( या ) जी भूमि ( एजत् प्राणत् ) हालचाल करणाऱ्या प्राणिमात्रांस ( बहु-धा ) बहुत प्रकारानें ( बिभर्ति ) पुष्ट करते ( सा ) ती ( नो भूमि ) आमची मातृभूमि आम्हासाठीं ( गोषु ) गाईंच्या मध्यें व ( अन्ने अपि ) अन्नाच्या ठिकाणींही ( दधातु ) धारण करो.

ज्या आमच्या मातृभूमींत सर्व ठिकाणीं शेतीपासून विविध प्रकारचें अन्न उत्पन्न होतें. तेथील अन्न खाऊन सर्व प्राणिमात्र धष्टपुष्ट होऊन आनंदानें जिच्यावर फिरत असतात ती मातृभूमि आम्हांस विपुल अन्न व गायी देणारी होवो. अर्थात् मातृभूमीच्या कृपेनें आम्हांला धान्य व गाई यांची विपुलता असो. आमच्या गाईंपासून निघणारे दूधतुपादि पदार्थ व शेतीच्या योगानें मिळणारें धान्य दुसऱ्यांनीं घेऊन जावें व आम्हांला कांहींच मिळूं नये अशी स्थिति आम्हांस कधींही प्राप्त न होवो.

> यस्यां पूर्वे पूर्वजना विचक्रिरे
> यस्यां देवा असुरानभ्यवर्तयन् ।
> गवामश्वानां वयसश्च विष्ठा
> भगं वर्चः पृथिवी नो दधातु ॥ ५ ॥

( यस्यां ) ज्या मातृभूमींत आमच्या ( पूर्वे ) प्राचीन ( पूर्व-जनाः ) पूर्वजांनीं ( वि-चक्रिरे ) विविध कर्तव्यें केलीं व ( यस्यां ) जिच्यावर ( देवाः ) देवांनीं ( असुरान् ) असुरांचा ( अभ्यवर्तयन् ) पराभव केला, तसेंच जी ( गवां ) गायींचें, ( अश्वानां ) घोड्यांचें व ( च वयसः ) पक्ष्यांचें ( वि-स्था ) विशेष निवासस्थान होऊन राहिली आहे, ती ( नः पृथिवी ) आमची मातृभूमि आम्हांला ( भगं ) ऐश्वर्य व ( वर्चः ) तेज ( दधातु ) देवो.

ज्या मातृभूमींत आमच्या पूर्वजांनीं नाना प्रकारचीं पराक्रमाचीं कृत्यें केलीं, जेथें सज्जनांनीं दुर्जनांचा पराभव केला होता व जीवर गाई, घोडे व अन्य पशुपक्षी हीं सुखानें नांदतात ती आमची आश्रयदाती मातृभूमि आम्हांला ऐश्वर्य व तेज देणारी होवो.

> विश्वंभरा वसुधानी प्रतिष्ठा हिरण्यवक्षा जगतो निवेशनी ।
> वैश्वानरं बिभ्रती भूमिरग्निमिन्द्रऋषभा द्रविणे नो
> दधातु ॥ ६ ॥

( विश्वं-भरा ) सर्वांचें पोषण करणारी, ( वसु-धानी ) रत्नांची खाण, ( प्रतिष्ठा ) सर्वांचा आधार, ( हिरण्यवक्षाः ) जिच्या अंतर्भागांत सुवर्ण आहे, ( जगत निवेशनी ) प्राण्यांना निवासस्थान देणारी, ( वैश्वा-नरं ) सर्व मनुष्यसमूह ( अग्नि ) हाच एक अग्नि त्या अग्नीचे ( बिभ्रती ) धारण पोषण करणारी व ( इन्द्र-ऋषभा ) इन्द्र कडून जिच्यावर वृष्टि केली जाते अशी आसची ( भूमिः ) मातृभूमि ( नः ) आम्हांला ( द्रविणे ) धनामध्यें ( दधातु ) धारण करो.

जी आमची मातृभूमि रत्न, सोनें, चांदी इत्यादिकांची केवळ खाणच आहे, सर्व प्रकारचीं खाद्यपेयें देऊन जी सर्व प्राण्यांचें पोषण करित्ये, मनुष्य-समुदायरूपी राष्ट्रीय अग्नीला जी जागी ठेवत्ये, व जेथें इंद्र स्वत: वृष्टि-करतो, ती आमची श्रेष्ठ मातृभूमि आम्हांला सर्व प्रकारच्या धनराशी देवो.

यां रक्षन्त्यस्वप्ना विश्वदानीं देवा भूमिं पृथिवीमप्रमादम् ।
सा नो मधु प्रियं दुहामथो उक्षतु वर्चसा ॥ ७ ॥

( विश्व-दानीं ) सर्व कांहीं देणाऱ्या ( यां पृथिवीं भूमिं ) ज्या मातृ-भूमीला ( अ-स्वप्नाः ) सुस्ती न करणारे ( देवाः ) देव लोक ( अप्रमादं ) न चुकतां ( रक्षन्ति ) रक्षण करीत असतात, ( सा ) ती ( नः ) आम्हाला ( प्रियं मधु ) प्रिय मधु ( दुहां ) देत राहो ( अथो ) व ( वर्चसा ) तेजासह आम्हांला ( उक्षतु ) वाढवो.

ज्या आमच्या मातृभूमीचें रक्षण ज्ञानी व शूर पुरुष न चुकतां व आळस सोडून करीत आले आहेत, ती आम्हाला सर्व कांहीं देणारी मातृभूमि आम्हास नेहमीं गोड गोड पदार्थ देत राहो व आमचें तेज व पराक्रम वाढवो

---

# पाठ ९ वा.

"पणि" शब्द "पण" ( व्यवहार करणें ) या धातूपासून बनला असून धाणी किंवा वदयी याचा वाचक आहे. "वणिक्" शब्दही पणि शब्दाचेंच रूप आहे. पणि—पणिक-वणिक-वणिक् अशी या शब्दाची उत्पत्ति आहे. ( पण्यं नेनेक्ति ) विक्रीचे पदार्थ नित्य घेऊन जात असतो म्हणून त्याला वणिक् म्हणतात.

"बिल" शब्दाची व्युत्पत्ति तर फारच विचित्र आहे. "भृ" ( भरण करणें ) या धातूपासून "भर" शब्द बनतो. "भर-भल-भिल-बिल" याप्रमाणें शेवटचा बिल शब्द बनला.

"कृष्ण" शब्द कृष् धातूपासून बनला आहे. ज्यामध्यें कर्षण अथवा निकृष्टता असते, त्या वर्णाला कृष्ण ( काळा ) असें नांव आहे.

"अहः", शब्द दिवसवाचक आहे ( उपाहरन्ति अस्मिन् कर्माणि ) दिवसा सर्व कर्में केली जात असतात. अ+हर् शब्दांत "आ+हृ" धातूची कल्पना आहे. या दोन शब्दांच्या उदाहरणार्थ खालील मंत्र पहा —

अहश्च कृष्णमहरर्जुनं च विवर्तेते रजसी वेद्याभिः ॥

ऋ० ६।९।१

( "कृष्णं अहः च ) काळा दिवस अर्थात् रात्र व ( अर्जुनं अहः च ) श्वेत दिवस अर्थात् दिवस हे दोन्ही ( रजसी ) शोभायुक्त ( वेद्याभिः ) जाणण्यास योग्य अशा आपापल्या प्रकृतीनुरूप (विवर्तेते) नेहमीं विरोधी भावानें वागत असतात." अर्थात् दिवस व रात्र ह्यांच्या ठिकाणीं एकमेकांविरुद्ध गुण आहेत.

र आणि ल यांमध्यें अभेद समजला जातो. वेदांमध्यें हा नियम बऱ्याच ठिकाणीं पाळल्याचें दिसून येते. मेघवाचक शब्द "उपर व उपल" हे घ्या.

ज्यांत र च्या ठिकाणीं ल झाला आहे. वास्तविक " उपल " शब्द हा दगड या अर्थी आहे. मेघांमधून दगडासारख्या गारा पडतात म्हणून मेघाला हें नांव मिळालें आहे—

" उपर " शब्दांत " उप+रम् " धातु आहे. ज्यांत लोक रमतात, ज्याची शोभा पाहून लोक रमतात त्याला " उपर " (मेघ) हें नांव आहे.

" प्रथम " शब्दाची आतां व्युत्पत्ति पहा. प्रकृष्टतम-प्रतम-प्रथम-या-प्रमाणें मधलीं दोन अक्षरें लुप्त होऊन व त च्या ठिकाणीं थ येऊन वरील शब्द बनला.

" शुष्म " शब्द बलवाचक आहे. " शुष् " ( शोषण करणें ) या धातूपासून तो बनला आहे. बलानें शत्रूची शक्ति शुष्क करतां येते.

" सानु " शब्द शिखरवाचक आहे. याची व्युत्पत्ति अशी आहे. (सं+उद्+नुत ) समुनुत=समुनु=सनु=सानु. मूळ शब्दाचें असें हें संक्षिप्त रूप या प्रकारें बनलें. " समुनुत " शब्दाचा अर्थ " अत्यंत उच्च स्थान " असा आहे. सानु शब्दाचा अर्थही तोच आहे.

" पर " शब्द " पार " या शब्दाचें रूप आहे. पर शब्दाचा अर्थ पलीकडचा असा आहे.

"मुहूर्त" शब्द अल्प कालाचा वाचक आहे. याची व्युत्पत्ति 'मुहुः+ऋतु' =मुहुर्+ऋतु=मुहूर्त अशी आहे. ऋतूचा अर्थ कालविभाग असा आहे. वारंवार येणाऱ्या कालविभागास मुहूर्त म्हणतात.

"पाणि" शब्दाचा अर्थ हात आहे, यांतील पण् धातूचा अर्थ व्यवहार, कामकाज करणें असा आहे. हातानें कामकाज केलें जातें म्हणून त्यांस दिलेलें पाणि हें नांव सार्थ आहे.

"पथ, पन्था " हे शब्द मार्गवाचक आहेत पत् अथवा पथ् धातूपासून हे शब्द बनले आहेत. पायानें आक्रमिला जातो, एका स्थानापासून दुसऱ्या स्थानाला पोंचवितो म्हणून पथ अथवा पन्था हें नांव पडलें आहे.

" अपत्य "शब्दांत अ+पत्य असे दोन शब्द आहेत. अपतन अर्थात

प्रथम मंत्रांत सांगितल्याप्रमाणें हिचें आठ गुणांनीं उत्तम प्रकारें धारण होऊन असून हिचें स्वातंत्र्य ही सुरक्षित असें आहे म्हणून अशा प्रकारच्या या मातृभूमिस्त माझा प्रणाम आहे

> यस्यां वृक्षा वानस्पत्या ध्रुवास्तिष्ठन्ति विश्वहा ।
> पृथिवीं विश्वधायसं धृतामच्छावदामसि ॥ २७ ॥

( यस्यां ) जिच्या ठिकाणीं ( वानस्पत्या, वृक्षा ) वनस्पति व वृक्ष ( विश्वहा ) सदा ( ध्रुवा ) स्थिर ( तिष्ठन्ति ) राहतात त्या ( विश्व-धायसं ) सर्वांना धारण करणाऱ्या व जिला आम्ही ( धृता ) धारण केली आहे अशा ( पृथिवीं ) मातृभूमीचें ( अच्छा आवदामसि ) आम्ही स्वागत करतों

ज्या आमच्या मातृभूमींत वृक्ष, वनस्पती व विविध औषधी या सदा फुलतात व फलयुक्त असतात, जी आम्हा सर्वांना धारण करते व आम्ही सर्व ( प्रथम मंत्रोक्त आठ गुणांनीं ) जिचें धारण करीत असतों अर्थात् जिच्या स्वातंत्र्याचें रक्षण करीत असतों, त्या वंदनीय मातृभूमीचें आम्ही सर्व स्वागत करतों

> उदीराणा उतासीनास्तिष्ठन्तः प्रक्रामन्तः ।
> पद्भ्यां दक्षिणसव्याभ्यां मा व्यथिष्महि भूम्याम् ॥ २८ ॥

( उदीराणा ) उठतांना, ( उत आसीना ) किंवा बसत असतांना, ( तिष्ठन्त ) उभे असतांना, ( प्रक्रामन्त ) हिंडत फिरत असतां अथवा पळत असतां ( दक्षिण-सव्याभ्यां ) डाव्या अथवा उजव्या ( पद्भ्यां ) पायांनीं ( भूम्यां ) भूमीला ( मा व्यथिष्महि ) आमच्याकडून कष्ट न होवोत

आमची कोणत्याही प्रकारची हालचाल मातृभूमीस कष्ट न देणारी अशी होवो

⁂

## पाठ १२ वा-

विमृग्वरीं पृथिवीमा वदामि क्षमां भूमिं ब्रह्मणा वावृधानाम् ।
ऊर्जं पुष्टं बिभ्रतीमन्नभागं घृतं त्वाभि नि षीदेम भूमे ॥ २९ ॥

( वि-मृग्वरीं ) विशेष संशोधन करण्यास योग्य, ( ब्रह्मणा ) ज्ञानानें ( वावृधानां ) वाढवणारी, ( ऊर्जं ) बलदायक ( पुष्टं ) पुष्टिकारक ( घृतं अन्नभागं ) तूप व अन्नादि भोग्य पदार्थ ( बिभ्रतीं ) धारण करणारी, ( क्षमां ) निवास करण्यास योग्य ( पृथिवीं ) व विस्तृत ( भूमिं ) अशा मातृभूमिची मी ( आ वदामि ) प्रार्थना करतों कीं हे ( भूमे ) मातृभूमि आम्हां सर्वांना ( त्वा ) तुजवर ( अभि नि षीदेम ) बसूं दे.

आमची मातृभूमि अत्यंत उत्तम आहे म्हणून तिचें नाना प्रकारें संशोधन होणें जरूर आहे. संशोधन करून तिचा अधिकाधिक उपयोग करून अन्न-पानादि भोग्य पदार्थ विशेष प्रकारें प्राप्त करून घेऊन आम्ही आपलें बल, शक्ति, पुष्टपणा व तेज वाढवू व अधिक विस्तृत प्रदेश संपादन करून आनंदानें अधिकाधिक वाढत राहूं.

शुद्धा न आपस्तन्वे क्षरन्तु यो नः सेदुरप्रिये तं नि दध्मः ।
पवित्रेण पृथिवि मोत् पुनामि ॥ ३० ॥

हे ( पृथिवी ) मातृभूमि ! ( शुद्धाः आपः ) शुद्ध निर्मळ जल ( नः तन्वे ) आमच्या शरीरांसाठीं ( क्षरन्तु ) वाहत राहो. ( यः ) जो ( नः सेदुः ) आमचा नाश करण्याचा यत्न करील ( तं ) त्या दुष्टाला आम्ही ( अ-प्रिये ) अप्रियतेंत ( नि-दध्मः ) ठेवूं म्हणजे अप्रियतेंत वागवूं. मीं ( मां ) मला स्वतःला ( पवित्रेण ) पावित्र्यानें ( उत् पुनामि ) उत्तम पवित्र करतों.

आम्हांला नेहमीं शुद्ध जल प्राप्त होत राहो व जलादीनीं आमचीं शरीरें पवित्र होत राहोत. आम्ही शुद्ध, सरळ व श्रेष्ठ अशा आचारविचारांनीं स्वतःला नेहमीं पवित्र बनवूं व जो शत्रु आमचा नाश करण्याचा प्रयत्न करील त्याला आम्ही योग्य ती शिक्षा करूं.

# निरुक्त.

पूर्वीच्या भागामध्यें निरुक्तविषयीं थोडेंसें लिहिलें आहे. आता या भागामध्यें त्याच विषयासंबंधानें अधिक विवेचन करावयाचें आहे. या भागाचें विशेष मननपूर्वक अध्ययन जर पाठक करतील, तर त्यांची प्रगति वेदाचा अर्थ पाहण्याच्या कामामध्यें विशेष होईल.

औंध ( जि० सातारा )
मार्गशीर्ष शु० १२
शके १८५२

लेखक
श्री० दा० सातवळेकर

मुद्रक तथा प्रकाशक—श्रीपाद दामोदर सातवळेकर, स्वाध्याय मंडळ,
भारत मुद्रणालय, औंध, ( जि० सातारा )



# संस्कृत--स्वयं--शिक्षक

भाग बाविसावा.

## पाठ १

## देवतालक्षण.

ज्या मंत्रांत ज्या देवतेचें वर्णन प्रामुख्यानें असतें ती त्या मंत्राची देवता असते. बहुधा मंत्रामध्यें त्या देवतेचें नांव असतेंच; परंतु कित्येक मंत्रांत नसतें ही. प्रायः सूक्ताच्या कांहीं कांहीं मंत्रांत देवतेचें नांव बहुतकरून असतें. जसें—

अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् ।
होतारं रत्नधातमम् ॥ ऋ० । १। १ ।१

"पुरोहित, यज्ञाचा देव.ऋत्विज होता व रत्न धारण करणारा असा अग्नि इयाची मी स्तुति करितों." या मंत्रांत अग्नीची प्रशंसा असल्यानें या मंत्राची देवता अग्नि होय. हा ऋग्वेदांतील पहिल्या सूक्ताचा पहिला मंत्र आहे. या सूक्तांत नऊ मंत्र आहेत. त्यांतील आठव्या मंत्रांत तेवढें अग्नीचें नांव नसून बाकीच्या सर्व मंत्रांत अग्नीचें नांव आहे. पूर्वीच्या सात मंत्रांवरून आठव्या मंत्रांतही अग्नीचेंच वर्णन आहे असें त्या मंत्रांत प्रत्यक्ष अग्नी शब्द नसूनही अनुमान काढतां येतें.इतर मंत्रांत अग्नि शब्द असल्यानें शंकेचें कारणच उरत नाहीं.

अग्नि या पदाचा अर्थ आग. उष्णतेनें युक्त पदार्थ, विद्वान, ज्ञानी, जीवात्मा. परमात्मा इत्यादि पुष्कळ होऊं शकतात; त्यामुळें

# निरुक्त.

पूर्वीच्या भागामध्यें निरुक्तिविषयीं थोडेंसें लिहिलें आहे. आतां या भागामध्यें त्याच विषयासंबंधानें अधिक विवेचन करावयाचें आहे. या भागाचें विशेष मननपूर्वक अध्ययन जर पाठक करतील, तर त्यांची प्रगति वेदाचा अर्थ पाहण्याच्या कामामध्यें विशेष होइल.

औंध ( जि० सातारा )
मार्गशीर्ष शु० १२
शके १८५२

लेखक
श्री० दा० सातवळेकर

मुद्रक तथा प्रकाशक—श्रीपाद दामोदर सातवळेकर, स्वाध्याय मंडल,
भारत मुद्रणालय, औंध, ( जि० सातारा )



# संस्कृत--स्वयं--शिक्षक.

भाग चाविसावा.



## पाठ १

## देवतालक्षण.

ज्या मंत्रांत ज्या देवतेचें वर्णन प्रामुख्यानें असतें ती त्या मंत्राची देवता असते. बहुधा मंत्रामध्यें त्या देवतेचें नांव असतेंच; परंतु कित्येक मंत्रांत असतें ही. प्रायः सूक्ताच्या कांहीं कांहीं मंत्रांत देवतेचें नांव बहुतकरून असतें. जसें—

> अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् ।
> होतारं रत्नधातमम् ॥ ऋ० १।१।१।१

"पुरोहित, यज्ञाचा देव.ऋत्विज होता व रत्न धारण करणारा असा अग्नि त्याची मी स्तुति करितो." या मंत्रांत अग्नीची प्रशंसा असल्यानें या मंत्राची देवता अग्नि होय. हा ऋग्वेदांतील पहिल्या सूक्ताचा पहिला मंत्र आहे. या सूक्तांत नऊ मंत्र आहेत. त्यांतील आठव्या मंत्रांत तेवढें अग्नीचें नांव नसून बाकीच्या सर्व मंत्रांत अग्नीचें नांव आहे. पूर्वीच्या सात मंत्रांवरून आठव्या मंत्रांतही अग्नीचेंच वर्णन आहे असें त्या मंत्रांत प्रत्यक्ष अग्नि शब्द नसूनही अनुमान काढतां येतें.इतर मंत्रांत अग्नि शब्द असल्यानें शंकेचें कारणच उरत नाहीं.

अग्नि या पदाचा अर्थ आग, उष्णतेनें युक्त पदार्थ, विद्वान, ज्ञानी, जीवात्मा, परमात्मा इत्यादि पुष्कळ होऊं शकतात; त्यामुळें

वरील मंत्राचे अनेक अर्थ होण्याचा संभव आहे. तथापि अर्थ किती ही असले तरी देवता अग्निच होय हें निर्विवाद आहे अर्थात् देवतावाचक शब्द वेदांच्या सूक्तात असतातच व बहुतेक मंत्रातही येतात परंतु प्रत्येक मंत्रात अवश्य येतातच असें मात्र नाहीं वेदांच्या सूक्तात कोठेंही सांगित केला नाहीं असा देवतावाचक शब्दच नाहीं

## मंत्रांचे भेद.

परोक्षकृत, प्रत्यक्षकृत आणि आध्यात्मिक असे वेदमंत्राचे तीन विभाग आहेत त्यांचीं लक्षणें व उदाहरणें खालीं दिलीं आहेत–

सातही विभक्तींमध्यें चालणारा देवतावाचक शब्द ज्या मंत्रात असतो त्याला (१) परोक्षकृत मंत्र म्हणतात जसें–"इन्द्र ईशे पृथिव्या" (ऋ० १० । ८९ । १०) इंद्र पृथ्वीचा स्वामी आहे

"इन्द्रं वाणीरनूषत." (ऋ० १ । ७ । १) वाणीनें बोलणाऱ्या–नों! इंद्राची प्रशंसा करा

"इन्द्राय साम गायत" (ऋ० ८।९८।१) इंद्रासाठीं सामगायन करा याप्रमाणें सर्व विभक्तींचा उपयोग करून त्याच्या द्वारें ज्या मंत्रात वर्णन केलें जातें ते मंत्र परोक्षकृत मंत्र होत

२ प्रत्यक्षकृत मंत्र – "त्व" असा शब्दप्रयोग करून देवताचें वर्णन ज्या मंत्रात केलेलें असतें ते प्रत्यक्षकृत मंत्र होत जसें— "

"त्वमिन्द्र बलादधि" (ऋ० १० । १५३ । २) हे इन्द्रा, तूं बलानें श्रेष्ठ झाला आहेस

"त्वं वृषन्वृषेदसि" (ऋ० १० । १५३ । २) हे वृष्टिकर्त्या, तू वास्तविक वर्षाव करणारा आहेस.

३ आध्यात्मिक मंत्र– "मी" असा शब्दप्रयोग ज्या मंत्रांच्या वर्णनात असतो ते आध्यात्मिक मंत्र होत जसें–"अहं भुवं वसुनः पूर्व्य" (ऋ० १० । ४८ । १) मी वसूच्या पूर्वी झालों आहे

वेदांमध्यें परोक्षकृत व प्रत्यक्षकृत मंत्र अधिक आहेत व आध्यात्मिक मंत्र थोडे आहेत परोक्षकृत मंत्र कोणते, प्रत्यक्षकृत मंत्र कोणते व आध्यात्मिक मंत्र कोणते हें वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षात आलें असेलच.

( १ ) वेदामध्यें कांहीं मंत्र स्तुति करणारे आहेत. जसें—

इन्द्रस्य नु वीर्याणि प्रवोचम् । ऋ० १।३२।१

"इन्द्राच्या पराक्रमाचें वर्णन मी करीत आहें "अशा मंत्रात इन्द्राच्या पराक्रमाचें वर्णन असल्यानें ही इन्द्राची स्तुति, प्रशंसा अथवा गुणवर्णन आहे ही गोष्ट स्पष्टपणें सिद्ध आहे या प्रकारच्या वर्णनाचे मंत्र स्तुतिपर आहेत असें समजावें

( २ )कांहीं मंत्र वेदामध्यें आशीर्वादपर अथवा प्रार्थनापर आहेत. अशा मंत्रात स्वतःच्या कल्याणाची इच्छा प्रदर्शित केलेली असते असे मंत्र अनेक असून ते प्रसिद्धही आहेत

( ३ ) कांहीं मंत्रात शपथ व कांहीं मंत्रात शापही आहेत, जसें-

"अद्यामुरीय यदि यातुधान ।" ( ऋ० ७।१०४।१५)

" जर मी राक्षस बनणार असेन तर आजच प्राणत्याग करीन " या मंत्राचें तात्पर्य देखील असत्य धर्म सोडून सत्य धर्माचें पालन करावें असेंच आहे असे मंत्र फारच थोडे आहेत.

( ४ ) कांहीं मंत्रात " भाव" अर्थात् सृष्टीची उत्पत्ति इत्यादींचींही वर्णनें आहेत. जसें—

तम आसीत्तमसा गूळ्हमग्रे ॥ ऋ० १०।१२९।३

"सृष्टीच्या प्रारंभीं गाढ अंधार होता. "अशा तऱ्हेच्या मंत्रांचे उद्देश सृष्टीसंबंधीं आरंभींच्या अवस्थेचें वर्णन करण्याचे असतात

( ५ ) कांहीं मंत्रांत विलापाच्या भावना दिसून येतात जसें—

"न विजानामि यदिवेदमस्मि । ऋ० १।१६४।३७

(यत् इव इद अस्मि )"मी असा आहे हें मला समजत नाहीं. " अर्थात् माझ्या अवस्थेचा मला पत्ता नाहीं आध्यात्मिक उन्नति करून घेण्या-

ची इच्छा करणारा मनुष्य कधीं कधीं स्वतःसंबंधीं शंकित बनतो व आपली पूर्ण उन्नति झाली नाहीं, असें दिसून आलें कीं तो शोक देखील करूं लागतो अशा भावाचा सूचक हा मंत्र आहे. परंतु असे मंत्रही फारच थोडे आहेत.

( ६ ) कांहीं कांहीं मंत्रांत निंदा व प्रशंसा ही आढळून येते. जसें—

" नार्यमणं पुष्यति नो सखायं।
केवलाघो भवति केवलादी ॥ ऋ० १०।११७।६

"जो उत्तम मनाच्या माणसाचें अथवा मित्रांचें पोषण करीत नाहीं परंतु ( केवलादी ) फक्त स्वतःच खातो तो (केवलाघः) केवळ पापरूपी बनतो." हा मंत्र स्वार्थी मनुष्याची निंदा करणारा आहे; व ही निंदा देखील परोपकारी मनुष्याची स्तुति दर्शविण्यासाठींच आहे.

या प्रकारें मंत्रांचे विभाग समजून घेण्याचा वाचकांनीं प्रयत्न करावा; म्हणजे त्यांच्या मननानें त्यांना अतिशय लाभ होतील. आतां देवता जाणण्याचीं लक्षणें थोडीशीं स्पष्ट करून खालीं दिलीं आहेत.

( १ ) जेथें यज्ञाचें अथवा यज्ञांगांचें वर्णन असेल तेथें त्या मंत्राची देवता यज्ञ अथवा यज्ञांग समजावी.

( २ ) परंतु जेथें यज्ञवर्णन नसेल अशा ठिकाणीं प्रजापति, अर्थात् परमेश्वर ही देवता सामान्यें करून समजावी.

वरीलप्रमाणें मत याज्ञिकांचें आहे. परंतु हे मंत्र "नाराशंस" म्हणजे मनुष्याचें अथवा मानवी कर्तव्याचें वर्णन करणारे असतात असें निरुक्तकारांचें मत आहे.

वेदांमध्यें एकच परमात्म्याचें वर्णन अग्नि आदिकरून अनेक नांवानीं आढळतें, म्हणून अग्नि, अग्न इत्यादि परस्पर भिन्न शब्द मंत्रांत आले असल्यास बिचकण्याचें अथवा शंकेचें मुळींच कारण नाहीं. भिन्न भिन्न शब्दांनीं एकाच प्रभूचें वर्णन केलें आहे एवढी खूणगांठ मनाशीं असली कीं झालें.

वेदांतील मंत्र परमात्म्याचें वर्णन करीत असतांही निरनिराळ्या मानवी कर्तव्यांचा उपदेश करतात. उदाहरणार्थ इंद्राचा मंत्र परमात्म्याचें वर्णन करीत असतांही त्याच वेळीं राजाचीं कर्तव्यें कोणतीं हेंही दर्शवितो. याच प्रकारें निरनिराळ्या देवतांच्या मंत्रांसंबंधीं समजावें.

अग्नि, वायु या देवतांच्या नांवांचे अर्थ आग व हवा असे आहेत व हेच अर्थ सकृद्दर्शनीं मनांत उभे राहतात, तथापि वेदपठण करतांना तेच अर्थ ( आग, हवा इ० ) घ्यावयास पाहिजेत असें नाहीं. कारण वेदमंत्रांमध्यें अग्नीचा अग्नि, वायुचा वायु व प्राणांचा प्राण असा जो परमात्मा त्याचें वर्णन करीत असतां त्याच शब्दांनीं इतर देवांचीं वर्णनेंही केलीं आहेत; ही गोष्ट लक्षांत ठेवल्यास वाचकांच्या मनांत कोणत्याही प्रकारची शंकाकुशंका उत्पन्न होणार नाहीं व मंत्रांचे अर्थ उत्तम प्रकारें त्यांच्या ध्यानांत येतील.



## पाठ २ रा.

मा नः पश्चान्मा पुरस्तान्नुदिष्ठा मोत्तरादधरादुत ।
स्वस्ति भूमे नो भव मा विदन् परिपन्थिनो वरीयो
यावया वधम् ॥ ३२ ॥ ( अथर्व० १२।१ )

हे ( भूमे ) मातृभूमि ! ( नः ) आम्हां सर्वांना ( मा पश्चात् ) न पाठीमागून ( मा पुरस्तात् ) न पुढून; ( मा उत्तरात् ) न वरून (उत) आणि ( अधरात् ) खालूनही ( मा नुदिष्ठाः ) हटवू नको. ( नः ) आम्हां प्रत ( स्वस्ति भव ) कल्याण करणारी हो. ( परिपन्थिनः ) वाटमारे चोर अथवा दुष्ट ( मा विदन् ) आम्हांला न जाणोत, न भेटोत आणि ( वधं ) मृत्यूला आम्हांपासून ( वरीयः ) बहुत दूर (यावय) हटवून टाक.

आम्हांला कोणत्याही ठिकाणांहून प्रतिबंध न होवो, सर्व दिशांनीं आमचीं प्रगति होऊन आमचें सामर्थ्य वाढो. कोणीही दुष्ट शत्रु आम्हांवर हल्ला न करो व कोणीही दुष्टाकडून आमचा वध न होवो व सर्व प्रकारें आमचें कल्याण होवो.

यावत्तेऽभि विपश्यामि भूमे सूर्येण मेदिना ।
तावन्मे चक्षुर्मा मेष्टोत्तरामुत्तरां समाम् ॥ ३३ ॥

हे ( भूमे ) मातृभूमि! ( यावत् ) जोंपर्यंत ( मेदिना सूर्येण ) आनंद-दायी सूर्यप्रकाशानें ( ते ) तुझा विस्तार ( अभि वि पश्यामि ) सर्व बाजूंनीं विशेष प्रकारें पाहूं शकतों ( तावत् ) तोंपर्यंत ( उत्तरां उत्तरां समां ) उत्तर उत्तर आयुष्यांत ( मे चक्षुः ) माझीं नेत्रादि इंद्रियें ( मा मेष्ट ) क्षीण न होवोत.

सूर्यप्रकाशाच्या योगानें मातृभूमीचा विस्तार निरीक्षण करीत मी दीर्घायुषी बनावें व आरोग्यसंपन्न होऊन अंतकाळपर्यंत माझ्या संपूर्ण शक्ति क्षीण न व्हाव्यात अर्थात् त्या वाढत जाव्यात.

ग्रीष्मस्ते भूमे वर्षाणि शरद्धेमन्तः शिशिरो वसन्तः ।
ऋतवस्ते विहिता हायनीरहोरात्रे पृथिवि नो दुहाताम् ॥ ३६ ॥

हे ( पृथिवि भूमे ) विस्तृत मातृभूमि ! ( ते ग्रीष्मः ) तुझा ग्रीष्म, ( वर्षाणि ) वर्षा तसेंच शरद, हेमन्त, शिशिर व वसन्त हे ( ऋतवः ) ऋतु, ( ते हायनीः ) वर्षासंबंधी इतर समय, तसेंच ( अहोरात्रे ) दिवस व रात्र अर्थात् सर्व काळ (नः) आम्हांसाठीं (दुहतां) पूर्णता अर्पण करोत.

आपल्या मातृभूमींत संपूर्ण ऋतूंत, तसेंच महिन्यांत व दिवसांत आम्हांला पूर्णता प्राप्त होवो.

यस्यां सदो हविर्धाने यूपो यस्यां निमीयते ।
ब्रह्माणो यस्यामर्चन्त्यृग्भिः साम्ना यजुर्विदः ।
युज्यन्ते यस्यामृत्विजः सोममिन्द्राय पातवे ॥ ३८ ॥

( यस्यां ) ज्या भूमींत ( सदो-हविर्धाने ) सभा व अन्नाचें स्थान आहे, ( यस्यां ) ज्या भूमींत ( यूपः ) यज्ञस्तंभ ( निमीयते ) उभा केला जातो, ( ब्रह्माण: ) ज्ञानी लोक जेथें ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेदाच्या मंत्रांनीं ( अर्चन्ति ) ईश्वराची उपासना करितात व ( यस्यां ) ज्या भूमींत ( ऋत्विजः ) ऋतूंना अनुसरून यज्ञ करणारे लोक ( इन्द्राय पातवे )

इंद्राला प्यावयास देण्यासाठीं ( सोमं ) सोमरसाचा (सुज्यन्ते) उपयोग करतात.

आमच्या मातृभूमींत परिषदा, सत्र तशींच अध्वार्वी स्थानें अतिशय आहेत. तेथें यज्ञस्तंभ उभारले जातात; ऋग्वेद यजुर्वेद, व सामवेदाच्या मंत्रांनीं ईश्वराची उपासना केली जाते व यज्ञांत सोमरसाचें पान केलें जातें.

यस्यां पूर्वे भूतकृत ऋषयो गा उदानृचुः ।
सप्त सत्रेण वेधसो यज्ञेन तपसा सह ॥ ३९ ॥

(यस्यां ) ज्या भूमीत ( पूर्वे ) पूर्व ( वेधसः ) ज्ञानी, (भूतकृतः सप्त ऋषयः ) भूतकाल घडवणारे सप्त ऋषि ( सत्-त्रेण ) सज्जनांचें पालन करण्याचें ( यज्ञेन ) सत्कर्म व ( तपसा ) तपाच्या (सह) सह ( गाः ) गाय, वाणी व भूमि यांचें (उत्—आनृचुः) उत्तम प्रकारें सत्कार करण्याचें कार्य करीत आले आहेत.

आमच्या मातृभूमींतील संपूर्ण ज्ञानी लोक प्रजापालक शुभ कर्में करीत व आपल्या अनुष्ठानानें गाय, वाणी व भूमि यांचा सत्कार करीत आले आहेत.

सा नो भूमिरादिशतु यद्धनं कामयामहे ।
भगो अनु प्रयुङ्क्तामिन्द्र एतु पुरोगवः॥ ४० ॥

( सा ) ती ( नः भूमिः ) आमची मातृभूमि, ( यत् धनं ) जें धन ( कामयामहे ) आम्ही इच्छितों, तें ( आदिशतु ) आम्हांला देवो. (भग.) धनवान, ( अनु ) मागून ( प्रयुङ्क्ताम् ) चालो व (इन्द्रः) प्रमुख वीर ( पुरोगवः ) अग्रेसर होऊन ( एतु ) चालो.

वर वर्णन केल्याप्रमाणें असलेली आमची मातृभूमि आम्हांला सर्व प्रकारचें धन देवो. वीरलोक सर्वांच्या आघाडीस चालोत व धनवान लोक त्यांच्या मागून चालोत.

यस्यां गायन्ति नृत्यन्ति भूम्यां मर्त्या व्यैलबाः ।
युध्यन्ते यस्यामाक्रन्दो यस्यां वदति दुन्दुभिः ।
सा नो भूमिः प्रणुदतां सपत्नानसपत्नं मा पृथिवी कृणोतु॥४१॥

( यस्यां ) ज्या ( भूम्यां ) मातृभूमींत ( वि-ऐलबाः ) विशेष चैतन्य उत्पन्न करणारे वीर ( मर्त्याः ) पुरुष ( गायन्ति ) गात असतात व ( नृत्यन्ति ) नृत्य करीत असतात, ( यस्यां ) ज्या देशांत ( आक्रन्दः ) वीर पुरुष ( युध्यन्ते ) युद्ध करीत असतात व जेथें ( दुंदुभिः ) नगारे, ढोल इत्यादि ( वदति ) वाद्यें वाजत असतात. ( सा पृथिवी भूमिः ) ती आमची विस्तृत मातृभूमी ( नः ) आमच्या ( सपत्नान् ) शत्रूंना ( प्रणुदतां ) हटवो व ( मा ) मला ( अ-सपत्नं ) शत्रुरहित ( कृणोतु ) करो.

ज्या मातृभूमींत आम्ही सर्व लोक आनंदानें गात व नाचत असतों, जिच्या स्वातंत्र्यार्थ आम्ही युद्ध करतों व रणवाद्यें वाजवितों ती आमची मातृभूमी आम्हां शत्रुरहित करावी व सर्व शत्रूंना दूर पिटाळून लावावें.

यस्यामन्नं व्रीहियवौ यस्या इमाः पञ्च कृष्टयः ।
भूम्यै पर्जन्यपत्न्यै नमोऽस्तु वर्षमेदसे ॥४२॥

( यस्यां ) ज्या भूमींत ( अन्नं ) अन्न, ( व्रीहियवौ ) तांदूळ व जव उत्पन्न होतें, जिच्यावर ( इमाः ) हे ( पांच प्रकारचे लोक राहतात, त्या ( वर्ष-मेदसे ) वर्षाकालाशीं संबंध असणाऱ्या ( पर्जन्य-पत्न्य ) पर्जन्यानें पालन होणाऱ्या ( भूम्यै ) भूमीला ( नमः अस्तु ) नमन असो.

ज्या मातृभूमींत तांदूळ जव इत्यादि नानाप्रकारचीं धान्यें विपुल उत्पन्न होतात, पर्जन्यवृष्टीनें जेथील शेती उत्तम प्रकारची होते व जेथें ज्ञाते, शूर व्यापारी, कारागीर व अशिक्षित लोक आनंदानें एकत्र राहतात त्या मातृ-भूमीला मी वंदन करतों.

यस्याः पुरो देवकृताः क्षेत्रे यस्या विकुर्वते ।
प्रजापतिः पृथिवीं विश्वगर्भामाशामाशां रण्यां नः कृणोतु॥४३॥

( यस्याः ) जिच्यांतील ( पुरः ) शहरें ( देवकृताः ) देवांनीं वसवि-लेलीं आहेत, ( यस्याः ) जिच्यावरील ( क्षेत्रे ) देशांत मनुष्यें ( विकुर्वते )

विविध प्रकारचीं कार्यें करतात, त्या ( विश्वगर्भा ) सर्वांना गर्भांत धारण करणाऱ्या ( पृथिवीं ) भूमीला ( प्रजापति ) प्रजापालक (आशा आशा) सर्व दिशाना (न ) आम्हांकरिता (रण्या) रमणीय (कृणोतु) करो.

आमच्या मातृभूमींतील सर्व नगरें देवांनीं वसविलेलीं आहेत ज्या भूमींत सर्व प्रकारचे लोक नाना प्रकारचे उद्योग करून आपली उन्नति करून घेतात त्या भूमीला प्रजापालक प्रभु सर्व दिशांना अत्यंत रमणीय बनवो

क्षात्रय वीर

ये शुभ्रा घोरवर्पसः सुक्षत्रासो रिशादसः ।
मरुद्भिरग्न आ गहि ॥

ऋ० १।१९।५

( ये ) जे ( शुभ्रा ) गौरवर्णी ( घोरवर्पस ) धिप्पाड शरीराचे, ( सुक्षत्रास ) उत्तम क्षत्रिय ( रिश+अदस ) शत्रूचा संहार करणारे असतात, त्या (मरु-द्भिः ) मरण्यास तयार असणाऱ्या वीरासह (अग्ने) हे तेजस्वी वीरा, (आ गहि) येथें ये

आपल्या राष्ट्रांत असे तेजस्वी वीर निर्माण होणें जरूर आहे कीं ते धिप्पाड शरीराचे,कांतिमान व शत्रूचा संहार करणारे उत्तम क्षत्रिय असावेत प्रत्येकाच्या मत करणांत अशा तऱ्हेची इच्छा सतत असली पाहिजे

---

# पाठ ३ रा.

## देवता-विभाग

पृथ्वी, अंतरिक्ष व आकाश अशा तीन स्थानीं वैदिक देवतांचा विभाग केलेला आहे. पृथ्वीवरील देवतांत अग्नि देवता प्रमुख, अंतरिक्षांत वायु देवता किंवा इंद्र देवता प्रमुख व आकाशांत आदित्य देवता प्रमुख आहे. यांचे अनुगामी अनेक अन्य देव आहेत.

वास्तविक पाहतां परमात्मा एकच आहे; व सर्व देवतांच्या द्वारें त्याचेंच वर्णन होतें; तथापि त्या परमात्म्याची शक्ति अग्नि, इन्द्र, सूर्य इत्यादि देवतांमध्ये विभागली गेली असल्यानें दोघांचें हीं वर्णन वेदांमध्यें पुनरुक्तिच्या दृष्टीनें करून केलेलें असतें हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे.

पृथ्वीवर अग्नीच्या बरोबरच मनुष्य, पशु, वनस्पति इत्यादि अनेक देव आहेत. अंतरिक्षांत वायु, इन्द्र, विद्युत, मेघ इत्यादि देव आहेत व द्युलोकीं सूर्य, नक्षत्रें, इत्यादि देव आहेत. त्यांची वंशावळ खालीं दिल्याप्रमाणें—




अशा प्रकारें देवतांचें वर्गीकरण केलें गेलें आहे व याचें महत्त्व फार आहे म्हणून वाचकांनीं हें विशेष लक्ष्यांत ठेवावें. या त्रिलोकींत सर्व देवांचा समावेश झाला आहे.

कांहींचें मत असें आहे कीं सर्व देवता मनुष्याप्रमाणें देहधारी व सचेतन आहेत या मताच्या पुष्ट्यर्थ ते असें प्रमाण पुढें मांडतात कीं, वेदमंत्रांत देवतांच्या अवयवांचें व परस्पर संबंधांचें वर्णन केलेलें आढळतें, उदाहरणार्थ एका देवतेनें दुसरीच्या बरोबर येणें, तसेंच इंद्राचें वृत्राच्या बरोबर युद्ध होणें वगैरे वर्णनांवरून देवता देहधारी व सचेतन आहेत असें ते म्हणतात

दुसऱ्या पक्षाचें ह्मणणें असें आहे कीं देवता ह्या मनुष्यांप्रमाणें देहधारी नाहींत कारण वेदांत नेहमीं सचेतन पदार्थांचीच स्तुति असते असें नसून अचेतन पदार्थांचीही-उखळ मुसळ, रथ, इत्यादि अचेतन पदार्थांची ही-स्तुति आढळते तेव्हां देवतांच्या अवयवांचें किंवा शरीराचें वर्णन आहे एवढ्याच प्रमाणावरून त्यांना सचेतन ह्मणणें योग्य नव्हे कारण रथाच्या निरनिराळ्या भागांचें वर्णन वेदामध्यें आहे व रथ ही तर अचेतन वस्तु आहे, ह्मणून अशा वर्णनांवरून देवांना देहधारी व सचेतन ठरविता येत नाहीं

तिसऱ्या पक्षाचें ह्मणणें असें आहे कीं देव देहधारी व देहरहित, तसेंच सचेतन व अचेतन असे दोन्ही प्रकारचे आहेत

वास्तविक पाहतां संपूर्ण देवता सचेतनही नाहींत व अचेतन ही नाहींत, कांहीं सचेतन आहेत व कांहीं अचेतन ही आहेत ह्मणून जेथें ज्या प्रकारचें वर्णन असेल त्या वर्णनानुरोधानें देवता सचेतन कीं अचेतन ठरविणें हेंच योग्य होय एकच नियम सर्वत्र सारखा लागू पडत नसतो कारण कित्येक वेळीं एकाच मंत्रांत देहधारी सचेतन देवता व देहरहित देवता या दोहोंचेंही वर्णन येऊं शकतें

इतकें सर्वसामान्य विवेचन झाल्यावर आतां देवतांची निरुक्ति अथवा व्युत्पत्तिकडे वळूं

## अग्निः ।

१ अग्र+नी=अग्+नी=अग्नि ( अग्रगामी )
२ अंग+नी=अग+नी= अग्नि ( आपल्या अंगाच्या सारखा बनविणारा )

३ अ+क्नोप=अ+क्नु=अ+ग्नु=अग्नि ( जो स्निग्धता कमी करतो )

४ अयन+दग्ध+नी=अ+ग्+नी=अग्नि ( गति करणारा, दहन करणारा व नेणारा )

वरील चार व्युत्पत्तींच्या अर्थांत असलेला भेद वाचक लक्षपूर्वक पाहतील तर तो भेद व त्याचें स्वरूप वाचकांच्या लक्ष्यांत लेचांच येईल. प्रत्येक व्युत्पत्तींत पूर्वपद भिन्न असून पूर्वपदाचा कांहीं भाग अवशिष्ट राहिलेला आहे व शेष भाग लुप्त झाला आहे वेदांतील शब्दाची निरुक्ति व व्युत्पत्ति कशा प्रकारें असते हें वाचकांनीं येथें लक्ष्यपूर्वक पहावें

## देवः ।

१ दा ( देणें ) =दाता=देता=देव [ दाता ]

२ दीप ( प्रकाशक )=देप=देव=देव [ प्रकाशक ]

३ द्युत् ( चमक ) =दि+उत्=दिव्=देव

याप्रमाणें देव शब्दाच्या तीन व्युत्पत्त्या आहेत, परंतु यांशिवाय आणखी ही खालील प्रमाणें व्युत्पत्त्या आहेत

४ दिव् ( चमकणें ) = दिव्=देव ( चमकणारा इ० )

५ वेद=वे×द( दे×व ) =देव(ज्ञानी )

याप्रमाणें ही व्युत्पत्त्या होऊं शकतात, जरी आतांपर्यंत अशा प्रकारची व्युत्पत्ति कोणी केलेली नाहीं तथापि अशी व्युत्पत्ति होणें शक्य आहे अशासंबंधीं नियम पूर्वीच्या पुस्तकांत सांगितले आहेतच भाषाक्षरें व अर्थाक्षरें हीं केव्हां केव्हां उलट सुलट होतात हा नियम वाचकांना वरील पांचव्या उदाहरणावरून येथें दिसून येईल

## जातवेदाः

१ जात+वेद=उत्पन्न झालेल्या पदार्थांना जो जाणतो

२ जातानि विद =बनलेल्या अथवा उत्पन्न झालेल्यांना जाणतो.

३ जात+विद्यते=बनलेल्या अथवा उत्पन्न झालेल्या पदार्थांत राहतो.

४ जात+वित्त= ज्याच्याजवळ धन आहे अथवा ज्यापासून धन झालें आहे.

५ जात+विदः= ( जात+वेदः )=ज्यापासून वेद अथवा ज्ञान उत्पन्न झालें आहे.

## वैश्वानरः

१ विश्व+नरः=विश्वाचा नर अर्थात् नेता, विश्वाचा चालक.

२ विश्वे नरा यम् नयन्ति=सर्व मनुष्यें योला प्राप्त होत असतात.

३ विश्व+न+रः=विश्वांत न रमणारा अर्थात् ज्याचा आनंद भौतिक स्वरूपाचा नाहीं.

याप्रकारें विश्वानर अथवा वैश्वानर या शब्दाच्या व्युत्पत्तीचे अर्थ आहेत. वैश्वानर अग्नि ,यतेच्या मंत्राचें देवता आहे, अर्थात् मनुष्यानें अग्नि असा-ही या शब्दाचा अर्थ आहे. परंतु संदर्भानुसार याचे भिन्नभिन्न अर्थही होऊं शकतात.

## तनूनपात्

१ तनू+न+पात् =शरीराचा पात न करणारा अर्थात् शरीराचें पतन न होऊं देणारा (आत्मा)

२ तनू+नपात् = ( तनू ) गाईचा नातू, अर्थात् गाईचा मुलगा दूध, दुधाचा मुलगा तूप, याप्रमाणें गाईचा नातू तूप होतो.

३ तनू+उन+पात् =शरीरांत जें न्यूनत्व असेल त्या न्यूनत्वास दूर करणारा आत्मा.

तनूनपात् देवता वेदांमध्यें अनेक वेळां येते. वरील विवेचनावरून त्या देवतेची वाचकांना कल्पना होईलच, तरी वाचकांनीं ती चांगल्या प्रकारें लक्षांत ठेवावी.

कल्याणपूर्ण स्थितींत ( दधातु ) योग्य रीतिनें ठेवो.

ज्या मातृभूमींत दिवस व रात्र योग्य प्रमाणांत आहेत, जेथें उत्तम वृष्टि होऊन उत्तम फळें फुलें उत्पन्न होतात ती भूमी प्रत्येक ठिकाणीं आम्हांस कल्याणप्रद होवो.

अहमस्मि सहमान उत्तरो नाम भूम्याम् ।
अभीषाडस्मि विश्वाषाडाशामाशां विषासहिः ॥ ५४ ॥

( भूम्यां ) मातृभूमीवर ( अहं ) मी ( सहमानः ) सहनशक्तीनें युक्त व ( नाम ) यशानें (उत्-तरः) अधिक श्रेष्ठ (अस्मि ) आहें. मी (अभीः षाड्) विजयी, ( विश्वा-षाट् ) विश्वजेता सर्वत्र ( दिशां दिशां ) प्रत्येक दिशेला ( वि-षासहिः ) शत्रूंचा पराजय करणारा ( अस्मि) आहें.

माझ्या मातृभूमींत मी श्रेष्ठ आहें व हरएक प्रकारचा विजय संपादन करण्याची शक्ति मजमध्यें आहे. अर्थात् मातृभूमीच्या प्रत्येक भक्तानें आपली उन्नति इतकी करावी कीं त्याचा सर्वत्र विजय व्हावा व त्याच्यामुळें मातृभूमिचें नांव सर्व दिशांमध्यें पसरावें.

अदो यद् देवि प्रथमाना पुरस्ताद्देवैरुक्ता व्यसर्पो महित्वम्॥
आ त्वा सुभूतमविशत् तदानीमकल्पयथाः प्रदिशश्चतस्रः॥५५॥

हे ( देवि ) भूदेवी! ( यत् पुरस्तात् ) जेव्हां पुढारी ( देवैः ) देवांनीं तुला ( प्रथमाना उक्ता ) विशाल मानून तुझें वर्णन केलें. आणि ( अदो-महित्वं ) हा तुझा मोठेपणा सर्व दिशांना (व्यसर्पः) प्रसृत केला (तदानीं तेव्हां ( सु-भूतं ) उत्तम ऐश्वर्य ( त्वा ) तुला ( आविशत् ) प्राप्त झालें आणि तू ( चतस्रः प्रदिशः ) चारी दिशांना (अकल्पयथाः) समर्थ केलेंस.

ज्ञानी लोकांनीं मातृभूमीचा मोठेपणा समजून घेतला,व त्याचें ज्ञान सर्व जनतेस करून दिलें,त्यायोगें चारी दिशांना राहणारे लोक शक्तिमान झाले या प्रमाणें जे लोक मातृभूमीची भक्ति करतील तेही विलक्षण प्रभावशाली होतील.

ये ग्रामा यदरण्यं याः सभा अधि भूम्याम् ॥
ये संग्रामाः समितयस्तेषु चारु वदेम ते ॥५६॥

( ये ग्रामाः ) जे गांव, ( यत् अरण्यं ) जीं वनें, ( याः सभाः ) ज्या सभा ( भूम्यां अधि ) या भूमीवर आहेत, तसेंच ( ये संग्रामाः ) जीं युद्धें होतात व जीं ( समितयः ) संमेलनें होतात, ( तेषु ) त्या सर्वांमध्ये ( ते ) तुझ्याविषयीं ( चारु ) सुंदर व आदरयुक्त (वदेम) भाषण आम्हीं करूं.

मातृभूमींत गांव, नगर, प्रांत, वनें, अरण्यें, पर्वत इत्यादि जीं स्थानें असतील, तसेंच त्या स्थानीं ज्या सभा, समिति, परिषदा व महासभा, तसेंच संमेलनें अथवा मेळे होतील किंवा युद्धें होतील त्या सर्व ठिकाणीं मातृभूमीसंबंधीं उत्तम आदर व्यक्त करणें हें प्रत्येकास आवश्यक आहे.

यद्वदामि मधुमत्तद्वदामि यदीक्षे तद्वनन्ति मा ॥
त्विषीमानस्मि जूतिमानवान्यान्हन्मि दोधतः ॥५८॥

( यत् वदामि ) जें कांहीं मी भाषण करतों ( तत् ) तें ( मधुमत् वदामि ) मधुरतायुक्त बोलतों-म्हणून ( यत् ) जें ( ईक्षे ) मी पाहतों, ( तत् ) त्याला अनुसरून ( मा वनन्ति ) मजवर सर्व लोक प्रेम करि-तात. मी ( त्विषीमान् ) तेजस्वी व ( जूतिमान् ) वेगवान् ( अस्मि ) आहें व ( दोधतः अन्यान् ) घातक शत्रूंना मी ( अवहन्मि ) सर्व प्रकारें नष्ट करतों.

नेहमीं मधुरभाषी व सर्वांना स्नेहदृष्टीनें पाहणारा असा मी आहे, म्हणून सर्व लोक मजवर प्रेम करतात. मी माझ्या ठिकाणीं ज्ञानाचें तेज व कर्माचा वेग हीं वाढविलीं आहेत, म्हणून मी सज्जनांचें रक्षण व दुर्जनांचा नाश करतों. तात्पर्य हेंच की मधुर भाषण व स्नेहदृष्टि यांनीं सर्वत्र प्रेमाचा फैलाव करणें व संघशक्ति वाढविणें अवश्य आहे. तसेंच आपल्या ठिकाणीं ज्ञानाचें तेज व कर्माचा वेग वाढवून सज्जनांचें रक्षण व दुष्टांचें निर्दाळण करणें हेंही आवश्यक आहे.

---

चरणानें राहणारे सदा संतुष्ट ब्राह्मण प्रसंगीं मेघाप्रमाणें गंभीर वाणीनें भाषण करितात."

हा मंत्र अन्योक्ति अलंकाराचें उत्तम उदाहरण आहे. बेडकांचें वर्णन करीत असतां अन्योक्तिनें त्यांतच ब्राह्मणांचेंही वर्णन केलें आहे.

## रथः

१ रंहति इति रथः=जो चालतो तो रथ होय.

२ स्थिर=स्थि+र=थ×र=रथः-[येथें अक्षरें उलट सुलट होऊन हा शब्द सिद्ध झाला आहे.] जो स्थिरतेच्या विरुद्ध व्यवहार करतो अर्थात् ज्याला गति आहे तो रथ होय.

( ३ ) स्थि×र=स्थित+रममाण=रममाण+स्थित=र×स्थि =रथ रममाण होत असतां ज्यांत स्थिर बसतां येतें त्याचें नांव रथ. येथेंही अक्षरांच्या व्यतिक्रमाचें उदाहरण आहे.

रथ शब्दाच्या वरील व्युत्पत्तीवरून कोणत्या प्रकारें शब्द शेष राहतो अथवा अक्षरांत उलटापालट कशी होऊं शकते, हें वाचकांना वरील व्युत्पत्तीचें चांगलें मनन केल्यास सहज दिसून येईल.

## वृषभः

१ वर्षति इति वृषभः=जो वृष्टि करतो तो वृषभ.वृष्टि ही प्रजेची, बलाची अथवा पराक्रमाचीही असूं शकते. याचें उदाहरण—

न्यक्रन्दयन्नुपयन्त एनममेहयन्वृषभं मध्य आजेः।

ऋ० १०।१०२।५

( आजेः मध्ये उपयन्तः ) युद्धास गेलेले वीर ( एनं वृषभं न्यक्रन्दयन् ) या वृषभास शब्द करण्यास प्रवृत्त करतात.

## पितुः

१ पाति इति पितुः=जें रक्षण करतें तें.

२ पीयते इति पितुः=जें खाल्लें जातें तें.

**( ३ ) प्यायति इति=जें वृद्धि करतें तें—**

हा अन्नवाचक शब्द आहे. अन्न शरीराचें रक्षण करतें. तें खालें जातें व त्यानें शरीर वाढतें. हे तिन्ही अर्थ पितुः शब्दाच्या वरील व्युत्पत्तीवरून दिसून येतात. याचें उदाहरण—

पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम् ।

ऋ० १।१८७।१

"अन्नाची मी प्रशंसा करतो; जें (महः तविषीं धर्माणं) मोठें बल धारण करतें" इत्यादि मंत्रांत पितुः शब्द अन्नवाचक आहे हें लक्ष्यांत ठेवावें.

## वायुः

१ वाति इति वायुः = जो वाहतो तो वायु. याचें उदाहरण—

वायवा याहि दर्शतेमे सोमा अरंकृताः ।
तेषां पाहि श्रुधी हवम् ॥ ऋ० १।२।१

हे ( दर्शत ) दर्शनीय वायो! ( आयाहि ) ये. हा सोम अलंकृत-सिद्ध केलेला आहे. ( तेषां पाहि ) त्याचें पान कर व ( हवं श्रुधि ) आम्ही केलेली प्रशंसा श्रवण कर.

## वरुणः

१ वृणोति इति वरुणः- जो आच्छादित करतो त्यास वरुण म्हणतात. याचें उदाहरणः—

नीचीनवारं वरुणः कवन्धं ।
प्रससर्ज रोदसी अन्तरिक्षम् ।

ऋ० ५।८५।३

'वरुण ( नीचीन वारं ) खालीं द्वार असणाऱ्या ( कवन्धं ) मेघाला द्युलोक व पृथ्वी यांच्या मधील अंतरिक्षांत ( प्र ससर्ज ) उत्पन्न करतो ' 'यांतील शब्दांचे अर्थ पहाः—

हे मातृभूमि! ( त्वं ) तूं ( आपवनी ) अत्यंत सुपीक म्हणून (जनानां) लोकांशी ( काम-दुघाः ) इच्छिलेले पदार्थ देणारी, व (प्रप्रथाना) प्रख्यात ( अदितिः ) देवमाता अथवा माता देवी ( असि ) आहेस. म्हणून (यत् ते ऊनं ) जें तुला न्यून पडेल, ( तत् ते ) तें (ऋतस्य प्रथमजा) सत्याचा पहिला प्रवर्तक अथवा जलाचा प्रेरक, (प्रजा-पतिः ) प्रजा पाळणारा तुला देऊन ( आपूरयाति ) पूर्ण करतो.

पृथ्वी धान्यादिकांची उत्पत्ति करणारी आहे म्हणून ती इच्छित पदार्थ देणारी कामधेनु आहे. जें जें या भूमींत कमी असेल त्याची पूर्तता धान्य पेरून त्याला पाणी घाल इत्यादि देऊन तो करतो. जो अशा प्रकारें अधिकांत अधिक धान्याची उत्पत्ति करतो तो खरा प्रजापालक होय. म्हणून प्रत्येक जलादि गोष्टींची उत्तम व्यवस्था करून भूमीपासून धान्याची अधिकांत अधिक निपज करावी व अशा रीतिनें प्रजापालन करावें हें योग्य होय.

उपस्थास्ते अनमीवा अयक्ष्मा अस्मभ्यं सन्तु पृथिवि प्रसूताः ।
दीर्घं न आयुः प्रतिबुध्यमाना वयं तुभ्यं बलिहृतः स्याम ॥६२॥

हे ( पृथिवि ) मातृभूमि ! ( ते प्रसूता ) तुजपासून उत्पन्न झालेले अत-एव तुजजवळ ( उप-स्थाः ) असणारे सर्व पदार्थ ( अस्मभ्यं ) आम्हां सर्वांना ( अनमीवाः ) आरोग्यकारक व ( अयक्ष्माः ) रोगरहित ( सन्तु ) होवोत ! ( नः ) आमचें ( आयुः ) आयुष्य दीर्घ होवो; व ( वयं ) आम्ही सर्व ( प्रतिबुध्यमाना.) उत्तम ज्ञानी बनून ( तुभ्यं ) तुजसाठीं ( बलिहृतः ) बलि घेऊन येणारे स्याम होऊं.

मातृभूमींत उत्पन्न होणारे सर्व पदार्थ मातृभूमींत राहणाऱ्यांनाच मिळोत, तसेंच ते पदार्थ निरोगीपणा उत्पन्न करणारे, आरोग्य वाढविणारे व पुष्टिदायक तसेंच दीर्घायु देणारे होवोत. याप्रकारें तेथील सर्व लोक पुष्ट, बलवान् व दीर्घायु होऊन आपल्या सर्वस्वाचा बलि आपल्या मातृभूमी-समोर देण्यास तयार होवोत. अशी स्थिति जेथें असेल तोच देश सुखी असें म्हणणें योग्य होय.

भूमे मातर्निधेहि मा भद्रया सुप्रतिष्ठितम् ।
सं विदाना दिवा कवे श्रियां मा धेहि भूत्याम् ॥६३॥

हे ( मातः भूमे ) मातृभूमि ! ( मा ) मला ( भद्रया ) कल्याण-कारक अशा अवस्थेंत ( सु प्रतिष्ठित ) योग्य तऱ्हेनें ( नि धेहि ) ठेव. हे ( कवे ) काव्यमय मातृभूमि ! तू ( दिवा ) प्रकाशानीं ( स विदाना ) सयत्न राहणारी ( मा ) मला ( श्रिय ) संपत्ति व ( भूत्या ) ऐश्वर्य या-मध्यें ( धेहि ) ठेव.

मातृभूमीचे जे भक्त कल्याणाच्या मार्गानें उन्नतिचें साधन करतात ते ज्ञानाच्या प्रकाशानें प्रकाशित होऊन संपत्ति व ऐश्वर्य यानीं परिपूर्ण होतात म्हणून प्रत्येक मनुष्यानें ज्ञानविज्ञानानें युक्त होऊन मातृभूमीची भक्ति करावी व स्वयंसेवक होऊन मातृभूमीची सेवा करावी

दूष्या दूषिरसि हेत्या हेतिरसि मेन्या मेनिरसि ।
आप्नुहि श्रेयासमति समं क्राम ॥१॥ अ० २।११

हे मनुष्या ! तू ( दूष्याः ) दूषित क्रियांचा ( दूषि ) नाश करणारा ( असि ) आहेस ( हेत्या हेति ) शस्त्रांचें शस्त्र तू आहेस ( मेन्या मेनि ) वज्रांचें वज्र तू आहेस म्हणून ( समं ) समानाच्याहून ( अति क्राम ) अधिक वाढ ■ ( श्रेयास आप्नुहि ) कल्याण प्राप्त करून घे

मनुष्य हा दोष दूर करणारा व शत्रूच्या नाशार्थ विविध प्रयत्न करणारा आहे. म्हणून त्यानें आपल्या समान दर्जाच्या लोकाहून आपली उन्नति अधिक करून घेऊन आपलें कल्याण साधावें हेंच त्यास उचित आहे.

या जगात मनुष्यच दोष नाहींसे करून सत्कर्मांचा प्रचार करतो, शस्त्रें निर्माण करून त्यांचा उपयोग करतो, म्हणून समान दर्जाच्या लोकांहून त्यानें अधिक उन्नति प्राप्त करून घेऊन आपलें अधिकाधिक कल्याण साधावें व कधींही दीन अवस्थेंत राहू नये, नेहमीं त्याचा उत्कर्ष होत रहावा हेंच त्यास उचित आहे.

# पाठ ८ वा.

सूरिरसि वर्चोधा असि तनूपानोऽसि ।
आप्नुहि श्रेयासमति समं क्राम ॥ ४ ॥
अ० २।११

हे मनुष्या ! तू ( सूरि असि ) ज्ञानी आहेस, ( वर्चो धा असि ) तू तेजस्वी आहेस, ( तनू-पान असि ) शरीराचा रक्षक आहेस, म्हणून बरोबरीच्या पेक्षा अधिक वाढून कल्याण प्राप्त करून घे

मनुष्य आपलें ज्ञान वाढविण्यास समर्थ आहे, तो तेजस्वीही आहे, तसेंच स्वतःच्या शरीराचें व दुसऱ्याच्या शरीराचें संरक्षण करण्याचें सामर्थ्यही तो आपल्या आंगीं राखू शकतो म्हणून त्यानें ज्ञानी बनावें, तेजस्वी बनावें तसेंच स्वतःचें व दुसऱ्याचें उत्तम तऱ्हेनें संरक्षण करावें, सर्वांहून वरचढ होऊन अत्यंत कल्याण प्राप्त करून घ्यावें. दुसऱ्याचें संरक्षण करण्यासाठीं स्वतःला समर्थ करणें म्हणजेच दुसऱ्याहून वरचढ होणें होय, म्हणून प्रत्येकानें आपल्या ठिकाणच्या प्रत्येक शक्तींची वाढ करावी, व दुसऱ्याच्या संरक्षणार्थ आत्मार्पण करण्यासही तयार असावें. अशा प्रकारें परोपकारार्थ आत्मार्पण करण्यास तयार असणारा मनुष्य हा सर्वांना वन्दनीय होतो

शुक्रोऽसि भ्राजोऽसि स्वरसि ज्योतिरसि ।
आप्नुहि श्रेयासमति समं क्राम ॥५॥ अ० २।११

हे मनुष्या, तू ( शुक्र असि ) वीर्यवान् आहेस, ( भ्राज असि ) तेजस्वी आहेस, ( स्व असि ) आत्मशक्तीनें युक्त आहेस, (ज्योति असि) तू स्वतः तेजरूप आहेस, म्हणून ( सम अतिक्राम) समान अशा मनुष्यांहून वरचढ बनून ( श्रेयास आप्नुहि ) श्रेष्ठ प्रकारचें कल्याण करून घे

मनुष्य वीर्यवान्, शूर, बलवान्, तेजस्वी, उत्साही, आत्मबलानें सपन्न व स्वतः तेजाची ज्योति ही आहे म्हणून त्यानें इतरांहून श्रेष्ठ व्हावें व कल्याण प्राप्त करून घ्यावें, व कधींही मागें राहू नये.

मनुष्याच्या ठिकाणीं इतकी शक्ति आहे कीं त्यानें उन्नतिच्या मार्गानें जावयाचें मनात आणल्यास तो उन्नत होऊं शकतो, म्हणून प्रत्येक मनुष्यानें या मंत्रांतील उपदेशानुसार आपल्या ठिकाणीं असलेल्या शक्तींचें अस्तित्व जाणून स्वतःला उन्नत करून इतरांचा आदर्श बनावें व अवनतावस्थेंत कधींही राहूं नये. मनुष्याच्या उन्नतीचा प्रारंभ प्राणशक्ति वाढण्यानें होतो म्हणून आतां प्राणसूक्ताचा विचार करूं. प्राणसूक्त खालीलप्रमाणें आहे.–

प्राणाय नमो यस्य सर्वमिदं वशे ।
यो भूतः सर्वस्येश्वरो यस्मिन्त्सर्वं प्रतिष्ठितम् ॥
अथर्व० ११।४(६)।१

( प्राणाय नमः ) प्राणाला नमस्कार असो; ( यस्य ) ज्याच्या ( वशे ) आधीन ( इदं सर्वं ) हें सर्व जग आहे, ( यः सर्वस्य ) जो सर्वांचा ( ईश्वरः भूतः ) ईश्वर झाला आहे व ( यस्मिन् ) ज्याच्या ठिकाणीं ( सर्वं प्रतिष्ठितम् ) सर्व राहिलें आहे.

प्राणशक्तीच्या आधीन संपूर्ण जग असून प्राणाच्या आधारावरच तें अधिष्ठित आहे. प्राण सर्वांचा अधिकारी आहे म्हणून त्याची उपासना करावी. ज्याप्रमाणें शरीरांतील प्राणाच्या आधारानें सर्व शरीर, अंग, अवयव अथवा इंद्रियें राहतात, त्याप्रमाणें विश्वांतील संपूर्ण पदार्थ विश्वव्यापी प्राणाच्या आधारावर राहतात.

नमस्ते प्राण क्रन्दाय नमस्ते स्तनयित्नवे ।
नमस्ते प्राण विद्युते नमस्ते प्राण वर्षते ॥२॥
अ० ११।४(६)।२

हे प्राण! ( क्रन्दाय ते नमः ) गर्जना करणाऱ्या तुला नमस्कार असो. ( स्तनयित्नवे ते नमः ) ढगाळाच्या वेळीं नाद करणाऱ्या तुला वंदन असो. ( विद्युते ते नमः ) विद्युल्लतारूपी तुला नमस्कार असो. ( वर्षते ते नमः ) वर्षाव करणाऱ्या तुला नमस्कार असो.

विश्वांत व्याप्त असलेली प्राणशक्ति पावसांत असते तशीच ती जलवृष्टी-च्या वेळीं भूमीवर ही येते, म्हणून प्राणशक्तीचा सत्कारपूर्वक चांगला उपयोग करणें जरूर आहे.

यत् प्राण स्तनयित्नुनाऽभिक्रन्दत्योषधीः ।
प्र वीयन्ते गर्भान् दधतेऽथो बह्वीर्वि जायन्ते ॥३॥
यत् प्राण ऋतावागतेऽभिक्रन्दत्योषधीः ।
सर्वं तदा प्रमोदते यत् किं च भूम्यामधि ॥४॥
अ० ११।४(६)

प्राण जेव्हां ( स्तनयित्नुना ) वादळाच्या गर्जनेच्या द्वारें ( ओषधीः ) औषधींना ( अभि क्रन्दति ) बोलाविती, तेव्हां त्या ( प्रवीयन्ते ) गर्भवती होतात, ( गर्भान् दधते ) गर्भ धारण करतात व ( बह्वी. ) पुष्कळ होऊन ( वि जायन्ते ) उत्पन्न होतात.

( यद् ) जेव्हां प्राण ( ऋतौ आगते ) ऋतुकाळ आला असतां ( ओषधीः ) औषधींना ( अभिक्रन्दति ) बोलाविती, ( तदा ) तेव्हां ( सर्वं प्रमोदते ) सर्व आनंदित होतात, जें कांहीं सर्व ( भूम्यां अधि ) पृथ्वीवर असतें तें.

वृष्टीनें औषधी, वनस्पति व वृक्ष वाढतात व आनंदानें प्रसन्न होतात. अंतरिक्षांतील वायुमध्यें राहणाऱ्या प्राणाचें हें कार्य पाहण्यासारखें आहे.

यदा प्राणो अभ्यवर्षीद्वर्षेण पृथिवीं महीम् ।
पशवस्तत्प्र मोदन्ते महो वै नो भविष्यति ॥५॥
अ० ११।४(६)

जेव्हां प्राण ( वर्षेण ) वृष्टीरूपानें ( महीं पृथिवीं ) या मोठ्या पृथ्वीवर ( अभि अवर्षीत् ) जल सिंचन करतात, ( तत् पशवः ) तेव्हां पशु ( प्रमोदन्ते ) आनंदित होतात, ते सांगतात कीं आतां ( नः ) आमची ( महः ) वाढ ( वै ) निश्चयानें ( भविष्यति ) होईल.

वृष्टीच्या द्वारें जी प्राणशक्ति या पृथ्वीवर येते तिनें पशुपक्ष्यांची देखील वाढ होते व ते आनंदित होतात.

अभिवृष्टा ओषधयः प्राणेन समवादिरन् ।
आयुर्वै नः प्रातीतरः सर्वा नः सुरभीरकः ॥६॥
अ० ११।४(६)

(अभिवृष्टाः ओषधयः ) शिंपडल्या गेलेल्या औषधी (प्राणेन) प्राणाशीं ( समवादिरन् ) बोलत्या झाल्या कीं ( नः ) आमचें ( आयुः ) आयुष्य ( वै ) खात्रीनें तूं ( प्रातीतरः ) वाढविलें आहेस; व (नः सर्वाः) आम्हां सर्वांना ( सुरभीः सुगंधित ( अकः ) केलें आहेस.

वृष्टिद्वारा अन्तरिक्षस्थ प्राण प्राप्त होऊन सर्व औषधी सुगंधयुक्त बनतात व सजीव राहतात.

नमस्ते अस्त्वायते नमो अस्तु परायते ।
नमस्ते प्राण तिष्ठत आसीनायोत ते नमः ॥७॥
नमस्ते प्राण प्राणते नमो अस्त्वपानते ।
पराचीनाय ते नमः प्रतीचीनाय ते नमः
सर्वस्मै ते इदं नमः ॥८॥ अ० ११।४(६)

हे प्राण ! ( आयते ) येणाऱ्या, ( परायते ) जाणाऱ्या, (तिष्ठते) स्थिर असणाऱ्या, ( आसीनाय ) बसणाऱ्या (ते) तुला नमस्कार असो.

हे प्राण ! ( प्राणते ) श्वास घेणाऱ्या, ( अपानते ) अपान सोडणाऱ्या, ( पराचीनाय ) बाहेर जाणाऱ्या, ( प्रतीचीनाय ) जवळ येणाऱ्या ( ते ) तुला ( नमः ) नमस्कार ( अस्तु ) असो.

( सर्वस्मै ते ) सर्वरूपी तुला ( इदं नमः ) हे नमन असो.

( १ ) आयत् ( २ ) तिष्ठत् ( ३ ) परायत् व ( ४ ) आसीन हीं चार नांवे क्रमशः ( १ ) पूरक, ( २ ) कुंभक ( ३ ) रेचक व (४) बाह्य कुंभक यांचीं आहेत. ( १ ) प्राणत् व ( २ ) अपानत् हे दोन शब्द श्वास व उच्छ्वास यांचे वाचक आहेत. प्राणांच्या दोन गति आहेत, एक आंत्न

बाहेर जाणारी व दुसरी बाहेरून आंत येणारी. या क्रियांचे सूचक शब्द वरील मंत्रांत ( १ ) पराचीन व ( २ ) प्रतीचीन आहेत. या शब्दांवरून प्राणायामविधिचा बोध होऊं शकतो. तरी त्याचा अनुभव घेऊन आपल्या शरीरांतील प्राणांचें महत्त्व जाणणें व प्राणायामद्वारा त्यांना आपल्या स्वाधीन ठेवणें हें अत्यंत जरूर आहे.

या ते प्राण प्रिया तनूर्यो ते प्राण प्रेयसी ।
अथो यद्भेषजं तव तस्य नो धेहि जीवसे ॥९॥ अ० ११।४(६)

हे प्राण! ( या ते प्रियाः ) जी तुझा प्रिय व ( या उ ते प्रेयसी ) जी तुझी प्रीतिवाचक ( तनूः ) शरीरयष्टि आहे. (अथो) तसेंच (यत् तव भेषजं) जो तुझ्या ठिकाणीं औषधींचा गुण आहे ( तस्य ) त्याचें ( नः ) आमच्या ( जीवसे ) जीवनासाठीं ( धेहि ) दान कर.

प्राणाच्या ठिकाणीं परमानंदाची शक्ति आहे, प्राण असेपर्यंत कोणाशींही प्रेमाचे व्यवहार होतात. तसेंच प्राणाच्या ठिकाणीं दिव्य औषधिगुण आहेत. प्राण हा मोठा दिव्य वैद्य आहे. हा शरीरांत रममाण होऊन सर्व रोगांना दूर करतो. जेव्हां हा निघून जातो तेव्हां वैद्यांचें कोणतेंही औषध परिणामकारक होत नाहीं.

प्राणः प्रजा अनु वस्ते पिता पुत्रमिव प्रियम् ।
प्राणो ह सर्वस्येश्वरो यच्च प्राणति यच्च न ॥१०॥
अ० ११।४(६)

प्राण ( प्रजाः ) प्रजेला ( अनुवस्ते ) परिस्थितीची अनुकूलता असेपर्यंत आच्छादून असतो,ज्याप्रमाणें पिता प्रिय पुत्रांना वस्त्रादि देऊन आच्छादित असतो. प्राणच सर्वांचा ईश्वर आहे, जे कोणी ( प्राणति ) श्वास घेतात व जे (न) श्वास घेत नाहींत (त्या सर्वांचा ही तोच ईश्वर आहे.)

ज्या प्रकारें प्रिय पुत्रांना बाप अन्नवस्त्रादि देतो त्याप्रमाणें अनुकूल व्यवहार करणाऱ्या माणसांनाच प्राण दीर्घ जीवन देतो. हा प्राणच सर्व स्थावर-जंगम वस्तूंच्या सुस्थितीचें मूळ कारण आहे.



# पाठ ९ वा.

प्राणो मृत्युः प्राणस्तक्मा प्राणं देवा उपासते ।
प्राणो ह सत्यवादिनमुत्तमे लोक आ दधत् ॥ ११ ॥
अ० ११।४ (६)

प्राण मृत्युही आहे व प्राण (तक्मा) जीवनशक्तिही आहे. म्हणून सर्व (देवाः) देव अर्थात इंद्रियादिक प्राणाचीच उपासना करितात. सत्यवादी मनुष्याला प्राणच उत्तम लोकांत (आदधत्) स्थापन करतो.

प्राण जाण्याच्या स्थितीस मृत्यु व असण्याच्या स्थितीस जीवन म्हणतात; म्हणून संपूर्ण इंद्रियें प्राणाच्या आधीन आहेत; तसेंच पृथ्वी आदीकरून देवता देखील प्राणाच्या आधीन आहेत. सत्य भाषण, सत्यावर निष्ठा इत्यादिमुळें जें आत्मिक बल वाढतें तें प्राणास कारणीभूत आहे. म्हणून प्रत्येकानें प्राणायामद्वारा प्राणाची उपासना करावी.

प्राणो विराट् प्राणो देष्ट्री प्राणं सर्व उपासते ।
प्राणो ह सूर्यश्चन्द्रमाः प्राणमाहुः प्रजापतिम् ॥१२॥ अ०११।४ (६)

प्राणच (वि-राज्) विशेष तेजस्वी आहे, प्राणच (देष्ट्री) प्रेरक आहे, प्राणच सूर्य व चंद्र आहे, प्राणालाच प्रजापति असेंही म्हणतात. यासाठीं (सर्वे) सर्वजण (प्राण उपासते) प्राणाची उपासना करतात.

पृथ्वी, सूर्य, चंद्र इत्यादि देवतांमध्यें देखील प्राणशक्ति आहे हें जाणून प्राणाचें महत्त्व प्रत्येकानें जाणणें जरूर आहे.

अपानति प्राणति पुरुषो गर्भे अन्तरा ।
यदा त्वं प्राण जिन्वस्यथ स जायते पुनः ॥१४॥ अ० ११।४ (६)

(पुरुषः) मनुष्य (गर्भे अन्तरा) गर्भाच्या आंत (प्राणति) श्वास घेतो व (अपानति) उच्छ्वास ही सोडतो. हे प्राण ! जेव्हां तूं (जिन्वसि) अनुमोदन देतोस (अथ) तेव्हांच (सः) तो (पुनः जायते) फिरून उत्पन्न होतो.

हे प्राण! (यः ते इदं वेद) जो तुझ्या या मोठेपणाला जाणतो व (यस्मिन्) ज्याच्या ठिकाणीं तूं ( प्रतिष्ठितः असि ) पूर्ण स्थिर झाला आहेस, (तस्मै) त्याच्याकरितां (उत्तमे लोके) उत्तम लोकांत (सर्वे) सर्वांनीं (बलिं हरान्) भेटी आणाव्यास.

प्राणाचें महत्व जो मनुष्य जाणतो व ज्याच्या ठिकाणीं प्राणायामादि अभ्यासानें प्राण स्थिर झाला आहे, त्याची योग्यता इतकी असते कीं सर्व लोक त्या योग्याचा सत्कार करूं लागतात. म्हणून प्रत्येकानें प्राणाचें महत्व ओळखून आपल्या ठिकाणीं प्राण स्थिर करण्याचा यत्न करावा.

यथा प्राण बलिहृतस्तुभ्यं सर्वाः प्रजा इमाः ।
एवा तस्मै बलिं हरान् यस्त्वा शृणवत्सुश्रवः ॥ १९ ॥
अ० ११ । ४ ( ६ )

हे प्राण! ( यथा ) ज्याप्रमाणें ( तुभ्यं ) तुला (सर्वाः इमाः प्रजाः) या सर्व प्रजा ( बलिहृतः ) भेट अर्पण करतात, (एवा) त्याप्रमाणें ( तस्मै ) त्याला देखील ( बलिं हरान् ) भेट मिळावी, जो ( सुश्रवः ) उत्तम कीर्तिवान् असून ( त्वा ) तुझें ( शृणवत् ) ऐकेल.

सर्व प्राणाची उपासना करतात. जर ते प्राणाबरोबर न राहतील, तर ते जिवंत राहूं शकणार नाहींत. सर्व लोकांना प्राणाचा जीविताशीं असणारा संबंध माहीत असतोच.जो प्राणाचें महत्व अनुभवानें जाणतो त्या योग्याचा सर्व लोक सत्कार करतात.

अन्तर्गर्भश्चरति देवतास्वाभूतो भूतः स उ जायते पुनः ।
स भूतो भव्यं भविष्यत् पिता पुत्रं प्रविवेशा शचीभिः ॥२०॥
अ० ११ । ४ ( ६ )

(स उ ) तो च (देवतासु आभूतः ) देवतांच्या ठिकाणीं व्यापक प्राण ( अन्त. गर्भः चरति ) गर्भाप्रमाणें आंत फिरत असतो. (सः) त्यानें ( भूतः ) भूतकाळच्या तसेच (भव्यं) भविष्यत पुढें येणाऱ्या भविष्य-काळच्या जगांत ( शचीभिः प्रविवेश ) आपल्या सर्व शक्तींनें प्रवेश केला

आहे, ज्याप्रमाणें (पिता पुत्रं) बाप मुलाच्या ठिकाणीं अंशरूपानें प्रविष्ट होतो, पित्याच्या शरीराच्या प्रत्येक अंगप्रत्यंगाचा अंश पुत्राच्या शरीरांत येत असतो, त्याचप्रमाणें संपूर्ण जगाच्या देवतांचे अंश मनुष्याच्या ठिकाणीं असतात. संपूर्ण पदार्थांत जो व्यापक प्राण आहे, तोच आपला अंश या शरीरांत घालत असतो असें समजावें.

एकं पादं नोत्खिदति सलिलाद्धंस उच्चरन् ।
यदंग स तमुत्खिदेन्नैवाद्य न श्वः स्यान्न रात्री
नाहः स्यान्न व्युच्छेत् कदाचन ॥२१॥

अ० ११।४(६)

( सलिलात् ) पाण्यांतून हंस ( उच्चरन् ) वर उडत असतां ( एक पादं ) एकच पाय ( न उत्खिदति ) वर काढत नाहीं. हे ( अंग ) प्रिय, ( यत् ) जर ( सः ) तो तं (उत्खिदेत्) त्या दुसऱ्या पायाला वर काढील तर ( न एव अद्य ) आजच नव्हे तर ( न श्वः स्यात् ) उद्यांही त्याला असणार नाहीं. तसेंच ( न रात्रीः ) रात्रीही नाहीं व ( न अहः स्यात ) दिवसही त्यास असणार नाहीं; व ( न कदाचन व्युच्छेत् ) प्रभात देखील कधींही होणार नाहीं.

# पाठ ११ वा

आ ब्रह्मन्ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायतामा राष्ट्रे राजन्यः
शूर इषव्योऽतिव्याधी महारथो जायताम्। दोग्ध्री
धेनुर्वोढाऽनड्वानाशुः सप्तिः पुरन्धिर्योषा जिष्णू
रथेष्ठाः सभेयो युवाऽस्य यजमानस्य वीरो जायताम्।
निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु। फलवत्यो
न ओषधयः पच्यन्ताम्। योगक्षेमो नः कल्पताम्।

यजुर्वेद २२। २२

हे ( ब्रह्मन् ) परमात्मन्! ( राष्ट्रे ) आमच्या राष्ट्रांत ( ब्रह्मवर्चसी ब्राह्मण ) ज्ञानतेजाने चमकणारा ब्राह्मण ( आ जायताम् ) होवो. तसेच आमच्या राष्ट्रांत ( राजन्यः ) क्षत्रिय ( शूरः ) शूर वीर ( इषव्यः ) बाण चालवण्यांत अत्यंत कुशल ( अतिव्याधी ) शत्रुचा अत्यंत वेध करणारा ( महारथः ) महारथी ( आ जायतां ) होवो. आमच्या राष्ट्रांत ( दोग्ध्री धेनुः ) दूध देणारी गाय, ( वोढा अनड्वान् ) ओढणारा बैल, ( आशुः सप्तिः ) चपळ घोडा, ( पुरन्धिः योषा ) विदुषी स्त्री, ( रथेष्ठाः जिष्णुः ) रथावर बसून शत्रूला जिंकणारा, व ( सभेयः युवा ) सभेमध्ये भाग मिळण्यास योग्य असा तरुण ( अस्य यजमानस्य वीरः ) या यजमानाचा वीर ( आजायतां ) उत्पन्न होवो. ( नः ) आम्हांसाठी ( पर्जन्यः ) मेघ ( निकामे निकामे ) आवश्यक असेल तेव्हां ( वर्षतु ) पाऊस पाडो. नः आमच्यासाठीं ( फलवत्यः ओषधयः ) फलयुक्त औषधी ( पच्यन्ताम् ) परिपक्व होवोत. ( नः योगक्षेमः ) आमचा योगक्षेम ( कल्पतां ) क्षम होवो.

ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्य स्विद्धनम्॥

यजु. ४० । १

( यत् किंच ) जें काय (जगत्यां जगत्) या जगामध्यें वस्तुमात्र आहे तें ( इदं सर्वं ) हें सर्व ( ईशा वास्यं ) ईश्वरानें व्यापण्यास योग्य आहे. ( तेन त्यक्तेन ) त्यानें दिलेल्यानें (भुञ्जीथाः) भोग करा, (कस्य-स्विद् धनं ) कोणाच्याही धनाचा ( मा गृधः ) लोभ धरूं नका.

जें काय या जगांत आहे त्या सर्वांत ईश्वर भरला आहे. तो देईल त्या-चाच भोग घ्या दुसऱ्या कोणच्याही धनाचा अपहार करूं नका.

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ २ ॥

( इह ) संसारामध्यें (कर्माणि कुर्वन् एव ) कर्में करीतच ( शतं समाः जिजीविषेत् ) शंभर वर्षें जगण्याचा यत्न करावा. ( एवं त्वयि ) हाच विचार तुझ्यामध्यें स्थिर राहो. ( इतः अन्यथा ) याहून दुसरा मार्ग ( न अस्ति) नाहीं. असें वागलें असतां (नरे कर्म न लिप्यते) मनुष्याला कर्माचा दोष लागत नाहीं.

असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसावृताः।
तांस्ते प्रेत्यापि गच्छन्ति ये के चात्महनो जनाः ॥

यजु० ४० । ३

(असुर्याः नाम ) आसुर्य नांवाचे (ते लोकाः ) ते लोक आहेत की जे ( अन्धेन तमसा ) अंधतमानें ( आवृताः ) व्यापलेले आहेत. ( ये के च ) जे कोणी (आत्महनः जनाः ) आत्मघातकी लोक आहेत ( ते ) ते लोक (प्रेत्य अपि ) मरणानंतर ही (तान् गच्छन्ति) त्या लोकांप्रत जातात.

आत्मघात करून घेणारे जे लोक असतात ते मेल्यानंतर अशा स्थानो-मध्यें जन्म घेतात कीं ज्या ठिकाणीं परमावधीचा अंधकार असतो.

या जगांत मनुष्यानें विविध पुरुषार्थ करीत करीत शंभर वर्षें जगण्याची इच्छा करावी व तसा प्रयत्नही करावा.हाच पुरुषार्थांचा विचार मनामध्यें स्थिर ठेवावा. याशिवाय दुसरा मार्ग उन्नतिसाठीं नाहीं. सत्कर्म करीत असतां केलेल्या कर्मांचा लेप लागत नाहीं.

इदं मे ब्रह्म च क्षत्रं चोभे श्रियमश्नुताम्।
मयि देवा दधतु श्रियमुत्तमां तस्यै ते स्वाहा ॥ यजुर्वेद ३२।१६

( मे ) माझें ( इदं ब्रह्म ) हें ज्ञान व माझें हें (क्षत्रं) शौर्य (उभे) हे माझे दोन्ही गुण ( श्रियं अश्नुतां ) संपत्तिला प्राप्त होवोत. (देवाः) देव ( मयि ) माझ्यामध्यें (उत्तमां श्रियं दधतु ) उत्तम शोभा धारण करोत. (तस्यै ते ) त्या तुला (स्वा+हा=सु+आह) आम्ही चांगलें भाषण करतों.

माझें ज्ञान व शौर्य ऐश्वर्य प्राप्त करोत. सर्व देवांनीं माझी शोभा वाढवावी.

स नो बन्धुर्जनिता स विधाता धामानि वेद भुवनानि विश्वा।
यत्र देवा अमृतमानशानास्तृतीये धामन्नध्यैरयन्त ॥ यजु. ३२।१०

( सः ) तो ईश्वरच ( नः बन्धु. ) आमचा बंधु आहे, तोच (जनिता) उत्पत्तिकर्ता आहे ( सः विधाता ) तो निर्माण करणाराही आहे, तो (धामानि वेद ) सर्व स्थानें जाणतो, व (विश्वा भुवनानि) सर्व भुवनें हीं जाणतो (यत्र) जेथें ( अमृतं आनशानाः देवाः) अमरत्व प्राप्त करणारे देव (तृतीये धामन्) तृतीय धामामध्यें (अध्यैरयन्त ) विचरत असतात.

ईश्वरच आमचा खरा बंधु, जनक व निर्माता आहे. तो सर्व स्थानें व लोकलोकान्तर यांना योग्य रीतिनें जाणतो. त्याच्यामध्येंच तृतीय धामामध्यें जाऊन सर्व देव अमृत सुखाचा आस्वाद घेतात.

यो देवेभ्य आतपति यो देवानां पुरोहितः
पूर्वो यो देवेभ्यो जातो नमो रुचाय ब्राह्मये॥ यजु. ३१।२०

( य ) जो (देवेभ्य.) देवांसाठी ( आतपति) तापत असतो, (यः ) जो (देवानां पुरोहित.) देवांचा अग्रगामी आहे, ( यः ) जो (देवेभ्यः पूर्वः जातः) देवांच्या पूर्वी झाला, त्या (रुचाय ब्राह्मये नमः) तेजस्वी परमेश्वराला नमस्कार असो.

जो देवांना प्रकाश देण्यासाठीं प्रकाशतो,जो देवांचा अग्रगामी आहे व जो देवांच्याही पूर्वीचा आहे, त्या परम तेजस्वी ईश्वराला माझा नमस्कार असो.

अंक २३



# संस्कृत-स्वयं-शिक्षक.

( संस्कृत भाषा शिकण्याचा अगदीं सोपा उपाय. )

## भाग २३ वा.



लेखक व प्रकाशक
श्रीपाद दामोदर सातवळेकर
स्वाध्याय-मंडल, औंध, (जि० सातारा.)

दुसरी आवृत्ति



शके १८५२, सन १९३१.

मूल्य ८ आणे



# संस्कृत स्वयं शिक्षक.

भाग २३ वा.



## पाठ १ ला.

'देव' शब्दाचा अर्थ व्यवहार चालविणारे लोक असा आहे. देव शब्दा तील 'दिव्' धातूचा अर्थ 'विजिगीषा—व्यवहार' इत्यादि आहे

हा मंत्र जेव्हा मेघवाचक असेल, तेव्हा त्याचा अर्थ पुढीलप्रमाणे होईल— 'हे महाशब्द करणाऱ्या मेघा' हे सर्व वायु आदि देव मोठ्या तेजासाठी तसेच दुष्काळ आदि दुष्ट शत्रूंचे निवारण करण्यासाठी तुला चालवितात।"

वाचकांनीं दोन्हीं अर्थांची तुलना करावी, म्हणजे त्यांना असे दिसून येईल कीं, वरील मंत्र मेघाच्योक्तीचा आहे, व मेघाच्या वर्णनांतून या मंत्राच्या द्वारें वीराचा धर्मच सांगितला आहे मरुत् हे वायुदेव म्हणून प्रसिद्ध आहेतच व त्यांचा मेघाशीं संबंधहा सर्वांना माहीत आहेच

वेदमंत्रांतील हा अन्योक्ति अलंकार वाचकांनीं पाहून त्यांचे मनन करावें, म्हणजे वदाच्या गंभीर अर्थाची कल्पना आपोआपच त्यांच्या ध्यानांत येईल वेदामध्ये या अलंकार प्रियवाला फारच महत्व आहे व हे अलंकार समज-ल्यास वेदाचा शुद्ध अर्थ स्पष्टपणें कळण्यास मदत होते

## सोम

सोम देवता प्रसिद्ध आहे सोमवल्ली, चंद्र, विद्वान, आत्मा, परमात्मा इत्यादि सोमाचे अनेक अर्थ आहेत या संबंधीं उदाहरण —

सोमं मन्यते पपिवान्यत्संपिंषन्त्योषधिम् ।
सोमं यं ब्रह्माणो विदुर्न तस्याऽश्नाति कश्चन ॥

ऋ० १० । ८५ । ३

"(यत् ओषधिं संपिंषन्ति) ज्या औषधीच साधारण लोक चूर्ण करितात व तें मरून (सोमं पपिवान् मन्यते) मी सोम प्यालों असें जे साधारण लोक मानतात ते त्याचें म्हणणं आहीं चुकीचें आहे. (यं सोमं ब्रह्माण विदु) ज्या सोमाला ब्राह्मणलोक सोम असें समजतात (तस्य कश्चन न अश्नाति) त्याला कोणीही पिऊ शकत नाहीं।"

या मंत्रांत यज्ञ करूनच सोमपान करण्याची कल्पना आहे. जरी सोम हा एका दिव्य औषधीचा रस आहे, तथापि त्याचें सेवन विधिपूर्वक करणेंच जरूर आहे. विधि सोडून केवळ औषधीचा रस पिणें म्हणजे सोमपान नव्हे. हा यज्ञविषयक अर्थ झाला म्हणून याला "आधियज्ञ अर्थ" असें म्हणतात.

"सोमाला जे लोक कुटतात व त्याचा रस काढतात व आम्ही सोम प्यालों असें समजतात तें म्हणणें चुकीचें आहे, कारण ब्राह्मण लोक ज्याला सोम म्हणतात त्याचा रस देवांवांचून अन्य कोणीच पिऊं शकत नाहींत." हा देवताविषयक अर्थ आहे म्हणून याला "आधिदैविक अर्थ" म्हणतात. हा अर्थ चांगल्या प्रकारें मनावर ठसण्यास हाच अर्थ आतां अध्यात्मभूमिके वरून पाहूं—

"साधारण लोक सोमवल्ली कुटतात, तिचा रस काढतात व आम्हीं सोम प्यालों असें समजतात, पण हें म्हणणें ठीक नव्हे, वास्तविक पाहतां ब्रह्मज्ञानी लोक ज्याला खरा सोम म्हणतात तो चंद्र ( चंद्राच्या अंशभूत शरीरांतील मन ) आहे व त्याचें पान सर्व इंद्रियें करीत असतात."

वरील उदाहरणांवरून वाचकांच्या लक्ष्यांत हें आलें असेल कीं सोम शब्दाच्या निरनिराळ्या अर्थांच्या योगानें मंत्राचा अर्थ आहीं बदलतो. सोम शब्दाचे अर्थ–सोमवल्ली, औषधि, चंद्र, मन, ज्ञानी गुरु, आत्मा, परमात्मा, इत्यादि आहेत. वरीलपैकीं सोमाचा औषधि हा अर्थ सर्वांच्या परिचयाचा आहे, परंतु अन्य अर्थ सर्व लोकांना माहित नसतात. सोमाचा अर्थ चंद्र असाही आहे परंतु चंद्राचा प्रतिनिधि अंशरूपाने आमच्या शरीरांत "मन" या नांवानें वास करतो, ही मुख्य गोष्ट सर्व लोक विसरतात. त्याप्रमाणें सोमाचा म्हणजे चंद्राचा संबंध सूर्य आदिकरून अन्य देवांशीं आहे, त्याप्रमाणेंच शरीरांतील सोमाचा अंशरूप प्रतिनिधि जें मन त्याचा संबंध नेत्रादि अन्य इंद्रियांशीं आहे.

मनाची शक्ति संपूर्ण इन्द्रियांच्या ठिकाणीं येऊं शकते, ही गोष्ट ज्याला माहीत आहे, त्याला "मनाचा रस संपूर्ण इंद्रियें पितात" असें जें वेदांत म्हणणें आहे तें बरोबर रीतीनें समजेल व तोच मनुष्य "सोमरस सर्व देव पितात" या वेदवाक्याचा भावार्थ समजण्यास समर्थ होतील.

सोम शब्दांत "स+उमा" हे दोन शब्द आहेत. उमा शब्दाचा अर्थ "रक्षक विद्या" असा आहे. या रक्षकविद्येनें जो युक्त असतो तोच (स+उमा=सोम.) ज्ञानी होय. या ज्ञानी रूपी सोमाचा ज्ञानरूप रस शिष्य काढतात व पितात. ज्ञानी सोमाचा रस म्हणजे विद्यारस होय व हरएक पाठशाळेंत शिष्यवर्ग गुरूचा हा विद्यामृतरस पीत असतो सर्व लोकांना हें "सोमपान" माहीत आहे. याप्रमाणें सोमपानाचे अनेक प्रकार आहेत जो हे सर्व प्रकार जाणता तोच वेदांचें सत्व जाणू शकतो.

---

## पाठ २ रा.

अष्टाचक्रं वर्तत एकनेमि सहस्राक्षरं प्र पुरो नि पश्चा।
अर्धेन विश्वं भुवनं जजान यदस्यार्धं क्व तद् बभूव॥
स केतुः ॥२२॥

अ० ११।४ (६)

(अष्टाचक्र) आठ चक्रांनी युक्त, (सहस्राक्षर) सहस्र अथवा हजारों अविनाशी अक्षरांनी पूर्ण व (एकनेमि) एक केंद्र असलेलें हें प्राणचक्र (प्र पुर) पुढें व (नि पश्चा) मागें (वर्तते) होत असतें. याच्या (अर्धेन) अर्ध्यानेंच (विश्व भुवन) सर्व भुवन (जजान) उत्पन्न झालें आहे, पण याचा जो शेष (अर्ध) अर्धभाग राहिला आहे, (स) त्याचें (क्व-भत) काय (केतु) चिन्ह आहे?

शरीरांत हृदयस्थानीं असलेल्या मानससरोवराच्या मागें एक पर्वत आहे त्याचें नांव मेरु पर्वत, मेरुदंड अथवा पृष्ठवंश असें आहे यामध्यें आठ

चक्रें आहेत, त्यांचीं नांवें मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूरक, सूर्य, अनाहत, विशुद्धि, आज्ञा व सहस्रार अशीं आहेत. नाभीच्या ठिकाणीं यांचें मध्यकेंद्र आहे व प्रत्येक चक्राचे शेंकडों आरे चारी दिशांना पसरले आहेत. याप्रमाणें हें " मज्जातंतु संस्थान " आपल्या शरीरांत आहे.

हें प्राणचक्राचें वर्णन आहे. हें प्राणचक्र मागें व पुढें जात असतें. मागें-पुढें होण्याचें कारण श्वास व उच्छ्वास यांची गति परस्परविरुद्ध आहे हें होय, म्हणून ती गति ( प्र पुर , नि पश्चा ) पुढें व मागें या शब्दांनीं व्यक्त केलेली आहे.

प्राणायामाच्या द्वारें विशेष प्रकारें व श्वासोच्छ्वासाच्या द्वारें सर्वसाधारण रीतीनें ही प्राणशक्ति वरील आठ चक्रांत पोंहोंचते प्राणाचा एक भाग शरीरार्शी संलग्न आहे व दुसरा आत्म्याशीं संलग्न आहे, हें सांगण्यासाठीं वरील मंत्र असें म्हणतो कीं ' संपूर्ण स्थूल भुवन ( शरीर ) एका भागानें उत्पन्न करून अवशिष्ट भागानें काय सूचित करीत आहे बरें?" अर्थात् "तो आत्म्याची सूचना करतो" हेंच त्या प्रश्नाचें उत्तर आहे. याप्रमाणें हें प्राणाचें अत्यंत मनोरम वर्णन या मंत्रांत आहे व तें अत्यंत विचार करण्यास योग्य आहे. या प्रकारच्या श्रेष्ठ प्राणाला नमन पुढील मंत्रांत आहे—

यो अस्य विश्वजन्मन ईशे विश्वस्य चेष्टतः ।
अन्येषु क्षिप्रधन्वने तस्मै प्राण नमोऽस्तु ते ॥२३॥

अ० ११ । ४ ( ६ )

हे प्राण ! जो तूं ( विश्वजन्मनः ) सर्वांना जन्म देणारा व ( चेष्टतः अस्य विश्वस्य ) हालचाल करणाऱ्या या जगाचा ( ईशे ) स्वामी आहेस, तसेंच ( अन्येषु ) इतरांच्या ठिकाणीं ( क्षिप्रधन्वने ) शीघ्र गति देणारा आहेस ( तस्मै ते नमः अस्तु ) त्या तुला नमस्कार असो !

हालचाल करणाऱ्या सर्व प्राण्यांचा प्राण हा स्वामी आहे. तसेंच हा संपूर्ण अन्य पदार्थांनाही प्रेरणा करून राहिला आहे. असें या प्राणाचें विश्वव्यापक कार्य पहाणें हें आवश्यक आहे.

**यो अस्य सर्वजन्मन ईशे सर्वस्य चेष्टतः ।**
**अतन्द्रो ब्रह्मणा धीरः प्राणो मानु तिष्ठतु ॥२४॥**
**अ० ११ । ४ ( ६ )**

जो प्राण ( सर्व—जन्मन· ) सर्व जन्मास येणाऱ्या व (चेष्टतः सर्वस्य) हालचाल करणाऱ्या सर्व प्राणिमात्रांवर अधिकार गाजवितो, तसेंच जो ( अतन्द्रः ) आलस्यरहित आहे, व ( ब्रह्मणा धीरः ) आत्म्याशीं संयुक्त असल्यामुळें जो धैर्यमय आहे, तो प्राण ( मा ) मजबरोबर ( अनु-तिष्ठतु ) राहो.

प्राण सर्व प्राण्यांचा स्वामी आहे, प्राण आहे म्हणूनच यास प्राणी असें म्हणतात. प्राण नसेल तर प्राणीही असणार नाहीं. हा प्राण जन्मापासून मृत्यूच्या वेळेपर्यंत आपलें कार्य करीत असतो, म्हणून त्याला आलस्यरहित कार्य करणारा असें म्हटलेलें आहे. प्राणाला सुस्ती येणे म्हणजेच मृत्यु होय. प्राणाचा एक भाग स्थूल शरीरांत कार्य करीत असतो व दुसरा आत्म्या-बरोबर रहात असतो. आत्म्याबरोबर राहण्यानें तो अधिकात अधिक बल मिळवूं शकतो. हा असा अत्यंत बलवान प्राण आपल्या शरीरांत दीर्घकाल-पर्यंत रहावा अशी प्रत्येकास इच्छा होणें स्वाभाविकच आहे.

**ऊर्ध्वः सुप्तेषु जागार ननु तिर्यङ् नि पद्यते ।**
**न सुप्तमस्य सुप्तेष्वनु शुश्राव कश्चन ॥२५॥**
**अ० ११ । ४ ( ६ )**

( सुप्तेषु ) सर्व निजल्यानंतर देखील हा प्राण ( ऊर्ध्वः जागार ) उभा राहून जागत असतो. ( न नु ) कधींही ( तिर्यङ् ) आडवा होऊन ( नि-पद्यते ) निजत नाहीं. ( सुप्तेषु ) सर्व निजल्यावर ( अस्य सुप्तं ) याचें निजणें ( कश्चन ) कोणीही ( न अनु शुश्राव ) ऐकलेलें नाहीं.

सर्व प्राणी थकल्यावर निजतात, पण ते निजल्यावर देखील हा प्राण उभा राहून जागता पाहरा करीत असतो. ज्याप्रमाणें इतर प्राणी थकल्यावर निजतात त्याप्रमाणें हा कधींही निजत नाहीं; अर्थात विश्रांति न घेतां

# पाठ ३ वा.

## चन्द्रमाः

या शब्दाच्या अनेक व्युत्पत्ति आहेत त्यापैकीं कांहीं खालीं दिल्या आहेत—

१ चायन् द्रमति= चाय्+द्रम्=चन्द्रमा = कृपा करीत जो जातो तो

२ चन्द्र मासा=चन्द्रमा.=तेजस्वी असणारा असा मापन करतो अर्थात् कालाची गणना करण्यास सहायक होतो तो

३ चान्द्रं मानं अस्य= चान्द्रवर्षाला निर्माण करतो तो

## चन्द्रः

चन्द्र शब्दाच्या व्युत्पत्ति ही अनेक आहेत त्या पुढील प्रमाणें—

१ चन्द्रते. चन्द्र = आल्हाददायक होतो

२ चारु द्रमति= सौंदर्यासह गमन करतो

३ चिरं द्रमति= सायंकाल अथवा धीरे धीरे जातो

४ चम्यते इति चम्+द्रम्=ग्याला जातो अर्थात् कृष्णपक्षात तेजहीन होऊन जातो तो

चन्द्र शब्दापासून ही चन्द्रमा शब्द बनतो चन्द्रमा शब्दाची व्युत्पत्ति वर सांगितलीच आहे. आता याचें उदाहरण पहा—

नवो नवो भवति जायमानोऽह्नां केतुरुषसामेत्यग्रम् ।
भागं देवेभ्यो विदधात्यायन्प्र चन्द्रमास्तिरते दीर्घमायुः ॥

ऋ० १०।८५।१९

"(चन्द्रमा जायमानः नवः नवः भवति) चन्द्र शुक्लपक्षात उगवला असतां नवा होत असतो (अह्नां केतुः) हा दिवसाचा झेंडा अर्थात् हें त्याचें चिन्ह आहे (उषसां अग्रे एति) उष:कालाच्या पूर्वी कृष्णपक्षात उदय पावतो (आयन् देवेभ्यः भागं विदधाति) हा आपला असतां देवांचा

भाग देतो, कारण इष्टि वगैरे त्याच्यामुळें होतात व त्यामुळें तो देवांना भाग देतो. तसेंच ( चन्द्रमाः दीर्घं आयुः प्रतिरते ) चन्द्र दीर्घायुष्य देतो.

## मृत्युः

'मृ' मरणें या धातूपासून मृत्यु शब्द झाला आहे. त्याचा अर्थ प्रसिद्धच आहे. त्याचें उदाहरणः—

परं मृत्यो अनु परेहि पन्थां यस्ते स्व इतरो देवयानात् ।
चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मा नः प्रजां रीरिषो मोत वीरान्॥
ऋ० १० । १८ । १

हे मृत्यो! ( परं अनुपन्थां परेहि ) श्रेष्ठ अनुकूल मार्गावरून मला घेऊन चल, ( यः ते देवयानात् इतरः स्वः ) जो तुझा देवमार्गाहून भिन्न दुसरा मार्ग आहे. ( चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि ) पाहणाऱ्या अथवा ऐकणाऱ्या तुला मी हें सांगतों. ( नः प्रजां मा रीरिषः ) आमच्या मुलांना मार्गांतच नष्ट करूं नको व ( उत मा वीरान् ) वीर लोकांना ही नष्ट करूं नको.

जो देव मृत्यूच्या योगानें संहार करतो, त्याची प्रार्थना येथें दीर्घायुष्य देण्यासाठीं केलेली आहे.

## मरुत्

मरुत् शब्दाची व्युत्पत्ति पूर्वी सांगितली आहेच. परंतु ती दृढ होण्या-साठीं पुनः येथें दिली आहे.

( १ ) मित+राशी=( मा+रु )=मरुत्= मितभाषणी
( २ ) मित+रोचन=( मा+रुच् )=परिमिततेचा चाहता.
( ३ ) महत्+द्रवन्ति = म+द्रु ( द—र ) = म+रुद् = मरुत्= जलद चालणारा.

या मरुत् शब्दाचें उदाहरण पुढीलप्रमाणें:—

आ विद्युन्मद्भिर्मरुत स्वर्कै रथेभिर्यात ऋष्टिमद्भिरश्वपर्णैं ।
आ वर्षिष्ठया न इषा वयो न पप्तता सुमायाः ॥

ऋ० १ । ८८ । १

" हे ( मरुत ) मरुत् हो! हे वीर हो! तुम्ही ( विद्युन्मद्भि स्वर्कैः ऋष्टिमद्भि अश्वपर्णै ) विजेप्रमाणें चमकणाऱ्या व अत्यंत तेजस्वी अश्वांनीं युक्त ( रथेभिः आयात ) अशा रथांतून या. हे ( सुमाया ) उत्तम कारागिर हो! तुम्ही ( वर्षिष्ठया इषा ) विपुल अन्न घेऊन ( वय न ) पक्ष्याप्रमाणें ( न आपप्तत ) आमच्या जवळ या

यांतील कांहीं पदांचा अर्थः—

१ स्वर्क ( सु+अर्क )=उत्तम तेजानें युक्त
२ अश्वपर्ण ( अश्व—पूर्ण )=अश्व ज्याला जोडलेले आहेत
३ सु+माया =उत्तम कौशल्यानें युक्त, मया शब्द कौशल्य अशा अर्थाचा आहे
४ विद्युन्मत्=विजेनें युक्त; तेजानें चमकणारा.
५ ऋष्टिमत्=शस्त्रास्त्रांनीं युक्त

यासमाणें या मंत्राच्या पदाचे विशेष अर्थ आहेत

## ऋभु

ऋभु शब्दाचा अर्थ पूर्वी एकदा सांगितला आहेच. तथापि पुन स्मरणार्थ येथें दिला आहे —

१ उरु+भान्ति=ऋ+भु=ऋभु=विशेष चमकणारे.
२ ऋतेन + भान्ति = ऋ + भु = ऋभु = सत्य व्यवहाराच्या योगानें शोभणारे
३ ऋतेन + भरन्ति = ऋ + भु = ऋभु = सत्यानें युक्त, सत्यव्यवहार करतो तो.

याचं उदाहरण —

विष्ट्वी शमी तरणित्वेन वाघतो मर्तासः सन्तो अमृतत्वमानशुः ।
सौधन्वना ऋभवः सूरचक्षसः संवत्सरे समपृच्यन्त धीतिभिः ॥

ऋ० १ । ११० । ४

( वाघत सन्त मर्तासः ) वाहनातीं जाणारे सत्यवादी मनुष्य ( तरणित्वेन शमी विष्ट्वी ) त्वरेनें कामें करणारे ( अमृतत्व आनशुः ) अमरपण प्राप्त करून घेतात ( सौधन्वनाः सूरचक्षसः ऋभवः ) उत्तम धनुर्धारी व उत्तम बुद्धिमान कारागीर (संवत्सरे धीतिभिः समपृच्यन्त)वर्षभर आपल्या बुद्धीच्या योगानें उत्तम कर्म करतात.

या मंत्रातील काहीं शब्दांचे विशेष अर्थ —

१ विष्ट्वी ( विष्—कर्म करणे ) = उद्यमी, पुरुषार्थी, कर्म करणारे
२ शमी = सयमन करून कर्म करणारे
३ सूरचक्षसः ( सूर + चक्षस् ) उत्तम दृष्टी असलेले, बुद्धिमान्.
४ सौधन्वन्=सु—धन्वन् = उत्तम धनुष्यवाले
५ धीति = कर्म, धारक कर्म
६ तरणि = ( त्वरा—णी ) त्वरेनें घेऊन जाणारे
७ वाघत = वाहत = वाहनांनी युक्त, उचलून नेणारे.

# अंगिरसः

याचें उदाहरण पुढीलप्रमाणें:—

विरूपास इदृषयस्त इद्गम्भीरवेपसः ।
ते अङ्गिरसः सूनवस्ते अग्नेः परिजज्ञिरे ॥

ऋ० १० । ६२ । ५

( वि-रूपासः ) विशेष रूपवाले अर्थात् सृष्टीचें रूप जाणणारे ( इत् ऋषयः ) ऋषि, ( ते इत् गम्भीर-वेपस ) तेही गंभीर बुद्धियुक्त व ( ते अङ्गिरसः ) अंगरस विद्या जाणणारे ( ते अग्नेः सूनवः ) अग्नीच्या पुत्राप्रमाणें तेजस्वी ( परिजज्ञिरे ) प्रसिद्ध होतात

या मंत्रांतील कांहीं शब्दांचे अर्थः—

१ वि+रूपासः = विशेष रूपवाले, सुंदर अथवा विविध रुपांना यथातथ्य जाणणारे.

२ ऋषि= ज्ञानी, प्रगतिशील.

३ गंभीर+वेपस् = गंभीर बुद्धि अथवा गंभीर कर्म करणारे.

४ अंगिरसः=अंगांत जो जीवनरस आहे त्याची विद्या जाणणारे.

याप्रमाणें शब्दांच्या अर्थांचें मनन करून मंत्रांच्या अर्थांचेंही वाचकांनीं मनन करावें. याप्रमाणें मनन केल्यास मंत्रांचे गूढार्थ स्पष्ट होऊं लागतात वाचक याप्रमाणें मंत्रांच्या अर्थांचें मनन करून वेदमंत्रांपासून दिव्य ज्ञान प्राप्त करून घेतील अशी आशा आहे.

---

## पाठ ४ था.

यथा द्यौश्च पृथिवी च न बिभीतो न रिष्यतः ।
एवा मे प्राण मा बिभेः ॥ अथर्व २।१५।१

त्याप्रमाणें द्युलोक व पृथ्वी ( न बिभीत॰ ) कशालाही भीत नाहींत व त्यामुळें ( न रिष्यतः ) नाश पावत नाहींत, त्याप्रमाणें हे ( मे प्राण ) माझ्या प्राणा ! (मा बिभे.) तूं अजीबात भिऊं नको.

यथाहश्च रात्री च न बिभीतो न रिष्यतः।
एवा मे प्राण मा बिभेः ॥ अ० २।१५।२

ज्याप्रमाणें ( अहः ) दिवस व रात्र भीत नाहींत व त्या निर्भयपणामुळे नष्ट होत नाहींत, त्याप्रमाणेंच हे माझ्या प्राणा! तूं भिऊं नको

यथा सूर्यश्च चन्द्रश्च न बिभीतो न रिष्यतः
एवा मे प्राण मा बिभेः ॥ अ० २।१५।३

ज्याप्रमाणें सूर्यचंद्र कशालाही भीत नाहींत व म्हणून त्यांची कसलीही हानी होत नाहीं, त्याप्रमाणें हे माझ्या प्राणा ! तू भिऊं नको.

यथा ब्रह्म च क्षत्रं च न बिभीतो न रिष्यतः।
एवा मे प्राण मा बिभेः॥ अ० २।१५।४

ज्याप्रमाणें (ब्रह्म) ज्ञान आणि ज्ञानी लोक व शौर्य अथवा शूर वीर हे भीत नाहींत व नाश पावत नाहींत त्याप्रमाणें हे माझ्या प्राणा! तू भिऊ नकोस.

यथा सत्यं चानृतं च न बिभीतो न रिष्यतः।
एवा मे प्राण मा बिभेः॥ अ० २।१५।५

ज्याप्रमाणें (सत्य) सत्य व (अनृ+तत) असत्य सरळपणा यांना कशाचीही भीति नसते व ते त्यामुळें कधींही नष्ट होत नाहींत त्याप्रमाणें हे प्राणा! तू भिऊ नको

यथा भूतं च भव्यं च न बिभीतो न रिष्यत।
एवा मे प्राण मा बिभे॥ अ० २।१५।६

ज्याप्रमाणें भूतकाळ व भविष्यकाळ भीत नाहींत व त्यामुळें नष्ट होत नाहींत त्याप्रमाणें हे प्राणा! तू भिऊ नको.

या सूक्तामध्यें स्पष्ट सांगितलें आहे कीं भीति हेंच नाशाचें कारण होय. म्हणून प्रत्येकानें निर्भय होऊन धर्मकार्य केलें पाहिजे भिण्यानें शक्ति क्षीण होते व निर्बलता येते, अर्थात् वारंवार भीतीनें ग्रस्त होणाऱ्या माणसाचें मन अत्यंत अशक्त होतें, व मन दुर्बल झालें असतां त्याच्या आंगीं शक्ति वाढण्याची शक्यताही रहात नाहीं.

हें सूक्त वैदिकधर्मीय स्त्रीपुरुषांनीं वारंवार मनन करण्यास योग्य आहे. हें सूक्त सांगतें कीं " हे लोकहो पहा! पृथ्वी व द्युलोक, सूर्य, व चन्द्र हे सर्व बलवान् आहेत याचें कारण ते कोणालाही भीत नाहींत. ज्याच्या ठिकाणीं भीति उत्पन्न झाली कीं त्याचें अस्तित्वच राहणार नाहीं त्याचप्रमाणें जे ब्राह्मण व क्षत्रिय भिणार नाहींत ते बलसंपन्न होतील, परंतु जे भित्रे बनतील ते दुबळे होतील म्हणून प्रत्येकानें निर्भय होऊन धर्मकार्य करावें व अधिक थोर बनून अधिक उन्नति प्राप्त करून घ्यावी " याचें तात्पर्य गुरुदेव श्री वैदिकधर्मीय मनुष्यांनीं सत्यधर्माच्या पालनार्थ निर्भयवृत्ति

अनिवार्यच पाहिजे म्हणून सर्व गृहस्थाश्रमी स्त्रीपुरुषांनी आपल्या मुलांना लहानपणी असे शिक्षण द्यावे की ज्यायोगे ते निर्भय बनून आपले उत्कर्ष संपादन करतील व भीतीचा लेशही त्यांच्या अंतःकरणात उत्पन्न होणार नाही

> द्वाविमौ वातौ वात आ सिन्धोरा परावतः ।
> दक्षं ते अन्य आ वातु पराऽन्यो वातु यद्रप ॥
>
> ऋ० १०।१३७।२

(द्वौ इमौ वातौ) हे दोन वायु आहेत, एक (वात सिंधो आ) वायु हृदयापर्यंत जातो व दुसरा तेथून (परावत आ) बाहेर जातो (अन्य ते दक्ष आवातु) एक वायु तुला बळ देवो व (अन्य, यत् रप परा वातु) दुसरा सर्व दोषाला दूर करो

श्वास व उच्छ्वास हे दोन वायु आहेत. आत जाणारा तो श्वास होय व तो बळ देणारा आहे व बाहेर जाणारा तो उच्छ्वास आहे व तो दोष नाहीसे करणारा आहे यामुळेच दोष नाहीसे होण्याचे व बळ वाढल्याचे प्राणी जिवंत राहतो व वाढतो. 1

> आ वात वाहि भेषजं वि वात वाहि यद्रप ।
> त्वं हि विश्वभेषजो देवानां दूत ईयसे ॥ अ० ४।१३।३
>
> ऋ० १०।१३७।३

हे वायो ! (भेषजं आवाहि) सर्व औषधे येथे आण. हे वायो ! (यत् रप. विवाहि) सर्व दोषांना दूर घेऊन जा (त्व हि) तूच (विश्व-भेषजः) सर्व औषधीरूपी आहेस. तू (देवानां दूतः) देवांचा दूत (ईयसे) होऊन चालतोस.

शुद्ध वायु हा सर्व औषधींचे माहेरच आहे म्हणून शुद्ध वायु सेवन केल्याने सर्व औषधींचे सेवन केल्याप्रमाणे होते शुद्ध वायुच्या सेवनाने सर्व दोष दूर होतात म्हणून शुद्ध वायु हा देवांचा दूत होय. शुद्ध वायुच्या सेवनाने प्राय सर्व रोग नाहीसे होऊन आरोग्य प्राप्त होते शुद्ध

वायु हा जीवनाचा मूळ आधार होय. वैदिक प्राणविद्येचें तत्व जाणून प्रत्येकानें शक्य तितकें शुद्ध वायूचें सेवन करण्याचा प्रयत्न करावा, कोणत्याही प्रकारें अशुद्ध वायूत व्यवहार करू नयेत व अशा रीतीनें शुद्ध वायूच्या द्वारें आपली जीवनशक्ति वाढवावी

आ त्वा गमं शंतातिभिरथो अरिष्टतातिभि ।
दक्षं ते भद्रमाभार्षं परा यक्ष्मं सुवामि ते ॥
ऋ० १० । १३७ । ४

( त्वा ) तुजजवळ ( शं-तातिभि. ) विस्तृत कल्याणांनीं ( अथो ) व ( अ-रिष्ट-तातिभि ) अविनाशी शक्तींनीं ( आ गम ) आलों आहे, ( ते भद्र दक्ष आभार्षं ) तुजसाठीं कल्याणकारक बल आणलें आहे व ( ते यक्ष्म ) तुझा रोग ( परा सुवामि ) मी दूर केला आहे

आजारी मनुष्यास सांगण्याचा हा मानसिक संदेश आहे "मी तुला आता आरोग्य देतों व सर्व दोष नाहींसे करतों, तू आता बलवान व निरोगी होशील," याप्रकारें रोग्याच्या अंत:करणात विश्वास उत्पन्न होण्याची खटपट अशा सूचक वाक्यांनीं केल्यास निरोगी होण्यास फारच सहायता होते

वातस्य नु महिमानं रथस्य रुजन्नेति स्तनयन्नस्य घोषः ।
दिविस्पृग्यात्यरुणानि कृण्वन्नुतो एति पृथिव्या रेणुमस्यन् ॥
ऋ० १० । १६८ । १

( रथस्य ) रमणीय ( वातस्य ) वायूचें ( महिमान ) महत्व ( नु ) निश्चयानें वर्णनीय आहे तो वायु ( रुजन् ) सर्वांना हलवून ( एति ) जात असतो ( अस्य घोष ) त्याचा गर्जना ( स्तनयन् ) मोठ्या जोरानें होत असते. ( दिवि—स्पृग्) आकाशाला स्पर्श करणारा वायु (अरुणानि) विविध प्रकारचा रंग वर्णें आकाशाला ( कृण्वन् ) देत असतो ( उत ) व ( पृथिव्या रेणु अस्यन् ) पृथ्वीवरील धूळ उडवून ( एति ) जात असतो

वायूचें महत्त्व फार मोठें आहे. वायूच्या योगानें आकाशांत नानाप्रकारचे लाल रंग दृग्गोचर होतात, व जेव्हां तो जोरानें वाहूं लागतो तेव्हां आकाशांत धूळही उडते

सं प्रेरते अनु वातस्य विष्ठा ऐनं गच्छन्ति समनं न योषाः।
ताभिः सयुक्सरथं देव ईयतेऽस्य विश्वस्य भुवनस्य राजा॥
ऋ० १० । १६८ । २

( स-मन योषा न ) ज्याप्रकारें ज्याच्यावर मन जातें त्या पुरुषाकडे स्त्री जाते त्या प्रमाणेंच ( विष्ठाः ) विशेष स्थिर पदार्थ देखील ( एनं अनु गच्छन्ति ) या वायूच्या गतीप्रमाणें चालतात व या वायूच्या गतीप्रमाणें ( सं प्रेरते ) हालचाल करतात (अस्य विश्वस्य भुवनस्य) या सर्व जगाचा हा राजा व (देव) व्यवहारसाधक दिव्य पदार्थ (ताभिः) त्या पदार्थांच्या ( सयुक् ) सह ( स-रथ ) एकाच रथानुरूप आणाण्याप्रमाणें ( ईयते ) जातात

हा वायु स्थिर पदार्थांनाही हलवितो व ज्या दिशेकडे हा वाहतो त्या दिशेकडे सर्व पदार्थ झुकतात यावरून काव्यदृष्टीनें असें भासतें की अत्यंत वेगवान असा एकाच रथात वायूबरोबर अन्य पदार्थही आरूढ होत आहेत

अन्तरिक्षे पथिभिरीयमानो न नि विशते कतमच्चनाहः॥
अपां सखा प्रथमजा ऋतावा क्व स्विज्जातःकुत आ बभूव॥
ऋ० १० । १६८ । ३

( अंतरिक्षे पथिभि ईयमान ) आकाशमार्गांनीं भ्रमण करणारा वायु ( कत-मत् चन अहः ) कित्येक दिवसपर्यंत ( न नि विशते ) विश्रांति घेत नाहीं. ( अपां सखा ) उदकांचा मित्र ( प्रथमजाः ) सर्वांच्या अगोदर उत्पन्न झालेला व ( ऋता-वा ) मेघांना आकाशांत भ्रमण करण्यास लावणारा असा (क्वस्वित् जातः) कोठे बरें होतो व (कुतः आबभूव) कोठून कसा येथें प्रकट होतो?

वायु सदा आकाशांत संचार करीत असतो व कधींही विश्रांति घेत

नाहीं. मेघांना उत्पन्न करणारा हा वायु मेघांचा जणूं काय मित्रच आहे. तो एका ठिकाणीं असतां केव्हां केव्हां अन्य ठिकाणींही प्रकट होतो. हा कोठून वरें येत असतो ?

> आत्मा देवानां भुवनस्य गर्भो यथावशं चरति देव एषः।
> घोषा इदस्य शृण्विरे न रूपं तस्मै वाताय हविषा विधेम ॥
> ऋ० १०।१६८।४

( देवानां आत्मा ) इंद्रियांना जीवनरूप, ( भुवनस्य गर्भः ) उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचा केंद्ररूप ( एषः देवः ) असा हा देव (यथावशं चरति) आपल्या इच्छेप्रमाणें संचार करतो. ( अस्य घोषा इत् ) याचा केवळ आवाजच ( शृण्विरे ) ऐकावयास येतो, ( न रूपं ) परंतु याचें रूप मात्र दिसत नाहीं. अशा प्रकारच्या ( तस्मै वाताय ) त्या वायूसाठीं ( हविषा ) हवनद्वारा पवित्रता ( विधेम ) करावी.

वायु सर्व इंद्रियांचा प्राण आहे; सर्व प्राण्यांचा तो आधार आहे. त्याचें रूप दिसत नाहीं; परंतु शब्दावरून त्याचा पत्ता लागतो; हवनद्वारा या वायूला पवित्र करावें.

प्राण शरीरांत आहे व वायु जगांत आहे. शरीरांतील प्राणाचा जगांतील वायूशीं अत्यंत दृढ संबंध आहे. जगांतील व्यापक वायूपासून बल संपादून शरीरांतील प्राण आपलें कार्य करीत असतो. बाह्य वायु दूषित झाला, अथवा भरपूर प्रमाणांत मिळाला नाहीं तर प्राणी मरतो. म्हणून हवनादि साधनांनीं वायूला शुद्ध करावा व त्या शुद्ध वायूपासून बल प्राप्त करून घेऊन आपल्या ठिकाणची प्राणशक्ति वाढवावी हें इष्ट होय, असें या सूक्तांत सांगितलें आहे. याप्रकारें प्राणशक्ति वाढविण्यानें दीर्घायुष्य, आरोग्य व बल प्राप्त होऊन मनुष्य सुखानें या जगांतील आपला जीवनक्रम चालवूं शकतो.

---

# पाठ ५ वा.

## वाक्

वाक् शब्द वाणी या अर्थाचा वाचक आहे. त्याचें उदाहरण—

यद्वाग्वदन्त्यविचेतनानि राष्ट्री देवानां निषसाद मन्द्रा ॥
चतस्र ऊर्जं दुदुहे पयांसि क्व स्विदस्याः परमं जगाम ॥

ऋ० ८।१००।१०

( यत् अविचेतनानि वदन्ती ) जी अप्रत्यक्ष पदार्थांचें वर्णन करणारी ( देवानां राष्ट्री ) देवांना प्रकाशित करणारी व ( मन्द्रा ) आनंद देणारी ( वाक् निषसाद ) अशी वाणी प्राप्त होते, ती ( चतस्र ऊर्जं पयांसि दुदुहे ) चारी दिशांना अन्न व दूध देणारी होते. ( अस्याः परमं क्व स्वित् जगाम ) या वाणीचें परम स्थान कोठें बरें आहे ?

वाणी अप्रत्यक्ष पदार्थांचेंही वर्णन करते, अग्नि आदिकरून देवांचें वर्णन करते व मनुष्यांना सर्व प्रकारचीं सुखसाधनें देते. प्रत्येक ठिकाणीं हिच्या-मुळेंच सुखसाधनें प्राप्त झालीं आहेत, तेव्हां हिचें मूळ स्थान कोठें आहे याचा शोध लावणें आवश्यक आहे आत्म्याची प्रेरणा हें हिचें कारण आहे आतां वाक् शब्दाचें दुसरें उदाहरण पहा—

देवीं वाचमजनयन्त देवास्तां विश्वरूपाः पशवो वदन्ति ।
सा नो मन्द्रेषमूर्जं दुहाना धेनुर्वागस्मानुप सुष्टुतैतु ।

ऋ० ८।१००।११

( देवाः देवीं वाचं अजनयन्त ) देवांनीं दिव्य वाणीला उत्पन्न केलें. ( तां विश्वरूपाः पशवः वदन्ति ) त्या वाणीला सर्व आकारवाले पशु बोलतात ( सा मन्द्रा ) ती आनंददायक वाणी ( नः इषं ऊर्जं दुहाना ) आम्हां सर्वांना अन्न व रस देणारी ( धेनुः वाक् ) गायीप्रमाणें असलेली व ( सुष्टुता ) प्रशंसिली जाणारी वाणी ( अस्मान् उपैतु ) आमच्याजवळ येवो.

वाणी ही एक दिव्य शक्ति आहे ती देवापासून उत्पन्न झालेली आहे. पक्षी, मनुष्य इत्यादि सर्वही वाणी बोलत असतात. ही आनंद देणारी वाणी आमच्या सुखसाधनाची वृद्धि करून आमच्या ठिकाणी प्रकट होवो.

## गौ.

गौ शब्द वाचकाला परिचित आहेच हा शब्द गत्यर्थक "गम्" धातू पासून बनलेला आहे. याचें उदाहरण,—

**गौरमीमेदनु वत्सं मिषन्तं मूर्धानं हिङ्ङकृणोन्मातवा उ ।**
**सृक्वाणं घर्ममभिवावशाना मिमाति मायुं पयते पयोभिः ॥**
ऋ० १ । १६४ । २८

( मिषन्त वत्स गौ अनु अमीमेद् ) डोळे उघडून पाहणाऱ्या वत्सासाठीं गाय शब्द करते (मातवै उ मूर्धानं हिङ्ङकृणोत्) प्रेमामुळें त्याच्या मस्तकावर हिंकार शब्द करते ( सृक्वाण घर्मं अभिवावसाना) मुखाच्या रसानें अर्थात् चाटण्यानें लाड करीत ( मायु मिमाति ) प्रेमाचा शब्द काढते व ( पयोभिः पयते ) दुग्धधारांनीं पुष्ट करते.

या मंत्रात गायीचें आपल्या वासरावर जे अपूर्व प्रेम असतें त्याचें काव्यमय वर्णन आहे. या मंत्राचे आलंकारिक रीतीनें दुसरे पुष्कळ अर्थ आहेत, परंतु त्याचा विचार येथें कर्तव्य नाही मेघ व वाणी हे दोन अर्थ अशा मंत्रात विशेष प्रमुख असतात या मंत्रातील कांहीं शब्दांचे विशेष अर्थ पहा

१ मिषन् = डोळे उघडून पाहणारा,

२ मातवै – मान्य करण्यासाठीं, हित करण्याच्या इच्छेनें, प्रेम करण्यासाठीं, शुद्ध करण्यासाठीं, जिव्हेनें चाटून शुद्ध करण्याठीं.

३ सृक्वाणं घर्मं = मुखाची उष्णता, मुखात जी लाळ असते तिनें चाटून व्यक्त होणारें प्रेम, गाय याच प्रेमानें आपल्या वत्साला चाटत असते.

४ मायु = शब्द, आनंदाचा अथवा प्रेमाचा शब्द, प्रिय शब्द.

## अघ्न्या

"अ+घ्न्या" शब्द "अहन्तव्य, अहननीय, हनन करण्यास अयोग्य, अवध्य," इत्यादि अर्थांनीं येतो. हा गाय अशा अर्थी प्रयुक्त असल्यानें गाय अवध्य आहे असा स्पष्ट भाव यांत आहे. उदाहरण–

सूयवसाद्भगवती हि भूया अथो वयं भगवन्तः स्याम ।
अद्धि तृणमघ्न्ये विश्वदानीं पिब शुद्धमुदकमाचरन्ती ॥

ऋ० १ । १६४ । ४०

हे (अघ्न्ये) अवध्य गायी ! (सूयवसात् भगवती हि भूयाः) उत्तम गवत खाणारी भाग्यवान हो. (अथो वयं भगवन्तः स्याम) म्हणजे आम्ही–ही भाग्यवान् बनूं (तृणं अद्धि) गवत खा व (आ चरन्ती) हिंडून फिरून (विश्वदानीं शुद्धं उदकं पिब) नेहमीं शुद्ध पाणी पी.

गायीनें नेहमीं उत्तम गवत खावें, शुद्ध जल प्यावें व तेजस्वी बनावें; म्हणजे तिचें दूध पिऊन मनुष्यही भाग्यवान होईल या मंत्रांतील काहीं शब्दांचे अर्थ आतां पाहूं–

१ सूयवसाद् = (सु+यवस+अद्) उत्तम गवत खाणारी.
२ भगवन्तः = भाग्ययुक्त, आरोग्ययुक्त, शोभायुक्त.
३ विश्व-दानीं = सर्व-दा, सदा.
४ आ-चरन्ती = जाणारी, हिंडणारी, भ्रमण करणारी.

याचें दुसरें उदाहरण पहा.–

हिंकृण्वती वसुपत्नी वसूनां वत्समिच्छन्ती मनसाऽभ्यागात् ॥
दुहामश्विभ्यां पयो अघ्न्येयं सा वर्धतां महते सौभगाय ॥

ऋ० १ । १६४ । २७

(वसूनां वसुपत्नी) वसूंचें पालन करणारी (मनसा वत्सं इच्छन्ती) मनानें वासराची इच्छा करणारी, (हिंकृण्वती अभ्यागात्) हिंकार करीत येते. (इयं अघ्न्या) ही अवध्य गाय (अश्विभ्यां पयः दुहां) अश्विनी-

देवाना दुध देवो सर्वेच ( सा महते सौभगाय वर्धताम् ) ती मोठें ऐश्वर्य देण्यासाठीं वाढो.

*या मंत्रांत गायीचें महत्त्व उत्तम प्रकारें वर्णिलें आहे*

# अश्विनौ

अश्विनीदेव हे द्युलोकचे देव होत हा शब्द नेहमीं द्विवचनी असतो, त्याचें एकवचन किंवा बहुवचन कधींही होत नाहीं या शब्दाची व्युत्पत्ति खालीलप्रमाणें आहे—

१ व्यश्नुवाते सर्वं रसेन अन्यो ज्योतिषाऽन्य:=सर्व व्यापून टाकतात, एक रसानें व दुसरा तेजानें.

२ अश्वै अश्विनौ = अश्वाच्या शक्तीनें युक्त असल्यानें यांना अश्विनी म्हणतात.

अश्विदेव कोण आहेत? अश्विदेव म्हणजे द्यावापृथिवी होत असें काहींचें मत आहे, अहोरात्र असें दुसऱ्या पक्षाचें म्हणणें आहे, सूर्यचंद्र असें निरेक्त मानतात व पुण्य कर्म करणारे राजे असें ऐतिहासिकाचें म्हणणें आहे

याचें उदाहरण पुढीलप्रमाणें,—

प्रातर्युजा वियोधयाश्विनावेह गच्छताम् ।
अस्य सोमस्य पीतये ॥ ऋ० १।२२।१

( प्रात-युजौ अश्विनौ ) प्रात:काळाशीं संबंध ठेवणारे अश्विनीदेव हो! ( वि-बोधय ) विशेष प्रकारें जागृत करा, ( अस्य सोमस्य पीतये ) या सोमपानार्थ ( इह आगच्छतं ) येथें या.

# उषस्

"वश" इच्छा करणें अथवा प्रकाश करणें अशा अर्थाचा धातु आहे, त्यापासून " उस " होऊन त्याच्यापासून " उषा, उषम् " इत्यादि शब्द आले आहेत त्याचें उदाहरण —

उषस्तच्चित्रमा भरास्मभ्यं वाजिनीवति ।
येन तोकं च तनयं च धामहे ॥ ऋ० १ । ९२ । १३

हे ( वाजिनीवति उषः ) बलयुक्त उषे! ( अस्मभ्यं तत् चित्रं आभर ) आम्हां सर्वांना ते इच्छिण्यास योग्य असें धन दे, ( येन तोकं तनयं च धामहे ) ज्याच्या योगानें लहान मुलांचें धारण व पोषण आम्ही करूं.

या मंत्रांतील कांहीं शब्दांचे अर्थः—

१ चित्रं = ( चायनीयं, महनीयं ) चाहण्यास योग्य, इच्छा करण्यास योग्य.

२ वाजिनीवती— बलयुक्त, बलशालिनी.

उष कालचा समय बल वाढविणारा आहे. म्हणून उषःकालापूर्वी उठून उषःकालापासून बल मिळविलें पाहिजे. त्यावेळीं निजणे हें कधींही योग्य नाहीं. जो निजेल त्याला वर सांगितलेली शक्ति मिळणार नाहीं.



## पाठ ६ वा.

वात आ वातु भेषजं शम्भु मयोभुवो हृदे ।
प्र ण आयूंषि तारिषत् ॥

ऋ० १० । १८६ । १

( वातः ) वायु ( भेषजं ) रोगनाशक औषध ( आवातु ) आणो. तो वायु ( शम्भु ) शांति देणारा व ( हृदे ) हृदयाची ( मयोभु ) प्रसन्नता अथवा निरोगीपणा करणारा ( नः ) आमचे सर्वांचे ( आयूंषि ) आयुष्य ( प्र तारिषत् ) दीर्घ करो.

शुद्ध वायु रोग नाहींसा करणारें औषध आहे. तो हृदयाला व मनाला शांति देणारा आहे; त्याच्यापासून आनंद व प्रसन्नता प्राप्त होते.

उत वात पिताऽसि न उत भ्रातोत नः सखा ॥
स नो जीवातवे कृधि ॥ २ ॥




यद्दो वात ते गृहेऽमृतस्य निधिर्हितः ॥
ततो नो देहि जीवसे ॥ ३ ॥

ऋ० १० । १८६ । ३

हे वायो ! तू ( न पिता असि ) आमचा पिता अर्थात् रक्षक आहेस, ( भ्राता ) बंधु आहेस व ( सखा ) मित्र आहेस म्हणून आमच्या दीर्घायुष्याच्या बाबतींत तुझें सहाय दे. हे ( वात ) वायो ! जो तुझ्या ( गृहे ) घरात अमृताचा ( निधि ) खजिना ( हित ) राखून ठेवला आहे, तो ( न ) आमच्या ( जीवसे ) दीर्घायुष्यासाठीं ( देहि ) दे. म्हणजे त्याच्या योगानें आम्हाला दीर्घायुष्याचा उपभोग घेता येईल.

*वायूच्या ठिकाणीं अमृताचा निधि आहे व तें अमृत प्राप्त करून घेण्यास दीर्घायुष्य प्राप्त होतें,* असें या सूक्तांत स्पष्ट सांगितलें आहे. वेदाचा उपदेश इतका सरळ व स्पष्ट आहे कीं त्यात *शंकेला बिलकूल स्थान नाहीं.* शुद्ध वायूचें सेवन करण्यापासून अमृत प्राप्त होतें ही गोष्ट जर प्रत्येक मनुष्यास समजेल तर तो दाट वस्तीच्या व कोंदट हवेच्या घरात कधींही राहणार नाहीं त्यापेक्षां हवाशीर घरांत राहून तो आरोग्यानें दीर्घायुषी बनेल.

हें वायु-सूक्त ऋग्वेदाच्या १० व्या मंडलात आहे. या सूक्ताची देवता 'वायु' असून ऋषि ' उलो वातायन ' हा आहे. वातायन शब्दाचे खिडकी, झरोका, देवडी, चबुतरा, छत, सज्जा, घुमटाकार घर, व्हरांडा इत्यादि अर्थ आहेत. उल शब्दाचा अर्थ खुला, गमन करण्यास योग्य, येणारा जाणारा, गतिमान इत्यादि प्रकारें होऊ शकतो. या दोन्ही शब्दांचे अर्थ जोडून पाहिल्यास " उलो वातायनः " शब्दाचे खुली खिडकी, खुला सज्जा, खुलें छत, इत्यादि प्रकारचे अर्थ होऊ शकतात. हे अर्थ विशेषच बोधप्रद आहेत. वाचकांनीं विचार करून यापासून काय आशय निघतो तें पहावें.

याप्रमाणें या सूक्तात ही गोष्ट स्पष्ट केली आहे कीं खिडकी खुली ठेवण्यानें उत्तम हवा आत येऊन आंत राहणाऱ्या लोकांना अमृताचा निधि प्राप्त

करून देते. म्हणून घराची रचना अशी असली पाहिजे कीं घरामध्यें मोकळी हवा यावी व घरांत राहणाऱ्यांना सुख, आरोग्य व दीर्घायुष्य प्राप्त व्हावें.

प्र विशतं प्राणापानावनड्वाहाविव व्रजम् ।
अयं जरिम्णः शेवधिररिष्ट इह वर्धताम् ॥ ५ ॥
अ० ७।५ ( ५३ )

प्राण व अपान तुम्ही ( प्र विशतं ) आंत असे घुसा कीं ( इव ) जसे ( अनड्वाहौ व्रजं ) बैल गोठ्यांत घुसतात. ( अयं ) हा ( जरिम्णः शेवधिः ) वार्धक्याचा निधि ( अ-रिष्टः ) मध्येंच नष्ट न होतां ( इह ) येथें ( वर्धतां ) वाढो.

प्राणायामानें प्राण व अपान यांचें बळ वाढतें. प्राण व अपान बलिष्ठ होण्यानें दीर्घायुष्य प्राप्त होतें.

अविर्न मेषो नसि वीर्याय प्राणस्य पन्था अमृतो ग्रहाभ्याम् ॥
सरस्वत्युपवाकैर्व्यानं नस्यानि बर्हिर्बदरैर्जजान । य० १९।९०

" ( मेषः न ) मेंढ्याप्रमाणें लढणारा ( अविः ) संरक्षक प्राणवायु पराक्रमासाठीं ( नसि ) नाकामध्यें ठेवलेला आहे. ( ग्रहाभ्यां ) श्वास व उच्छ्वास रूपी दोन मार्गांनीं प्राणाचा अमृतमय मार्ग बनला आहे. ( बदरैः उपवाकैः ) स्थिर स्तुतीच्या द्वारें ( सरस्वती ) प्रवाहमयी सुषुम्ना नाडी ( व्यानं ) सर्व शरीराला व्यापून राहणाऱ्या प्राणाला व ( नस्यानि ) नाकाशीं संबंध असणाऱ्या अन्य प्राणांना ( बर्हिः जजान ) बाहेर प्रकट करते.

आपल्याशीं स्पर्धा करणाऱ्याशीं युद्ध करून त्याचा पराभव करण्याचा मेंढ्याचा स्वभाव आहे. प्राणही हेंच मेंढ्याचें कार्य आपल्या शरीरांत करीत असतो. सर्व व्याधि व शरीराचे सर्व शत्रु यांच्याशीं लढून शरीराचें आरोग्य नेहमीं स्थिर राखण्याचें कार्य करणारा महावीर आपल्या शरीरांत प्राणच आहे. हा रोगांबरोबर मेंढ्याप्रमाणें लढत असतो.

" अवि" शब्दाचा धात्वर्थ "रक्षक" असा आहे जो सर्व प्रकारें रक्षण करतो तो "अवि" होय या शरीराचें रक्षण प्राणद्वारा होतें म्हणून प्राणाचें महत्त्व या जगात अत्यंत आहे. मनुष्याचें स्वास्थ्य, आरोग्य, बल, आयुष्य, उत्साह इत्यादि सर्व प्राणावरच अवलंबून असतात. म्हणून प्रत्ये कानें आपल्या ठिकाणची प्राणशक्ति वाढवावी व रोगाशी युद्ध करून त्यांचा पराभव करून स्वास्थ्य संपादन करावें व आपलें आयुरारोग्य प्राप्त करून घ्यावें

> असुनीते पुनरस्मासु चक्षुः पुनः प्राणमिह नो धेहि भोगम्।
> ज्योक्पश्येम सूर्यमुच्चरन्तमनुमते मृळया नः स्वस्ति ॥

ऋ० १०।५९।६

" हे असुनीते! येथें आमच्या ठिकाणीं पुन. डोळे, प्राण व भोग यांस तू धारण कर सूर्याचा उदय फार दीर्घकाळपर्यंत आम्हांला पाहता येवो हे अनुमते! आम्हा सर्वांना सुखी कर व आम्हांला स्वास्थ्ययुक्त कर "

"असुनीति" म्हणजे "प्राण धारण करण्याची रीति" जेव्हा माहित होते तेव्हा डोळ्याची शक्ति क्षीण झाली तरी पुन उत्तम दृष्टि प्राप्त करून घेता येते प्राण जाण्याची अवस्था प्राप्त झालेली असली तरी त्याला पुन स्थिर करता येतें व भोग भोगणें अशक्य झालें असलें तरी भोग भोगता येण्याची शक्यता पुनः उत्पन्न होऊ शकते

"असुनीति" अर्थात् प्राण धारण करण्याची रीती जाणल्यानें व तिचें अनुष्ठान करण्यानें प्राणाची शक्ति वाढते श्वास व उच्छ्वास, तसेंच आतील कुंभक व बाह्य कुंभक या सर्वांचा विचार असुनीति अथवा प्राणनीतीच्या शास्त्रात केलेला आहे प्राणाचा संबंध प्रत्येक मनुष्याशीं असल्यानें प्रत्येकानें या असु नीति शास्त्राचे अध्ययन करावें व त्यासंबधीं विचार करावा, तसेंच प्रत्येकानें या शास्त्राचे नियम समजावून घेऊन व त्याप्रमाणें वागून आपल्या प्राणाचें बल निश्चयानें वाढवावें

या मन्त्रात "असु नीति" बरोबर सूर्याचा संबंधही वर्णिलेला आहे. सूर्यापासून ही प्राणशक्ति प्राप्त होते, व दीर्घायुष्यही तोच देतो. सूर्यप्रकाशाला वगळून असुनीतीचें अनुष्ठान करतां येणें शक्य नाहीं. म्हणून प्राण धारण करण्याच्या रीतीचा विचार व अनुष्ठान करणाऱ्यांनीं स्वतःला सूर्य प्रकाशापासून कधींही दूर ठेऊ नये

असुनीते मनो अस्मासु धारय जीवातवे सु प्र तिरा न आयुः ।
रारन्धि नः सूर्यस्य संदृशि घृतेन त्वं तन्वं वर्धयस्व ॥

ऋ० १०।५९।५

हे (असुनीते) प्राणनीते ! (अस्मासु) आमच्या ठिकाणीं (मनः धारय) मन धारण कर व (जीवातवे) दीर्घ जीवनार्थ आयुष्याचा (आयुः सु प्रतिर) अनुकूल बनून उत्तम रीतीनें वाढव आम्हाला सूर्याचें (संदृशि) दर्शन अर्थात् सूर्यप्रकाशात (रारन्धि) आनन्दानें ठेव व घृताच्या भोगानें शरीर वाढव

आयुष्य वाढविण्याची रीत या मन्त्रांत सांगितली आहे पहिली गोष्ट म्हणजे मनाची धारणा होय. मी योगसाधनादि द्वारें खात्रीनें दीर्घायुषी होईन व कोणत्याही कारणासाठीं माझें आयुष्य क्षीण होणार नाहीं, इतकी मनाची धारणा पक्की दृढ झाली पाहिजे

(१) तूप पिऊन शरीर सुदृढ व पुष्ट बनविणें, (२) सूर्यप्रकाशाशीं आपल्या शरीराचा संबंध ठेऊन आरोग्य, दीर्घायुष्य व उत्साह प्राप्त करून घेणें व (३) दीर्घायुष्याची कल्पना मनात स्थिर व दृढ करणें असे असुनीति किंवा प्राणनीतिचे तीन नियम या मन्त्राच्या द्वारं सांगितले आहेत दीर्घायुष्याची इच्छा करणाऱ्या मनुष्यांनीं हे नियम पाळून त्यापासून प्राप्त होणारे लाभ करून घ्यावेत.

प्राण प्राणं त्रायस्वासो असवे मृड ॥
निर्ऋते निर्ऋत्या नः पाशेभ्यो मुञ्च ॥

अथर्व वेद १९।४४५

हे *प्राणा! आमच्या प्राणाचें* ( त्रायस्व ) रक्षण कर. हे ( असो ) *जीवा!* ( शसयें मृड ) आमचें जीवन सुखमय कर. हे ( निर्ऋते ) अनियम ! ( निर्ऋत्याः पाशेभ्यः ) अनियमितपणाच्या पाशांपासून ( मुञ्च ) आमचा बचाव कर.

आपल्या प्राणशक्तीचें रक्षण करणें, आपलें जीवन मंगलमय बनविणें व *निर्ऋतीच्या पाशांतून स्वतःचा बचाव करणें या गोष्टी प्रत्येकानें करणें अवश्य* आहे. " ऋति " शब्दाचे " प्रगति, उन्नति, सन्मार्ग, उत्कर्ष, अभ्युदय, योग्यता, सत्य, सरलमार्ग, संरक्षण, पवित्रता" इत्यादि अनेक अर्थ आहेत. याच्या विरुद्ध जें कांहीं अपवित्र आहे तें "निर्ऋति" या भावानें वेदांमध्यें दाखवलेलें आहे. या निर्ऋतीच्या अर्थात् अनियमाच्या कारणानें सर्वांना दुःख किंवा कष्ट होतात. म्हणून या निर्ऋतीच्या मार्गानें जाणें हें कोणाला-ही योग्य नाहीं.

ऋत अथवा ऋतीच्या नियमांनीं प्राणाचें बल वाढविणें व निर्ऋति अथवा अवनतीचीं कारणें नाहींशीं करणें हा उन्नतीचा साधा व सरळ मार्ग आहे. अज्ञानी मनुष्य अवनतीच्या पाशांत सांपडतो, परंतु ज्ञानी मनुष्य ते पाश तोडून स्वतंत्रपणानें आपली उन्नति करून घेतो.

प्राणपा मे अपानपाश्चक्षुष्पाः श्रोत्रपाश्च मे ।
वाचो मे विश्वभेषजो मनसोऽसि विलायकः ॥
य० २० । ३४

माझे प्राण, अपान, डोळे, कान इत्यादिकांचा तूं संरक्षक आहेस. माझ्या वाणीचे दोष दूर करणारा तसेंच मन शुद्ध व पवित्र करणारा ही तूं आहेस.

धान्यमसि धिनुहि देवान् प्राणाय त्वोदानाय त्वा व्यानाय त्वा ।
दीर्घामनु प्रसितिमायुषे धां ॥ यजुर्वेद १ । २०
प्राणाय मे वर्चोदा वर्चसे पवस्व व्यानाय मे वर्चोदा वर्चसे ।
पवस्वोदानाय मे वर्चोदा वर्चसे पवस्व ॥ यजुर्वेद ७ । २७॥

तूं ( धान्यं ) धान्य आहेस. म्हणून देवांना धन्य कर. प्राण, उदान व व्यान यांच्याकरितां तुला स्वीकार करतों. आयुष्यासाठीं मी दीर्घ मर्यादा धारण करतों. माझे प्राण, व्यान व उदान यांच्या तेजाच्या वाढी-साठीं तूं शुद्ध बन.

---

## पाठ ७ वा.

## सूर्या.

सूर्यप्रभेला सूर्या असें म्हणतात. त्याचें उदाहरण.—

सुकिंशुकं शल्मलिं विश्वरूपं हिरण्यवर्णं सुवृतं सुचक्रम्।
आरोह सूर्ये अमृतस्य लोकं स्योनं पत्ये वहतुं कृणुष्व ॥

ऋ० १० । ८५ । २०

हे ( सूर्ये ) सूर्यप्रभे! ( सुकिंशुकं शल्मलिं ) उत्तम चमकदार निर्मळ, ( विश्वरूपं हिरण्यवर्णं ) नाना प्रकारच्या आकाराचे व सुवर्णकांतीनें युक्त, ( सुवृतं सुचक्रं ) उत्तम प्रकारें आच्छादित व उत्तम चक्रांनीं युक्त ( अमृतस्य लोकं आरोह ) अशा अमृत लोकांवर आरूढ हो व ( वहतुं पत्ये स्योनं कृणुष्व ) हा विवाह पतीला सुखकर कर.

या मंत्रांतील कांहीं शब्दांचे विशेषार्थ पहा:—

१ सुकिंशुकं= ( सु+किंशुकं ) उत्तम पुष्पांनीं शोभित, चमकदार, पुष्पांनें सुशोभित.

२ शल्मलिं= ( शल्+मलि=शत्र+मळ )= मळरहित.

३ विश्वरूपं= अनेक आकारांनीं युक्त, अनेक प्रकारच्या सुंदर सजा-वटींनीं युक्त

४ हिरण्यवर्णा— सुवर्णाच्या वर्णाप्रमाणें वर्ण असणारा

सूर्य आपली कन्या "प्रभा" चंद्राला अर्पण करतो त्यावेळीं प्रभा सुंदर रथावर आरोहण करून पतीच्या घरीं जाते. त्याचें हें आलंकारिक वर्णन या मंत्रांत आहे. या वर्णनाचे मंत्र वैदिक विवाहपद्धतीचें स्वरूप दर्शविणारे आहेत.

## सविता

सविता सूर्याचें नांव आहे, या शब्दाची व्युत्पत्ति पूर्वी सांगितली आहेच आतां पाचें आणखी एक उदाहरण पहाः—

विश्वा रूपाणि प्रति मुञ्चते कविः प्रासावीद्भद्रं द्विपदे चतुष्पदे ।
वि नाकमख्यत्सविता वरेण्योऽनु प्रयाणमुषसो वि राजति ।

ऋ० ५।८१।२

( कविः विश्वा रूपाणि प्रतिमुञ्चते ) कवि संपूर्ण रूपांना व्यक्त करतो ( द्विपदे चतुष्पदे भद्रं प्रासावीत् ) द्विपाद अथवा चतुष्पाद यांचें कल्याण करतो. ( वरेण्यः सविता नाकं अख्यत् ) श्रेष्ठ असा सूर्य सुखाला प्रकाशित करतो. ( उषसः प्रयाणं अनु विराजति ) उषेच्या प्रयाणाच्या वेळीं विशेष प्रकाशतो.

या मंत्रांतील कांहीं शब्दांचें विशेष स्पष्टीकरण—

(१) कवि - कवि, दूरदर्शी, बुद्धिमान् ( क+वि ) क म्हणजे पाणी व वि म्हणजे चालना देणारा अर्थात् मेघांचा चालक. सूर्य हा मेघांचा प्रकाशक आहे म्हणून त्याला हें नांव आहे.

(२) नाक [न+अ+क] = जेथें दुःख नाहीं तें स्थान.

## सूर्य

सूर्य शब्द सुद्धां त्याचाच वाचक आहे. त्याचें उदाहरण.

उदु त्यं जातवेदसं देवं वहन्ति केतवः ।
दृशे विश्वाय सूर्यम् ॥ ऋ० १।५०।१

( त्य ) त्या ( जातवेदस ) ज्ञान देणाऱ्या ( देव सूर्यं ) सूर्य देवाला ( विश्वाय दृशे ) विश्व दृष्टीस पडावें म्हणून ( केतव उद्वहन्ति ) किरणें वर दाखवितात

या देवतेचा आणखी एक मंत्र पहा.—

चित्रं देवानामुदगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः ।
आ प्रा द्यावापृथिवी अन्तरिक्षं सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ॥
ऋ० १। ११५।१

( देवाना चित्रं अनीक उदगात् ) देवांचें हें दर्शनीय तेज उदय पावलें आहे तें मित्र, वरुण, अग्नि इत्यादींचा ( चक्षु ) डोळाच करून देणारें अथवा त्यांना प्रकाशित करणारें आहे ( द्यावापृथिवी अन्तरिक्ष ) द्यावापृथिवी तसेंच अंतरिक्ष या सूर्यानें ( आ प्रा ) परिपूर्ण व्यापलें आहे ( सूर्य जगत तस्थुष आत्मा ) सूर्य हा सर्व स्थावर व जंगम वस्तूंचा आत्मा आहे

## पूषा

पोषण करणाऱ्या देवतेस "पूषा" म्हणतात यांचें उदाहरण—

शुक्रं ते अन्यद्यजतं ते अन्यद्विषुरूपे अहनी द्यौरिवासि ।
विश्वा हि माया अवसि स्वधावो भद्रा ते पूषन्निह रातिरस्तु॥
ऋ० ६। ५८। १

हे ( पूषन् ) पूषा देवा ! ( ते अन्यत् शुक्र ) तुझें एक रूप प्रकाशमान आहे व ( ते अन्यत् यजत ) तुझें दुसरें रूप यज्ञमय आहे किंवा यज्ञापासून जो धूर निघतो त्याच्याप्रमाणें कृष्णवर्ण आहे अर्थात् ( वि-षु रूपे अहनी ) परस्पर विरुद्ध रूपवाले दिवसरात्र-श्वेत रंगाचा दिवस व कृष्णवर्णी रात्र-हीं तुझींच रूपें दिसतात ( द्यौ. इव असि ) द्युलोकाप्रमाणें तू प्रकाशमान आहेस हे (स्व-धा-व ) आपल्या शक्तीनें धारण करणाऱ्या देवा ! ( हि विश्वा माया. अवसि ) तू संपूर्ण कलाकौशल्याचें रक्षण

करतोस. ( ते भद्रा रातिः इह अस्तु ) तुझें कल्याणमय दान आम्हांस येथें प्राप्त होवो.

*या मंत्रांतील कांहीं पदांचा अर्थ—*

१ स्वधावः- स्वधावन् ( स्वधा-वन् ) अन्नवान. ( स्व+धा+वन् ) आपल्या धारणाशक्तीनें युक्त, जल धारण करणारा.

२ माया= अज्ञान, ज्ञान, शिल्प, कुशलता, कारागिरी.

३ भद्राः= भाजनवती+ योग्य, पात्र, यथायोग्य कल्याण करणारी.

४ राति = दान.

## विष्णुः

विष्णु शब्दाची व्युत्पत्ति खालीलप्रमाणें आहे—

१ विष्णुः विषितः भवति = जो व्यापलेला असतो ( ज्यानें व्यापलेलें आहे. )

२ विशति इति विष्णुः = जो प्रविष्ट होतो.

३ व्यश्नोति इति = सर्वत्र व्यापून टाकतो.

सर्वत्र व्यापक असणें, सर्वत्र प्रवेश करणें इत्यादि अर्थ आहेत. त्याचें उदाहरण—

इदं विष्णुर्वि चक्रमे त्रेधा नि दधे पदम् ।
समूळ्हमस्य पांसुरे ॥ ऋ० १।२२।१७

( विष्णुः इदं विचक्रमे ) हा व्यापक देव सर्व ठिकाणीं क्रमण करतो. ( त्रेधा पदं निदधे ) तीन प्रकारें आपलें पाऊल ठेवतो. ( अस्य पांसुरे समूढं ) याचे किरण अंतरिक्षांत गुप्त आहेत.

याचा भावार्थ असा आहे कीं विष्णु देव हा सर्वत्र व्यापक आहे, त्यामुळे तो येथील प्रत्येक वस्तूंत आपला पराक्रम अथवा आपलें सामर्थ्य दाखवितो. जे तत्वज्ञानी लोक आहेत त्यांना या व्यापक देवाचा साक्षात्कार हरएक पदार्थांत होतो. याचें पद तीन ठिकाणीं ठेवलें गेलें आहे; याचा अनुभव

स्थूल, सूक्ष्म व कारण जगताच्या रूपानें येथें येतो. स्थूल जगत् हें प्रत्यक्ष असल्यानें त्यांत मनुष्य हा त्याचा अनुभव घेऊं शकतो. या जगाचें आदि-कारण कांहीं तरी असलेंच पाहिजे, असा तर्क चालवून आदिकारणाच्या ठिकाणीं त्याच्या शक्तीचें अनुमानही करतां येतें; परंतु मधील रजोलोका-तील त्याचें कार्य पाहणें हें मात्र कठीण आहे.

हीच स्थिति सूर्याच्या बाबतींतही दिसून येते. पहा, सूर्य हा द्युलोकांत प्रत्यक्ष आहे व तो आपणांस दिसतो; भूलोकांत त्याचीं किरणें येतात व सर्व पदार्थांवर पडतात व त्या ठिकाणीं तीं किरणें प्रत्यक्ष दिसतात. परंतु मधील अंतराळांत सूर्यकिरण प्रत्यक्ष दिसत नाहींत.

या प्रकारें विचार करून वाचकांनीं अध्यात्मदृष्ट्या किंवा आधिदैविक दृष्टीनें मंत्रांचे अर्थ पहावेत. मंत्रांचा मुख्य सामान्य अर्थ अशा प्रकारें पाह-ण्याची संवय करणें हें वेदज्ञानाच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे.

## शब्दार्थ.

त्यं ( तं ) = त्याला

केतुः = किरण, ज्ञान

दृशे = दर्शनासाठीं

चित्रं = विलक्षण, आश्चर्यकारक.

जगत् = चलन पावणारें, जंगम

तस्थिवान् ( [illegible]स्थुप् ) = स्थिर, स्थावर.

# पाठ ८ वा

मूर्धानमस्य संसीव्याथर्वा हृदयं च यत् ।
मस्तिष्कादूर्ध्वः प्रैरयत् पवमानोऽधि शीर्षतः ॥

अथर्व १० । २ । २६

( अस्य ) याचें (मूर्धानं हृदयं च) डोकें व हृदय ( सं ) एक करून व ( सीव्य) शिवून ( पवमानः) पवित्र (अथर्वा ) स्थितप्रज्ञ योगी ( शीर्षतः अधि) डोक्यावर (मस्तिष्काद्) मेंदूच्या अथवा बुद्धीच्या (परे) पार आपल्या शक्तीला ( प्रैरयत्) प्रेरित करतो. अर्थात् (१ ) मेंदू अथवा बुद्धि व हृदय यांचें ऐक्य करून त्यांची समान उन्नति करणें व (२) पवित्र बनून बुद्धीच्या पलीकडे अर्थात् तर्कशक्तीच्या भूमिकेच्याही पलीकडे उडी मारणें असे दोन महत्त्वपूर्ण उपदेश या मंत्रांत आहेत. हृदय व बुद्धि यांच्या एकीकरणाचा अशा प्रकारचा उपदेश अन्य कोणत्याहि धर्मग्रंथांत सांगित-लेला नाहीं. मेंदूचें कार्य तर्क-वितर्क-कुतर्क करण्याचें आहे. व हृदयाचें काम भक्ति करण्याचें आहे. दोघांच्याही समान उन्नतीनें उन्नति अथवा विषमपणामुळें हानि होते.

या मंत्रांतील "अथर्वा" शब्द स्थितप्रज्ञ योगी अशा अर्थाचा आहे. स्थितप्रज्ञ योगी आपला प्राण मस्तकांत चढवितो व आत्मानंदाचा अनुभव घेतो. ही स्थिति प्राप्त करून घेण्याला देखील हृदय व मेंदू यांची समान उन्नति झाली पाहिजे.

*प्राणाच्या द्वारें मनाची स्थिरता संपादन करण्याचा योगमार्ग या मंत्रांत सांगितला आहे.*

यो वै तां ब्रह्मणो वेदामृतेनावृतां पुरम् ॥
तस्मै ब्रह्म च ब्राह्माश्च चक्षुः प्राणं प्रजां ददुः ॥ २९ ॥

३

न थे तं चक्षुर्जहाति न प्राणो जरसः पुरा ॥
पुरं यो ब्रह्मणो वेद यस्याः पुरुष उच्यते ॥ ३० ॥

अथर्व १० । २

" जो उपासक अक्ष अमृतानें वेष्टित अशा ब्रह्माच्या नगरीला जाणतो, त्याला ब्रह्म व ( ब्राह्माः ) ब्रह्मापासून उत्पन्न झालेल्या इतर देवता चक्षु, प्राण व प्रजा देतात जो ब्रह्माच्या नगरीस जाणतो त्याला डोळे आदीकरून इंद्रियें व प्राण हीं वृद्धावस्था होण्याच्या पूर्वी सोडीत नाहींत.

तद्वा अथर्वणः शिरो देवकोशः समुब्जितः ॥
तत्प्राणो अभि रक्षति शिरो अन्नमथो मनः ॥

अथर्व० १० । २ ।२७

अथर्वाचें जें मस्तक आहे तें ( समुब्जितः देवकोशः ) देवाचा सुरक्षित कोश होय, प्राण त्या शिराचें संरक्षण करत असतो.

अशाप्रकारें प्राणाचें महत्व आहे. प्राणशक्ति स्वाधीन झाली कीं शरीराच्या संपूर्ण शक्ति आधीन होतात, व प्राणशक्तीला स्वाधीन करून घेणाऱ्यास योगानें साध्य होणाऱ्या सर्व सिद्धि प्राप्त होतात.

प्राणाबरोबर मन व मनाबरोबर प्राण संमिश्रित असतो. म्हणून प्राणाचा विचार केल्यानंतर आतां मनाचा विचार करणें अवश्य आहे. मनासंबंधीं ऋग्वेदांतील खालील सूक्त काय सांगतें तें पहा—

यत्ते यमं वैवस्वतं मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥ ऋ० १० । ५८।१

( वैवस्वतं यम ) तेजस्वी, नियमन करणारे ( यत् ते मन ) जें तुझें मन ( दूरकं जगाम ) फार दूर गेलें होतें ( तत् ते ) तें तुझें मन ( इह क्षयाय जीवसे ) येथें निवास करण्यासाठीं आणि जीवनासाठीं ( आवर्तयामसि ) परत आणतों.

यत्ते दिवं यत्पृथिवीं मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥ ऋ० १० । ५८।२

जें तुझें मन द्युलोक व पृथ्वी याच्यावर दूरवर भटकत असतें त्याला येथें निवास करण्यासाठीं आणि जीवनासाठीं परत आणतों

यत्ते भूमिं चतुर्भृष्टिं मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥

ऋ० १० । ५८ । ३

जें तुझें मन (चतु भृष्टिं) चारी दिशाना पृथ्वीवर भटकत राहतें त्याला येथें निवासार्थ व जीवनार्थ परत आणतों.

यत्ते चतस्रः प्रदिशो मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥

ऋ० १० । ५८ । ४

जें तुझें मन चारी उपदिशाना भटकत असतें त्याला येथें निवासार्थ व जीवनार्थ परत आणतों.

यत्ते समुद्रमर्णवं मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥

ऋ० १०।५८।५

जें तुझें मन अत्यत खोल समुद्रात दूरवर भटकत असतें त्याला येथें राहण्यासाठीं व जीवनासाठीं आणतों.

यत्ते मरीची॰ प्रवतो मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥

ऋ० १०।५८।६

जें तुझें मन ( प्रवत मरीची. ) पसरलेल्या किरणामध्ये दूरवर भटकत होत त्याला निवासार्थ व जीवनार्थ येथे परत आणतों

यत्ते अपो यदोषधीर्मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥

ऋ० १० । ५८ ।७

जें तुझें मन ( अप. ) जल व औषधी यांमध्यें दूरवर भटकत असतें त्याला येथें निवासार्थ व जीवनार्थ परत घेऊन येतों.

यत्ते सूर्ये यदुषसं मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥
ऋ० १० । ५८ । ८

जें तुझें मन सूर्य व उषा यांच्याकडे दूरवर गेलें होतें तें येथें निवासार्थ व जीवनार्थ परत आणतों.

यत्ते पर्वतान्बृहतो मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥
ऋ० १० । ५८ । ९

जें तुझें मन मोठमोठ्या पहाडामध्यें दूरवर भटकत होतें तें येथें जीवनार्थ व निवासार्थ परत आणतों.

---

## पाठ ९ वा.

यत्ते विश्वमिदं जगन्मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥
ऋ० १०।५८।१०

जें तुझें मन या सर्व जगांत दूरवर भटकण्यास गेलें होतें त्याला निवास करण्यास व जीवन व्यतीत करण्यास येथें परत आणतों

यत्ते पराः परावतो मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥
ऋ० १०।५८।११

जें तुझें मन ( परावतः परा· ) आम्हाला ज्ञान नसलेल्या ठिकाणीं दूर-दूर भटकत असतें त्याला येथें निवास करण्यास व जीवन व्यतीत करण्यास परत आणतों.

यत्ते भूतं च भव्यं च मनो जगाम दूरकम् ।
तत्त आ वर्तयामसीह क्षयाय जीवसे ॥ ऋ० १०।५८।१२

जें तुझें मन भूतभविष्यादि विषयांत दूरवर भटकत असतें त्याला येथें निवासार्थ व जीवनार्थ परत आणतों.

मनाला एकाग्र करण्यासाठीं कोणत्याना कोणत्या मार्गानें परत आणण्याचा प्रयत्न करणें जरूर असतें, तशा संबंधींची सूचना या सूक्तांत दिलेली वाचकांना दिसून येईल. ज्या वाचकांस आपल्या मनाची एकाग्रता साध्य करून घ्यावयाची असेल त्याला या सूक्तापासून बराच बोध घेतां येईल. मनाची एकाग्रता करण्याच्या वेळीं त्याच्या चंचलतेचें ज्ञान त्याला उत्तम प्रकारें होतें क्षणार्धांत तें दूरवर भटकण्यास जातें. त्याला पुनः त्याच ठिकाणीं आणण्याचा दृढ अभ्यास केल्याखेरीज त्याला वश करण्यास अन्य कोणताही उपाय नाहीं. अभ्यासानें व वैराग्यानें मनाची एकाग्रता होते. अभ्यास याचा अर्थ वारंवार प्रयत्न करणें व वैराग्य याचा अर्थ दुसऱ्या पुष्कळ गोष्टींपासून मन परावृत्त करून एकाच गोष्टीकडे लावणें. याप्रमाणें अभ्यासानें व वैराग्यानें मनाची एकाग्रता झाली असतां मनुष्य अद्भुत सामर्थ्यानें युक्त होतो व तें सामर्थ्य त्याला यावेळीं प्राप्त होतें

यन्मे छिद्रं चक्षुषो हृदयस्य मनसो
वाऽतितृण्णं बृहस्पतिर्मे तद्दधातु ॥
शं नो भवतु भुवनस्य यस्पतिः ॥ यजु० अ० ३६।२

( १ ) ( यत् ) जें ( मे ) माझ्या ( चक्षुषः ) डोळ्याचें, (हृदयस्य) हृदयाचें, ( वा मनसः) अथवा मनाचें ( अतितृण्णं ) अत्यंत फाटलेलें ( छिद्रं ) छिद्र असेल, ( तत् ) त्या ( मे ) माझ्या दोषाला (बृहस्पतिः) ज्ञानाचा स्वामी ( दधातु ) ठीक करो. (यः) जो (भुवनस्य पतिः ) सृष्टीचा स्वामी आहे ( नः ) आम्हां सर्वांना ( शं ) कल्याणकारी ( भवतु) होवो.

( १ ) आमच्या डोळे आदीकरून बाह्य इंद्रियांत, हृदयांत व मनांत जे कांहीं वैगुण्य किंवा जी न्यूनता असेल ती परमेश्वराच्या दयेनें दूर होवो. ( २ ) तसेंच जगदीश आमचें कल्याण करो. प्रत्येक मनुष्यानें आपलें हृदय,

मन व चित्त याची परीक्षा करून त्यांत काय दोष आहेत, कोणतीं छिद्रें अथवा वैगुण्य आहे व त्याची काय अवस्था आहे हें सर्व पहावें यांप्रमाणें दोषाची जाणीव झाली म्हणजे ते दोष काढून टाकावे व हृदय सदा शुद्ध व निर्मळ राखावें, कारण मनुष्याची श्रेष्ठता किंवा नीचता ही हृदयाच्या शुद्धतेवर व अशुद्धतेवर अवलंबून असते. हृदयाची शुद्धता प्राप्त करून घेण्यासाठीं ज्ञानमय सर्वज्ञ परमात्म्याची भक्ति करावयास पाहिजे, परमात्म्याच्या भक्तिखेरीज हृदय शुद्ध करण्यास दुसरा कोणताही उपाय नाहीं जितकी भक्ति अधिक दृढ तितके मन अधिक पवित्र होतें, कारण दयामय परमात्मा हा भक्ताच्या अंतःकरणांत दोष शिल्लक ठेवीत नाहीं व भक्ताला पूर्णपणें निर्दोषी बनवितो जर मनात पापी विचार आले तर ते कसे घालवावेत या संबंधीं खालील मंत्र पहा व त्यापासून बोध घ्या—

परोऽपेहि मनस्पाप किमशस्तानि शंससि
परेहि न त्वा कामये वृक्षां वनानि संचर गृहेषु गोषु मे मनः ।
अथर्व० ६। ४५। १

हे ( मनःपाप ) मनोवीर पापा ! ( परः अपेहि) दूर जा, ( किं ) काय म्हणून तू ( अशस्तानि शंससि) वाईट गोष्टी सांगतोस? ( परेहि ) चल हट ( त्वा न कामये ) तुझी मी इच्छा करीत नाहीं (वृक्षान् वनानि संचर ) वनात व झाडाझुडपात संचार करीत रहा (मे मनः ) माझें मन ( गृहेषु गोषु) घरात व गायी आदिकरून पशूच्या पालनांत आहे.

मनांत पापी विचार आला कीं त्याला तत्काळ काढून टाकला पाहिजे. आपल्या प्रबळ इच्छाशक्तीनें पापी विचार नाहींसे करावेत व त्याचा पगडा आपल्या मनावर कधींही बसू देऊं नये मन शुभ विचारांनीं युक्त करून आपल्या घराच्या उन्नतीस लागावें आपल्या उन्नतीस आपणच कारणीभूत असतों, आपणच आपल्या उन्नतीस आरंभ करावयाचा असतो, तरी दुसऱ्याला दोष न देतां आपली शुद्धता स्वतःच करण्याचा दृढ प्रयत्न करावा. यासंबंधीं खालील मंत्र पहा—

अपेहि मनसस्पतेऽप क्राम परश्चर ।
परो निर्ऋत्या आ चक्ष्व बहुधा जीवतो मनः॥ ऋ० १०।१६४।१

हे ( मनसः पते ) मनाला पतित करणाऱ्या कुविचार ! ( अप इहि ) दूर हो, ( अप क्राम ) दूर निघून जा. ( परः चर ) दूर अंतरावर जा. ( परः निर्ऋत्याः ) दूरच्या विनाशाला ( आचक्ष्व ) पहा. (जीवतः मनः) जिवंत मनुष्याचें मन ( बहु धा ) बहुत सामर्थ्यानें युक्त असतें.

मनांत कुविचार किंवा वाईट गोष्टी येऊं लागतील तर त्यांना लागलीच नाहींसें करणें अवश्य आहे. त्या वाईट विचारांच्या योगानें भविष्यकाळीं होणाऱ्या हानीचा विचार करा व मनाच्या ठिकाणीं अनेक प्रकारच्या शक्ति आहेत याचें स्मरण राखून हलक्या व क्षुद्र विचारांना आपल्या जवळ फिरकूं देऊं नका.

भद्रं वै वरं वृणते भद्रं युञ्जन्ति दक्षिणम् ।
भद्रं वैवस्वते चक्षुर्बहुत्रा जीवतो मनः ॥ ऋ० १०।१६४।२

( वैवस्वते ) तेजस्वी मना ! तूं जो ( वै वरं वृणते ) निश्चयपूर्वक श्रेष्ठ विचार पसंत करतोस तो (भद्र) कल्याणप्रद असतो. जे (दक्षिणं युञ्जन्ति) दक्षतेनें योजना करतात, ते ( भद्रं ) आपलें कल्याण प्राप्त करून घेतात. अशा रीतीनें आपली ( चक्षुः ) दृष्टि कल्याणकारक बनवा ( जीवतः मनः बहुत्रा ) जिवंत मनुष्याचें मन फारच समर्थ असतें.

कल्याणकारक विचार जवळ करावेत, दक्षतेनें सर्व कर्तव्यें करावींत व नेत्रादि इंद्रियांना चांगल्या मार्गानें न्यावें. मनुष्याचें मन अनेक प्रकारच्या गोष्टी धारण करूं शकतें, तेव्हां तो कल्याणप्रद विचार मनांत ठेवील तर कल्याण प्राप्त करून घेईल. म्हणून मनामध्यें कसलेही वाईट विचार आले कीं त्यांचा मनावर व शरीरावर वाईट परिणाम होत असतो. यासाठीं या-संबंधीं अत्यंत सावधगिरी बाळगावी, या रीतीनें मन शुद्ध करून झाल्यावर त्याचें सामर्थ्य वाढविण्याचा प्रयत्न करावयाचा असतो. त्यासंबंधीं खालील मंत्र पहा—

**मनस्त आप्यायतां वाक आप्यायतां प्राणस्त आप्यायतां चक्षुस्त आप्यायतां श्रोत्रं त आप्यायताम् ॥ यजु० ६।१५**

हे मनुष्य! (ते) तुझें (मनः) (आप्यायतां) उन्नत होवो. तुझी वाणी उन्नत होवो, तुझा प्राण उन्नत होवो, तसेंच तुझे कानहीं उन्नत होवोत.

अर्थात् मनुष्यानें आपल्या इंद्रियांच्या शक्तीचा विकास करावा, मनुष्याच्या ठिकाणीं मन, वाणी, प्राण, डोळे, कान इत्यादि शक्ति आहेत त्या सर्वांचा विकास व्हावयास पाहिजे. आपल्या शक्तीचा विकास व उन्नति करावी म्हणूनच मनुष्याचा जन्म आहे.

## शब्दार्थ

दूरकं= दूर
क्षयः= गति, निवास
छिद्रं=छेद, भोंक
अतितृष्णं= अत्यंत फाटलेलें
अद्रास्तं= विघ्न
निर्ऋतिः=आपत्ति, वाईट रीति, दुष्ट व्यवहार.

---

## पाठ १० वा.

**सुश्रुती कर्णौ भद्रश्रुती कर्णौ भद्रं श्लोकं श्रूयासम्। अ० १६।२।४**

माझे कान (सुश्रुतौ) उत्तम उपदेश श्रवण करणारे आहेत, तसेंच ते हितकारक गोष्टी ऐकणारे आहेत. म्हणून मीं (भद्रं श्लोकं) कल्याणकारक व यशदायक अशा विषयासंबंधीं उपदेश (श्रूयासं) ऐकावा.

कानानें असा उपदेश ऐकावा कीं त्या योगानें आपलें सदैव कल्याण व्हावें व आपलें यश वृद्धिंगत व्हावें.

हाच नियम संपूर्ण अन्य अवयवांच्या कर्मांना लागू करावा.

सुश्रुतिश्च मोपश्रुतिश्च मा हासिष्टां सौपर्णं चक्षुरजस्रं ज्योतिः ।
अथर्व० १६ ।२।५

( सुश्रुतिः ) उत्तम गोष्टी ऐकणें व ( उपश्रुतिः ) त्यांचा अंगीकार करणें हे दोन गुण ( मा ) मला ( मा हासिष्टां ) न सोडोत; ( सौपर्णं चक्षुः ) गरुडासमान माझी तीक्ष्ण दृष्टि असो व ( अजस्रं ज्योतिः ) अजस्र तेज माझ्या ठिकाणीं वास करो.

उत्तम उपदेश श्रवण करणें, त्या उपदेशाप्रमाणें आचरण करणें, सूक्ष्म दृष्टि उत्पन्न होणें व तेजस्विता हे चार गुण मनुष्यानें आपल्या ठिकाणीं वाढवावेत.

ऋषीणां प्रस्तरोऽसि नमोऽस्तु दैव्याय प्रस्तराय॥ अथर्व०१६।२।६
तूं ऋषींचा ( प्रस्तरः ) प्रसारक आहेस. तुला ( दैव्याय प्रस्तराय ) दिव्य प्रचारकाला नमस्कार असो.

ऋषींच्या दिव्य ज्ञानाचा प्रचार करणारे ऋषींचे पुत्र असतात. दिव्य ज्ञानाचे जे श्रेष्ठ प्रचारक त्यांचा सत्कार करणें उचित होय.

मूर्धाऽहं रयीणां मूर्धा समानानां भूयासम् ॥ अथर्व० १६।३।१
मी ( रयीणां मूर्धा ) धनाचें शिर व मजबरोबरच्या विद्वानांमध्यें मी शीर्षस्थानीं ( भूयासम् ) व्हावें.

प्रत्येक मनुष्यानें असा प्रयत्न करावा कीं ज्यायोगें त्याची योग्यता विद्वानांमध्येंही श्रेष्ठ होईल.

विद्या व धन यांचे साहचर्य असणें हें दुष्ट आहे. सरस्वती व लक्ष्मी एकत्र नांदूं लागल्या तर मनुष्याची उन्नति होते.

असंतापं मे हृदयमूर्वी गव्यूतिः समुद्रो अस्मि विधर्मणा ॥
अथर्व० १६।३।६

माझें हृदय ( असंतापं ) संतापरहित होवो. ( गव्-यूतिः ) इंद्रियांची गति ( उर्वी ) मोठी असूं दे- ( विधर्मणा ) विविध धर्मनियमांचें पालन करण्यामें मी (सम्-उत्-द्रः) सम्यक रीतीनें उत्कर्षार्थ गति उत्पन्न करणारा

अथवा समुद्राप्रमाण गंभीर व्हावे.

हृदयात शांति असावी इंद्रियांचे व अवयवांचे बल वाढवावे व उन्नति प्राप्त करून घेण्यासाठी सदा प्रयत्न करावा.

नाभिरहं रयीणां नाभिः सपत्नानां भूयासम् ॥

अथर्व० १६।४।१

मी ( रयीणा नाभि ) धनाचे केंद्र व मत्सरोवरींच्या लोकांचा मध्य बिंदु ( भूयास ) बनावें.

आपल्या चारही बाजूस धनधान्य असावे व समान विचाराचे लोक चोहों बाजूस असावेत, तसेच सर्वांचे मी केंद्र बनून रहावें अशी इच्छा प्रत्येक मनुष्याने आपल्या मन करणांत बाळगावी.

स्वासदसि सूषा अमृतो मर्त्येष्वा ॥ अथर्व० १६।४।२

सू ( सु-आसन् ) उत्तम अवस्थेत सुख, ( सूषा ) उत्तम उष काळात युक्त व मत्यप्राण्यामध्ये अमर आहेस.

( १ ) आपली अवस्था उत्तम करावी, ( २ ) प्रात:काळी उठून उष: काळापूर्वी आपले कार्य करण्यास तयार असावें, म्हणजे उत्तम उष:कालवाला बनावें ( ३ ) तसेच मर्त्यप्राण्यामध्ये अमरभाव म्हणजे मनुष्याचे दैवी शक्तीने युक्त असे मन प्रकाशित ठेवावें.

मधुमती स्थ मधुमती वाचमुदेयम् ॥ अथर्व० १६।२।२

हे प्रजाजनहो! तुम्ही ( मधुमती स्थ ) गोड स्वभावाने युक्त व्हा सदा ही ( मधुमती वाच ) गोड भाषण करणें उचित आहे कारण त्यायोगे सर्वत्र अहिंसामय शांति स्थापन होऊन गोडीगुलाबीच्या व्यवहारामुळे सर्व जग आपल्या अंकित होऊ शकते.

वाचकांनी यावमाण वेदमंत्रांचा अर्थ पहावा व त्याच्या अर्थाचे मनन करावें मनन केल्यावर आपोआपच त्यापासून बोधप्रद अर्थाचे स्फुरण अन्तःकरणात होईल.

---

# पाठ ११ वा

*उत्तिष्ठत सं नह्यध्वमुदाराः केतुभिः सह ।*
**सर्पा इतरजना रक्षांस्यमित्राननु धावत॥ १ ॥ अ० ११।१० (१२)**

हे ( उदाराः ) उदार लोक हो! ( उत्तिष्ठत ) उठा व आपआपल्या ( केतुभिः सह ) पताकांसह ( सं नह्यध्वं ) तयार व्हा ( सर्पाः ) सर्प जातींचे वीर, ( इतरजनाः ) व इतर लोक मिळून ( अमित्रान् रक्षांसि) शत्रुरूपी राक्षसांवर ( अनुधावत ) हल्ला चढवा.

ईशां वो वेद राज्यं त्रिषन्धे अरुणैः केतुभिः सह ।
ये अन्तरिक्षे ये दिवि पृथिव्यां ये च मानवाः ।
*त्रिषन्धेस्ते चेतसि दुर्णामान उपासताम्॥२॥अथर्व०११।१०(१२)*

हे ( त्रि-सन्धे ) तीन प्रकारचे शरसंधान करणाऱ्या वीरा! मी (वेद) असें समजतों कीं ( अरुणैः केतुभिः सह ) लाल्या झेंड्यासह युद्ध करणाऱ्या ( ईशां वः) तुम्हां शासकांचेंच वास्तविक ( राज्यं ) हें राज्य आहे. या तुमच्या (पृथिव्याम्) पृथ्वीवरील राज्यांत, अन्तरिक्षामध्यें व द्युलोकामध्यें जे ( दुः+नामानः मानवाः ) वाईट नांवाचे दुष्ट म्हणून जे कोणी लोक असतील *(ते त्रिषन्धेः चेतसि ) ते तीन प्रकारचें शरसंधान करणाऱ्या* वीराच्या मनांत ( उपासतां) राहोत. म्हणजे हे वीर अशा दुष्ट लोकांचें पारिपत्य करोत.

*उत्तिष्ठ त्वं देवजनार्बुदे सेनया सह ॥*
अयं बलिर्व आहुतस्त्रिषन्धेराहुतिः प्रिया॥४॥अथर्व-११।१०(१२)

हे ( देवजन ) देवांसमान असणाऱ्या वीरा! व हे ( अर्बुदे ) शूरा! ( सेनया सह त्वं उत्तिष्ठ ) आपल्या सैन्यासह तूं उठ. ( अयं बलिः वः आहुतः ) हा नजराणा तुमच्यासाठीं ठेवला आहे कारण ( त्रि-सन्धेः ) तीन प्रकारचें शरसंधान करणाऱ्या वीराला ( आहुतिः प्रिया ) नजराणा प्रिय असतो.

मूढा अमित्रा न्यर्बुदे जह्येषां वरंवरम् ।
अनया जहि सेनया ॥२१॥

अथर्व० ११ । १० ( १२

हे ( न्यर्बुदे ) शूरा! ( अमित्रा• मूढा ) शत्रूना मूर्ख बनवा, म्हणजे त्याना घाबरवून सोडा. ( एषां वर वर जहि ) त्यांपैकी मुख्य मुख्य वीराना मारा ( अनया सेनया जहि ) या सैन्यासह शत्रूला मारा

यश्च कवची यश्चाकवचोऽमित्रो यश्चाज्मनि ।
ज्यापाशैः कवचपाशैरज्मनाभिहतः शयाम् ॥ २२ ॥

अथर्व ११।१० ( १२

( य च कवची ) जो कवचधारी व ( य च अकवच ) जो कवच धारी नसेल तसेच ( य च अज्मनि अमित्रः ) जो या युद्धात शत्रु म्हणून आला असेल तो ( ज्यापाशै ) धनुष्याच्या दोरीच्या पाशानीं, ( कवच पाशै ) कवचाच्या पाशानीं ( अज्मना अभिहत ) व हल्ल्यानें मारले जाऊन रणभूमिवर ( शयाम् ) पडो.

ये वर्मिणो येऽवर्माणो अमित्रा ये च वर्मिण ।
सर्वांस्ताँ अर्बुदे हताँछ्वानोऽदन्तु भूम्याम् ॥ २३ ॥

अथर्व ११ । १० ( १२ )

( ये वर्मिण ) जे कवच धारण करणारे व ( ये अवर्माण ) जे कवच न धारण करणारे ( अमित्रा. ) शत्रु आहेत ( ये च वर्मिण, ) जे चिलखत धारण करून आले असतील, हे ( अर्बुदे ) शूरा! ( तान् सर्वान् ) त्या सर्व शत्रूला ( हतान् ) ठार मारल्यावर त्यांना ( भूम्यां ) युद्धभूमीवर ( श्वान अदन्तु ) कुत्रे खाऊन टाकोत

ये रथिनो ये अरथाः असादा ये च सादिन ।
सर्वानदन्तु तान्हतान् गृध्रा. श्येना. पतत्रिणः ॥२४॥

अथर्व• ११।१० ( १२

( ये रथिनः ) जे रथांमध्यें बसून लढणारे, ( ये अरथाः ) जे रथाशिवाय लढणारे, ( असादाः ) जे वाहनांशिवाय असतील व ( ये च सादिनः ) जे वाहनांवर बसून लढणारे असतील, ( तान् सर्वान् हतान् ) त्या सर्व शत्रूंना मारल्यानंतर त्यांना गिधाडें, बहिरीससाणे वगैरे (पतत्रिणः) पक्षी ( अदन्तु ) खावोत.

सहस्रकुणपा शेतामित्री सेना समरे वधानाम्।
विविद्धा ककजाकृता ॥२५॥ अथर्व० ११ । १० ( १२ )

( वधानां समरे ) सर्वसंहार करावयाच्या युद्धामध्ये ( विविद्धा ) शस्त्रांनीं विद्ध झालेली ( ककजाकृता ) व त्रस्त झालेली ( आमित्री सेना ) शत्रूची सेना ( सहस्रकुणपा ) हजारों प्रेतांनीं युक्त होऊन रणभूमीवर (शेता) पडो.

वीरानीं पराक्रम करून शत्रूचा धुव्वा उडवून द्यावा हा या मंत्राचा भावार्थ आहे.

यत्र ब्रह्मविदो यान्ति दीक्षया तपसा सह।
ब्रह्मा मा तत्र नयतु ब्रह्मा ब्रह्म दधातु मे॥ अथर्व० १९।४३।८

(यत्र) जेथें ( ब्रह्मविदः ) ब्रह्मज्ञानी (दीक्षया तपसा सह यान्ति ) दीक्षा घेऊन व तप करून जातात ( तत्र ) तेथें ( मा ब्रह्मा नयतु ) मला ब्रह्मज्ञानी घेऊन जावो तसेंच ( ब्रह्मा ) ज्ञानी ( मे ब्रह्म दधातु) मला ज्ञान देवो.

केतुं कृण्वन्नकेतवे पेशो मर्या अपेशसे।
समुषद्भिरजायथाः॥ ऋ० १।६।३

हे ( मर्याः ) मनुष्य हो ! ( अकेतवे केतुं कृण्वन् ) अज्ञान्याला ज्ञान देत व ( अपेशसे पेशः ) रूपरहिताला रूपवान् बनवीत ( उषद्भिः सं अजायथाः ) उष कालासह तो सूर्य झाला आहे.

सूर्य आल्यानंतर जगाचें ज्ञान होतें व प्रत्येक पदार्थाचें रूप दिसूं लागतें त्याप्रमाणें अन्तःकरणांत ज्ञानसूर्य प्रकट झाला म्हणजे नामरूपात्मक जगतासंबंधीं निश्चित ज्ञान होतें.

उद्यानं ते पुरुष नावयानं जीवातुं ते दक्षतातिं कृणोमि ।
आ हि रोहेममृतं सुखं रथमथ जिर्विर्विदथमा वदासि ॥
अथर्व० ८।१।६

हे (पुरुष) मनुष्या! (ते उद् यानं) तुझी उन्नति होवो (न अवयानं) अधोगति होऊ नये. (ते जीवातुं) तुझ्या जीवनाकरिता (दक्षतातिं कृणोमि) बलाचा विस्तार मी करीत आहें. (इमं सुखं रथ) या सुख देणाऱ्या रथावर (आरोह) चढ व (जिर्विः) स्तुत्य बनून (विदथं आ वदासि) युद्धामध्यें उत्तर देशील म्हणजे विजयी होशील

बोधश्च त्वा प्रतिबोधश्च रक्षतामस्वप्नश्च त्वा नवद्राणश्च रक्षताम्।
गोपायंश्च त्वा जागृविश्च रक्षताम् ॥
अथर्व० ८।१।१३

(बोध प्रतिबोध च) ज्ञान व विज्ञान (त्वा) तुझें (रक्षतां) रक्षण करोत, (अस्वप्न) उत्साह व (अनवद्राण च) स्थिरता हीं तुझें रक्षण करोत (गोपायन्) रक्षण करणारा व (जागृवि) जागता (त्वा रक्षता) तुझें रक्षण करो

संसृष्टं धनमुभयं समाकृतमस्मभ्यं धत्तां वरुणश्च मन्यु ।
भियं दधाना हृदयेषु शत्रवः पराजितासो अप निलयन्ताम् ॥
ऋग्वेद० १०।८४।७

(वरुण मन्यु. च) वरुण व मन्यु म्हणजे उत्साह (संसृष्टं) उत्तम रीतीनें उत्पन्न केलेलें व (समाकृत) उत्तम रीतीनें सुसंस्कृत केलेलें असें (उभयं धनं) दोनही प्रकारचें धन (अस्मभ्यं धत्त) आम्हासाठीं धारण करोत, आम्हाला देवोत (शत्रवः) आमचे शत्रु (हृदयेषु) हृदयामध्यें (भियं दधाना) भय धारण करून (पराजितास) पराजित होऊन (अप नि लयन्तां) पळून जावोत

अंक २४



# संस्कृत-स्वयं-शिक्षक.

( संस्कृत भाषा शिकण्याचा अगदीं सोपा उपाय. )

भाग २४ वा.



लेखक व प्रकाशक
श्रीपाद दामोदर सातवळेकर
स्वाध्याय-मंडल, औंध. (जि० सातारा.)

दुसरी आवृत्ति



शके १८५२, सन १९३१.

मूल्य ८ आने



# संस्कृत स्वयं शिक्षक.

## भाग २४ वा.

## पाठ १ ला.

वेदांमध्यें गूढमंत्र फार आहेत, त्यांचा अर्थ करण्याची रीत देखील फारच गूढ आहे. या गूढ रीतीचा पूर्ण विचार येथें थोड्या अवकाशांत करणें जरी शक्य नाहीं, तथापि त्या गूढतेची थोडीशी कल्पना येण्यासाठीं एक मंत्र येथें घेऊन त्याचा अर्थ करूं, म्हणजे त्यावरून वाचकांना थोडीबहुत कल्पना होऊं शकेल–

चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्यां आविवेश ॥

ऋ० ४।५८।३. यजु० १७।९१

आतां या मंत्राचे भिन्नभिन्न अर्थ पहा:—

( १ ) गोपथ ब्राह्मणांतील अर्थ– ज्याचे चार वेद हीं चार शिंगें आहेत, यज्ञाचीं तीन सवनें हे तीन पाय आहेत, ब्रह्मौदन व प्रवर्ग्य हीं दोन शिरें आहेत, सात छंद हे सात हात आहेत, मंत्र, कल्प व ब्राह्मण या तीन ठिकाणीं जो बांधला गेला आहे, असा अत्यंत बलवान् महान् देव प्राणें अर्थात् यज्ञानें मनुष्यांमध्यें प्रविष्ट व्हावें.

( २ ) यास्काचार्यकृत निरुक्तांतील अर्थ– चार वेद हीं ज्याचीं चार शिंगें आहेत, प्रायणीय व उदयनीय हीं दोन शिरें आहेत, सात छंद हे

सात हात आहेत, मंत्र, ब्राह्मण व कल्प या तीन ठिकाणीं जो बांधला गेला आहे तो महान यज्ञदेव मनुष्यांमध्यें येवो.

( ३ ) महामुनि पतंजलिकृत अर्थ- ( व्याकरण भाष्यामध्यें ) नाम, क्रियापद, उपसर्ग व निपात हीं ज्याचीं चार शिंगें; भूत, भविष्य व वर्तमान तीन काल हे ज्याचे तीन पाय; नित्य व कार्य शब्द हे ज्याचीं दोन शिरें; सात विभक्ति हे ज्याचे सात हात; व जो छाती, कंठ व मस्तक या तीन ठिकाणीं स्पर्श करतो असा महान शब्दरूपी देव मनुष्यां-मध्यें प्रविष्ट होवो.

( ४ ) ऋग्वेदांत सायणाचार्यकृत अर्थ- ( सूर्यविषयक अर्थ ) चार दिशा ह्या ज्याचीं चार शिंगें; प्रात:काल, माध्यान्ह व सायंकाल हे ज्याचे तीन पाय; दिवस रात्र हीं ज्याचीं दोन शिरें; सप्त किरण अथवा सात ऋतु हे ज्याचे सात हात; भूमि, अंतरिक्ष व आकाश या तीन स्थानीं जो बांधला गेला आहे, तो वृष्टि करणारा महान सूर्यदेव मनुष्यांमध्यें नियमन-रूपाने प्रवेश करो.

( ५ ) तैत्तिरीय आरण्यकांत सायणाचार्यकृत अर्थ- प्रणवाच्या अकार, उकार, मकार, व अर्धमात्रा अशीं चार शिंगें आहेत; अध्यात्म व आधिदैवतादि पक्षांत ( १ ) विश्व, ( २ ) तैजस् व ( ३ ) प्राज्ञ अथवा ( १ ) विराट्, ( २ ) हिरण्यगर्भ आणि ( ३ ) अव्याकृत असे तीन पाय आहेत; चित् व अचित् या दोन शक्ति म्हणजे दोन शिरें आहेत; भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यं, या सात व्याहृति सात हाताच्या ठिकाणीं आहेत, विश्व, तैजस व प्राज्ञ या तीन ठिकाणीं अकारादि तीन रूपांच्या द्वारें बांधला गेला आहे; असा हा वृषभ अर्थात् बलवान शब्दरूपी प्रणवानें सांगितला जाणारा महान देव परमेश्वर मनुष्यांमध्यें प्रवेश करो.

( ६ ) यजुर्वेदांत स्वामी दयानंद सरस्वतीकृत अर्थ- यांनी यास्काचार्य व महामुनि पतंजलि या दोघांचाही अर्थ स्वीकारले आहेत.

**( ६ ) ऋग्वेदांत स्वामी दयानंद सरस्वतीकृत अर्थः-** चार वेद ज्याचीं चार शिंगें आहेत, कर्म, उपासना व ज्ञान हे तीन ज्या धर्माचे पाय आहेत, अभ्युदय व निःश्रेयस हीं दोन ज्याचीं शिरें आहेत, सात इंद्रियें हीं ज्याचे सात हात आहेत, श्रद्धा, पुरुषार्थ व योगाभ्यास या तीन्हींशीं जो संबंधित आहे असा सुखाची वृष्टि करणारा धर्मरूपी महान देव मनुष्यामध्यें येवो

सायणाचार्य ऋग्वेदास सांगतात कीं या मंत्राचे ( १ ) अग्नि, (२) सूर्य, (३) आप्, (४) गाय व (५) घृत असे पांच अर्थ समर्थनीय आहेत म्हणत. सूर्यविषयक अर्थ करून अन्य अर्थ कशाच प्रकारें समजून घ्यावेत असी त्यांनीं सूचना दिली आहे, अर्थात् सायणाचार्यांच्या मताप्रमाणें या मंत्राचे वरील पांच देवतांना उद्देशून पांच अर्थ होतात

एकाच मंत्राचे याप्रमाणें भिन्न अर्थ प्राचीन व अर्वाचीन भाष्यकारांनीं दिले आहेत वरती संक्षेपानें अर्थ दिले आहेत, त्यांचा विस्तारपूर्वक पाहण्याची इच्छा असेल त्यांना ते ते वर्णन केलेल्या ठिकाणीं विस्तृत बघतीलच, पण केलेल्या अर्थांमध्यें भिन्नता ही स्पष्टच आहेच कित्येक वेळां तर साधारण वाचकांना कांहीं कोणाचा अर्थ मानावा व कोणाचा मानू नये असा गोंधळहि पडण्याचा संभव आहे

हे वरील अर्थ परस्पर विरोधी आहेत काय? महामुनि पतंजलि, स्कंद भास्कराचार्य यासारखे अन्य आचार्य नाना वेदांच्या अर्थांसंबंधी संदेह होतो कीं काय! किंवा अशा प्रकारचे वरील हे अर्थ समर्थनीय आहेत कीं काय? कीं एकाच मंत्राचे अनेक अर्थ संभवतात? अशा प्रकारें शंका मनांत वाचकांसमोर उभे राहून वाचक गोंधळून जाण्याचा संभव आहे. तर वरील अर्थ एकच मानले, तर त्यांच्यात परस्पर विरोध अवश्य असणारच असा साधारण लोकांची समजूत होते परंतु शास्त्राची दृष्टि अशी नाहीं. भिन्न अर्थ असणें हें कांहीं विरोधाचें चिन्ह नव्हे एकाच मंत्राचे अनेक अर्थ होऊं शकतात,

परंतु देवताभावरून भिन्न अर्थांमुळें लागलीच परस्पर विरोध उत्पन्न होतो असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं.

विरोध कशाला म्हणतात? अर्थांच्या भिन्नतेला विरोध असें म्हणतां येत नाहीं. कारण वेदांच्या पदांची, वाक्यांची व मंत्रांच्या अर्थांची भिन्नता ही त्यांच्या रचनेवरूनच सिद्ध होते. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक अर्थात् वैयक्तिक, राष्ट्रीय व जगाच्या दृष्टीनें कांहीं मंत्रांचे कमीत कमी तीन अर्थ होतात व तसें होणें हें वैदिक रचनेला अनुसरूनच आहे. या विधानाची स्पष्टता करण्यासाठीं कांहीं पदांचे अर्थ खालीं दिले आहेत—

| वैदिक पद; | आध्यात्मिक भाव; | आधिभौतिक भाव; | आधिदैविक भाव |
|---|---|---|---|
| इंद्र | जीवात्मा | राजा, नरेंद्र | परमात्मा, विद्युत् |
| देव | इंद्रिय | विद्वान, शूर व्यापारी व कारागीर. | पृथ्वी, आप, तेज, सूर्य इत्यादि. |
| अग्नि | वाचा | ज्ञानी, उपदेशक | अग्नि, तेज |
| आप् | वीर्य | शांतआत्मा, संन्यासी | जल. |
| वृत्र | वाईट भाव अथवा रोगबीज | वेढा देणारा शत्रु | मेघ वगैरे प्रकाशाला प्रतिबंध करणारे पदार्थ |
| उषा | बोध | जागृति | उष:काल. |
| मित्र | मित्रता | एकता, संघभाव | सूर्य वगैरे. |

सर्व शब्दांचे सर्व अर्थ देण्याचें हें स्थळ नाहीं. परंतु वर जी पदें दिलीं आहेत त्यांचे तीन ठिकाणीं तीन प्रकारचे अर्थ कसे होतात तें वर दिलें आहे. यावरून एका देवतेचा मंत्र तीन ठिकाणीं कमीत कमी तीन अर्थांनीं येऊं शकतो, हें वाचकांना दिसून येईल. शिवाय कांहीं मंत्रांचा एकच अर्थ होऊं शकतो व कांहीं मंत्रांचे अनेक अर्थ होऊं शकतात. म्हणून प्रत्येक मंत्राचा तीन प्रकारें अर्थ सगळीं होतोच असें आमचें म्हणणें नाहीं. परंतु वेदांच्या रचनेला अनुसरून आम्ही एवढें मात्र सांगूं शकतों कीं वर सांगितलेल्या

कारणांस्तव कांहीं मंत्रांचे अनेक अर्थ होणें संभवनीय आहे. उदाहरणार्थ खालील मंत्र पहा—

"इंद्रज्येष्ठा मरुद्गणाः॥" ऋ० १।२३।८

( १ ) आध्यात्मिक अर्थ- ज्यांत जीवात्मा मुख्य आहे असे प्राण.

( २ ) आधिभौतिक अर्थ- ज्यांत राजा मुख्य आहे असा सैनिकांचा समूह.

( ३ ) आधिदैविक अर्थ- ज्यांत विद्युत् मुख्य आहे असा झंझावात.

" मरुतो मृळयंतु नः ॥" ऋ० १।२३।१२

( १ ) प्राण आम्हां सर्वांना सुखी करो= पंचप्राणांनीं सुख होवो.

( २ ) सैनिक आम्हां सर्वांना सुख देवोत=रक्षकांपासून जनतेस सुख वाढो.

( ३ ) वायु आम्हां सर्वांना सुखी करो=वायुपासून सर्वांचें हित होवो.

याप्रमाणें कांहीं कांहीं मंत्रांचे तीन अर्थ हे वैदिक पद्धतीला अनुसरूनच आहेत. बहुधा देवतावाचक प्रत्येक शब्दाचे किंवा देवताविरोधी शत्रूंचीं जीं नांवें आहेत त्या शब्दांचे असा प्रकारें तीन तीन अर्थ होतात. अर्थात् ज्याप्रमाणें इंद्र शब्दाचे तीन अर्थ आहेत, त्याप्रमाणे त्याचा शत्रु जो वृत्र त्याचेंही तीन अर्थ आहेत. इंद्र व वृत्र यांच्यामधील वैर सनातन आहे. कारण इंद्र हा प्रकाशाचा फैलाव करण्याची इच्छा करतो तर वृत्र हा त्या प्रकाशाच्या विकासाला प्रतिबंध करण्याचा प्रयत्न करतो, म्हणून त्यांचें युद्ध सनातन आहे. प्रकाशाचा अर्थही वरील तीन ठिकाणीं भिन्न आहे; जर वाचकांना ह्या वैदिक रीतीचें पूर्ण ज्ञान होईल तर अर्थाची अनेकता असतांही भिन्न भिन्न अर्थांमध्यें त्यांस विरोध भासणार नाहीं. कारण वेद या ग्रंथाची पद्धतीच तशा प्रकारची आहे.जोपर्यंत मूळ सिद्धांतांत प्रकाश व अंधार यांच्या इतका परस्पर विरोध नसेल तोंपर्यंत अनेक अर्थ झाले असतां ही त्यांच्यांत इतका परस्पर विरोध असणार नाहीं. सर्व आचार्यांनीं हीच शास्त्रदृष्टि आतांपर्यंत स्वीकारलेली आहे.

---

# पाठ २ रा.

मतिश्च मे सुमतिश्च मे यज्ञेन कल्पन्ताम् ।

या० य० १८ । ११

( मे मति ) माझी बुद्धि व ( सुमति ) चांगली मति यज्ञानें (कल्पन्तां ) सामर्थ्यवत्ती होवोत. सत्कर्मांनें आपल्या बुद्धीचें व मतीचें संवर्धन करावयाचें असतें. यज्ञानें मति व सुमति या अधिक शक्तिशाली होतात, असा उपदेश या मन्त्रापासून मिळतो. यज्ञाचा अर्थ अत्यंत व्यापक आहे. परंतु यज्ञ शब्दाचा भावार्थ 'प्रशस्ततम कर्म' असा आहे. सर्वांहून श्रेष्ठ व सर्वांना उपयुक्त असें जें कर्म तें प्रशस्ततम कर्म होय. ज्या कर्माच्या योगानें श्रेष्ठांचा सन्मान, सर्वांबरोबर स्नेहभाव, व परोपकार होतात, तें प्रशस्ततम कर्म होय. या प्रकारच्या कर्मांच्या ठिकाणीं म्हणजे प्रशस्ततम कर्मांत आपल्याला समर्पित करण्यानें आपलें मन शक्तिशाली व समर्थ होतें. तात्पर्य एवढेंच कीं प्रत्येकानें आपल्यास अशा प्रकारचीं कर्में करण्यास लावून, एकाग्र मनानें उक्त कर्में करावींत म्हणजे मनाची शक्ति वाढून तो समर्थ होतो. यासंबंधीं खालील मन्त्र पहा—

आकूतिं देवीं सुभगां पुरो दधे चित्तस्य माता सुहवा नो अस्तु ।
यामाशामेमि केवली सा मे अस्तु विदेयमेनां मनसि प्रविष्टाम् ॥

अथर्व० १९ । ४ । २

( सुभगां ) उत्तम भाग्ययुक्त, ( आकूतिं देवीं ) संकल्परूप देवतेला मीं ( पुरः दधे ) समोर धारण करतों. ती चित्ताची माता आहे म्हणून ती ( नः सुहवा ) आम्हाला अत्यंत आदरणीय ( अस्तु ) असो. (या आशां) ज्या दिशेला ( एमि ) मी जाईन ( सा केवली ) ती निर्दोषतायुक्त होऊन ( मे अस्तु ) मला प्राप्त होवो. ही संकल्प देवता ज्या क्षणीं ( मनसि प्रविष्टां ) मनामध्यें प्रवेश करील त्याच क्षणीं ( एनां विदेय ) हिला मीं

जाणण्यास समर्थ व्हावें. सकल्प हा विचाराला म्हणजे चिंतनाच्या शक्तीला प्रेरित करीत असतो. मनात जसा सकल्प येतो तसलाच विचार उत्पन्न होत असतो तो सकल्प ज्या दिशेनें ज्या विषयात कार्य करील त्यामध्यें त्याला तशाच प्रकारची सिद्धि प्राप्त होईल म्हणून ज्यावेळीं मनात सकल्प उत्पन्न होतो त्यावेळींच तो शुभ सकल्प उत्पन्न व्हावा अशी खटपट करावी, म्हणजे शुभ सकल्पाच्या योगानें मनुष्याची उन्नति होईल

यो वः शुष्मो हृदयेष्वन्तराकूतिर्या वो मनसि प्रविष्टा ।
तान्सीवयामि हविषा घृतेन मयि सजाता रमतिर्वो अस्तु ॥

अथर्व० ६।७३।२

आपल्या ( हृदयेषु अंत ) हृदयात जं ( शुष्म. ) बल आहे व जो ( आकूतिः ) सकल्प आपल्या मनात प्रविष्ट होईल त्याला मी ( घृतेन ) घृतानें अर्थात् स्नेहपूर्ण ( हविषा ) यज्ञानें ( सीवयामि ) शिवून एक करतों हे ( सजाता ) सजातीय लोकहो ! ( मयि ) माझ्या ठिकाणीं ( व रमति ) आपण रममाण व्हा.

हृदयाचें बळ व मनाचा सकल्प हीं एकाच कार्याला लावावीं लागतात, म्हणजे त्या योगानें प्रत्येक कार्य उत्तम रीतीनें पूर्ण होतें. याप्रमाणें हृदय व मन यांच्या ठिकाणचा भाव एकत्र होऊन सर्वांच्या अतःकरणात स्नेहपूर्ण भाव वसू लागेल, तर त्या लोकांतील एकजातित्वामुळे, विलक्षण सघशक्ति उत्पन्न होईल. तात्पर्य मनाचे सकल्प शुभ व पवित्र असावेत म्हणजे मनुष्याची उन्नति होतेच होते, इतकेंच नव्हे तर राष्ट्रायत्वाचें अथवा एकजाती यतेचें बळही त्यानें वाढते ज्या राष्ट्रात निरनिराळ्या जातींत नेहमीं कलह सुरू असतात त्या लोकांनीं [redacted] उपदेश सदैव लक्षात ठेवावा जातीजातींतील परस्पर झगडे नाहींसे करण्याचा एकच उपाय आहे व तो उपाय म्हणजे प्रत्येकानें आपल्या मनात शुभ सकल्प धारण करणें हाच होय. अन्य उपायानीं हे झगडे नाहींसे होणें शक्य नाहीं. मनामध्यें शुभसकल्प येण्यास

स्वास्थ्यपिपासूंच्या आवश्यक पथ्याचा विचार करणें भाग आहे. त्यासंबंधीं खालील मंत्र पहा—

> मनसे चेतसे धिय आकूतय उत चित्तये ।
> मत्यै श्रुताय चक्षसे विधेम हविषा वयम् ॥
>
> अथर्व० ६।४१।१

( मनसे ) मनासाठीं, ( चेतसे ) ज्ञानासाठीं, ( धिये ) धारणाशक्तीसाठीं, ( आकूतये ) संकल्पासाठीं व चित्तासाठीं, ( मत्यै ) मतिकरितां, ( श्रुताय ) श्रवणशक्तीप्रीत्यर्थ, ( चक्षसे ) दृष्टीसाठीं, ( वयं ) आम्ही ( हविषा विधेम ) अन्नादिद्वारा उन्नतीचा उपाय करतों. अन्न पदार्थांचें सेवन अशा प्रकारें केलें पाहिजे कीं, ज्यानें मन, ज्ञान, बुद्धि, संकल्प, भक्ति, चित्त, श्रवण, दर्शन इत्यादि इंद्रियें निरोगी, बलवान् व स्वसामर्थ्यानें युक्त अशीं व्हावींत. ज्यानें शक्ति क्षीण होईल असें कोणतेंही पदार्थ करूं नये.

> अश्विना तेजसा चक्षुः प्राणेन सरस्वती वीर्यम् ।
> वाचेन्द्रो बलेनेंद्राय दधुरिन्द्रियम् ॥
>
> यजु० २०।८०॥

"अश्विनीदेव हे तेजाबरोबरच दृष्टि देतात, सरस्वती ही प्राणशक्तीबरोबरच वीर्य देते, इन्द्र ( इन्द्राय ) जीवात्म्याला वाणी व बलयुक्त इंद्रियशक्ति अर्पण करतो." या मंत्रांत सरस्वती जीवनशक्तिबरोबरच वीर्य देते असें सांगितलें आहे. सरस्वती शब्द हा विशेष्या संस्कृतीचा वाचक शब्द आहे. अश्विनी शब्द धन व ऋण शक्तीचे वाचक आहेत. विद्येनें

# पाठ ३ रा.

या पुस्तकांच्या प्रथम पाठांत एक मंत्र घेऊन त्याचे प्राचीन व अर्वाचीन भाष्यकारांनीं केलेले भिन्न भिन्न अर्थ दिले आहेत. त्या अर्थांमध्यें जी भिन्नता आहे ती परस्परविरोधी आहे कीं परस्परविरोधी नाहीं, या गोष्टीचा आतां विचार करूं.

वेदमंत्रांचे जितके अर्थ संभवनीय आहेत तितके सर्व आपल्या भाष्यांत दिले आहेत असें कोणीच भाष्यकार म्हणत नाहीं. कित्येकांनीं कांहीं अर्थ देण्याचा प्रयत्न केला असेल तर कित्येकांनीं तसा प्रयत्न केला नसल्याचाही संभव आहे. कारण, वेदांची अगाधता व गंभीरता अर्थांच्या दृष्टीनेंच आहे व त्यांच्या खोलीचा पार कोणासही लागणें शक्य नाहीं, असेंच सर्व भाष्यकार मानतात. त्यामुळें सर्व भाष्यें हीं संक्षेपानेंच केलीं जातात.

भाष्यकारांची दृष्टी ही भिन्न भिन्न असते, कोणाचीं भाष्यें आध्यात्मिक दृष्टीनें केलेलीं, कोणी आधिभौतिक दृष्टीनें केलेलीं, तर इतर कांहींनीं अन्य दृष्टीनीं केलेलीं आहेत. परंतु त्यावरून असें सिद्ध होत नाहीं कीं, एकानें केलेल्या अर्थाचें खंडन दुसऱ्यानें केलेलें आहे. एक दृष्टि मुख्य मानून अन्य दृष्टींना भाष्यकार गौण मानीत असतात.

वैयक्तिक उन्नतीच्या विचाराच्या वेळीं आध्यात्मिक दृष्टीला प्राधान्य, सामाजिक व राष्ट्रीय उन्नतींच्या विचारप्रसंगीं आधिभौतिक दृष्टीला प्राधान्य, तर जगाच्या उन्नतिच्या प्रसंगीं आधिदैविक दृष्टीला प्राधान्य दिलेलें असतें. वास्तविक पाहतां वरील तीन्ही गोष्टींना त्या त्या परिस्थिति [illegible] महत्त्व असतेंच; परंतु प्रत्येक मंत्रांतील तिन्ही अर्थांची फोड करणें [illegible] कठिण काम असतें, म्हणून एक विशेष दृष्टि राखून त्या दृष्टीनें भाष्यकार हे संक्षेपानें अर्थ करीत असतात. जर ते एकेका मंत्राचे अनंत अर्थ करीत सुटले तर एवढा मोठा ग्रंथ होईल कीं त्याचा अभ्यास करणेंही अशक्य होईल.

वेदमंत्रांचे अनेक अर्थ होण्याचें मूळ कारण वरील विवेचनावरून ध्यानांत येईल. आतां पूर्वोक्त " चत्वारि शृंगा " या मंत्रासंबंधीं थोडेंसें लिहिणें अवश्य आहे. त्याचे कांहीं अर्थ पूर्वी दिले आहेत व कांहीं दिलेले नाहींत; कारण या मंत्राचे आणखी १०।१५ अर्थ होऊं शकतात. श्री० सायणाचार्यांनीं स्पष्ट लिहिलें आहे कीं " या सूक्ताच्या पांच देवता असल्यामुळें प्रत्येक मंत्राचे पांच पांच अर्थ होतात, परंतु येथें एकच अर्थ दिला आहे. बाकीचे अर्थ वाचकांना विचार केला असतां सहज समजून येण्याजोगे आहेत. "

" यद्यपि सूक्तस्याग्निसूर्यादिपंचदेवताकत्वात्
पंचधाऽयं मंत्रो व्याख्येयस्तथापि........
सूर्यस्य प्रकाशकत्वेन तत्परतया व्याख्यायते ।
..... एवं त्वबादिपक्षेऽपि योज्यम् ॥ "

ऋ० सा० भा० ४।५८।३

या सूक्ताच्या अग्नि, सूर्य, आप्, गौ, घृत या पांच देवता असल्यानें हा मंत्र पांच प्रकारानें अर्थ केला जाण्यास योग्य आहे. तथापि येथें सूर्यपर व्याख्या केली जात आहे. याप्रमाणेंच आप् आदि यांसंबंधीं अर्थयोजना करावी.

यावरून भाष्यकारांचा सावधपणा स्पष्टपणें दिसून येतो. अनेक अर्थ मान्य असून व त्या अर्थांचें ज्ञान असूनही विस्तारभयास्तव त्यांनीं मौन स्वीकारलें आहे. वरील मंत्रांतील पांच देवतांसंबंधीं पूर्वीच सांगावयाचें आहे कीं, अग्निसूर्यादि पांच देवतांचे प्रत्येकीं तीन तीन याप्रमाणें पंधरा अर्थ तर निश्चितच आहेत; याशिवाय भिन्न अर्थ परिस्थित्यनुरूप होतील ते निराळेच. भाष्यकार हे उत्तम लेखक असले तरी कोठपर्यंत अर्थ देत राहतील ! तथापि त्यांनीं जे अर्थ दिले आहेत तेच अधिक आहेत, असें आधुनिकांच्या कोत्या दृष्टीच्या लोकांना वाटतें व त्यांच्या अर्थांतील सुसूत्रपणा व सुसंबद्धता ही त्यांना न समजतां काल्पनिक विरोध मात्र त्यांच्या दृष्टीला दिसावा हें मोठें आश्चर्य आहे !!

'चत्वारि शृंगा०' मंत्राच्या पूर्वी दिलेल्या अर्थामध्ये श्री० सायणाचार्यकृत जो अर्थ दिलेला आहे तो आध्यात्मिक दृष्ट्या आहे, परंतु तो जीवात्मपर अथवा परमात्मपर असाही लावतां येतो. आरण्यकांतील विषय देखील अध्यात्मपर असल्यानें सायणाचार्यांनीं जो अर्थ केला आहे तो बरोबरच आहे. आरण्यकांतील शेकडों मंत्र याप्रमाणें अध्यात्मभावाच्या प्रतिपादनार्थ घेतले गेले आहेत. सायणाचार्योक्त अर्थांत प्रणवाचा भाव मुख्य आहे. प्रणवाचा अर्थ " शब्द " असा आहे. हा अर्थ स्वीकारून महामुनी पंतजलींनीं शब्दशास्त्रपर अर्थात् व्याकरणशास्त्रदृष्ट्या अर्थ केला आहे. तोच अर्थ श्री० स्वा० दयानंद सरस्वतींनीं यजुर्वेदांत घेतला आहे. अर्थात् हा अर्थही वरील अर्थाला अनुसरून ठीक आहे. वरील मंत्राची " अग्नि " देवता ही " यज्ञ व ज्ञान " यांची द्योतक आहे. श्री० यास्काचार्यांनीं जो यज्ञपर अर्थ गोपथब्राह्मणांत केला आहे तो अग्नि देवतेचा भाव मनांत आणूनच केला असल्यानें तो चुकीचा आहे असें म्हणतां येणार नाहीं. यज्ञ व ज्ञान या दोहोंच्या मिलाफानेंच सनातन धर्म बनतो. ज्ञानकांड व कर्मकांड रू[illegible] धर्माचा भाव [illegible] श्री० स्वा० दयानंदांनीं ऋग्वेदाचा अर्थ केला, म्हणून तो सर्व [illegible] मानतां येईल? अर्थात् पूर्वी दिलेले सर्व अर्थ [illegible]त्याहून जे अनेक भिन्न अर्थ पूर्वोक्त कथनानुसार होणें संभवनीय असतील ते सर्व " चत्वारि शृंगा० " या मंत्राचे अर्थ परस्पर विरुद्ध अथवा ओढून ताणून आणलेले आहेत असें मानण्याचें कारण नाहीं. आग्रह व दुराग्रह सोडून विचार केल्यास वरील मंत्राचे सर्व अर्थ बरोबर आहेत, असेंच दिसून येईल.

भगवान् पतंजलि आदि सर्व मुनींना वेदांचें ह्रद्गत आमच्याहून अधिक माहीत होतें, ते कधींही अर्थाची ओढाताण करावयाचे नाहींत किंवा विरोधी अर्थही लिहावयाचे नाहींत. त्यांच्या अर्थांवरूनच आम्ही वैदिक अर्थांची शैली जाणली पाहिजे. त्यांच्या भिन्न भिन्न अर्थांमध्यें जी " सूक्ष्म व गुप्त एकता " आहे तीच वैदिक शैलीची द्योतक आहे. [illegible] अथवा

मंडन करण्यापूर्वी प्रत्येकानें ह्या वैदिक शैलीचें ज्ञान करून घेण्याचा प्रयत्न करावा; नंतर खंडन करण्यास त्यांना वाटेल तितका वेळ आहेच; पण आम्हांस खात्री आहे कीं वैदिक शैलीचें ज्ञान झालें कीं खंडन करण्याचा प्रसंगच येणार नाहीं. सध्या जें कांहीं खंडनमंडनपर वाङ्मय होत आहे तें सर्व विकारयुक्त भावनेनेंच लिहिलेलें आहे. वैदिक शैलीचें ज्ञान झाल्यानंतर जर कोठें विरोध दिसून आला तरच खंडनाचा प्रसंग येणार.

आतां वाचक असें विचारतील कीं एकाच मंत्राचे विविध अर्थ हे प्रमाण कसे मानतां येतील? एकाच वाक्याचे विविध अर्थ होणें तरी शक्य आहे काय? याचें उत्तर असें कीं वेदमंत्रांचे मुख्य तीन विभाग आहेत.

(१) पहिल्या विभागांत स्पष्ट अर्थाचे सर्व मंत्र येतात. जसें– "गां मा हिंसीः," गायीची हिंसा करूं नका. (यजु० १३।४२) असा मंत्र आहे. जरी या मंत्रांत "गो" शब्दाचे इंद्रिय, वाणी, गाय, भूमि, इत्यादि अनेक अर्थ आहेत व गो ह्या मुख्य शब्दाचे अनेक अर्थ होत असल्यानें मंत्राचेही अनेक अर्थ होण्याचा संभव आहे, तथापि येथें मंत्राचें सांगणें स्पष्ट आहे, त्यांत कोठेंही शंकेला अवकाश नाहीं. अशा स्पष्ट अर्थांच्या मंत्रांना "अपरोक्षविषयक मंत्र" अ० स्पष्टार्थक मंत्र असें नांव आहे.

(२) दुसऱ्या विभागांतील मंत्रांत गुप्त संकेतानें विशेष गोष्टी सांगि-तलेल्या असतात. मंत्राच्या शब्दांतून स्पष्टपणें कोणताही अर्थ निष्पन्न होत नाहीं, परंतु सर्व अर्थ मंत्रांतील शब्दांत गूढ असतो. अशा मंत्रांना "परोक्ष-विषयक-मंत्र" अ० गुप्त मंत्र म्हणतात. याचें उत्तम उदाहरण "चत्वारि शृंगा०" हा मंत्र होय. याचा अर्थ खालीं दिल्याप्रमाणें—

"चार शिंगें, तीन पाय, दोन शिरें व सात हात याला आहेत. तीन प्रकारांनीं बांधलागेलेला- सिंचन करणारा व शब्द करणारा महान् देव मनुष्यांमध्यें प्रविष्ट होतो."

वरील मंत्राचा हा शब्दशः अर्थ झाला, पण याचरून बोध काय होतो?

कोणाचे हात, कोणाचें डोकें, कोणाचे पाय, कोठें बांधलेला, कशाचे सिंचन करतो, कसला शब्द करतो, हा कोणाहून मोठा आहे व हा मनुष्यांत कसा प्रकारें असतो याचा येथें कांहींच पत्ता लागत नाहीं. याचें इंग्रजी भाषांतर खालीलप्रमाणें केलें जातें—

मि० ग्रिफिथ साहेब याचें भाषान्तर असें करतात-

Four are his horns, three are the feet that bear him, his heads are two, his hands are seven in number. Bound with a triple bond, the Steer roars loudly. The mighty God entered into mortals. (Mr Griphith's Rig veda 4. 58, 3.)

वर दिलेल्या शब्दशः अर्थाप्रमाणेंच या इंग्रजी भाषान्याचा अर्थ आहे. वृषभ शब्दाचा अर्थ यांत Steer (बैल) असा केलेला आहे व त्यासंबंधी मतभेद होण्याचा संभव आहे. परंतु Steer (बैल) शब्दाचा कोणताही अर्थ केला तरी त्यावरून विशेष असा कसलाच बोध होत नाहीं. ज्या मंत्रांत शब्दाच्या अर्थावरून प्रत्यक्ष बोध कांहींच होत नाहीं त्या मंत्रांना 'परोक्षविषयक मंत्र' म्हणतात. अशांना Enigma, riddle, puzzle म्हणजे गूढ कथन, संकेतकथन, असें म्हणतात. सर्व परोक्षविषयक मंत्रांची ही स्थिति आहे. या मंत्रांचें लक्षण असें आहे कीं या मंत्रांच्या शब्दांवरून कोणताही अर्थ आपण होऊन स्पष्टपणें व्यक्त होत नसतो व बाहेरचे अध्याहृत शब्द घेतल्याखेरीज यांचा अर्थ करणें कधींही शक्य नसतें म्हणून याचा विचार विशेष रीतीनें करणें जरूर आहे.

००>>>ссс०

# पाठ ४ था

पुनर्मनः पुनरायुर्म आगन्पुनः प्राणः पुनरात्मा म आगन्
पुनश्चक्षुः पुनः श्रोत्रं म आगन् ।
वैश्वानरोऽदब्धस्तनूपा अग्निर्नः पातु दुरितादवद्यात् ॥
यजु० ४ । १५ ॥

" माझे मन, आयुष्य, प्राण, आत्मा, चक्षु, कर्ण इत्यादि पुनः मला प्राप्त झाले आहेत. ( तनूपाः ) शरीराचा रक्षक, सर्व जनांचें हित करणारा आत्मा पापांपासून आमच्या सर्वांचा बचाव करो. "

निजण्याच्या वेळी मन आदीकरून सर्व इंद्रियें क्षीण झाल्यासारखीं होतीं, व प्राण मात्र जागा होता [illegible] त्याच्या कार्याचें ज्ञानही आम्हांला नव्हतें. त्या सर्व शक्ति काळक्रमाप्रमाणेंच आज पुनः मला प्राप्त झाल्या आहेत. हा आत्म्याच्या शक्तीचा किती आश्चर्यकारक प्रभाव आहे. तीच आत्मशक्ति पापापासून आमचा बचाव करो. ज्याप्रमाणें निद्रेनंतर संपूर्ण इंद्रियें पूर्वीप्रमाणेंच प्राप्त होतात, तशींच महानिद्रेच्या ( मृत्यूच्या ) नंतरही नेत्र, कर्ण वगैरे संपूर्ण शक्ति आपणास पुनः प्राप्त होतात. महानिद्रेच्या म्हणजे मृत्यूच्या पश्चात् पुनः जन्म प्राप्त होऊन संपूर्ण शक्तींनीं युक्त असें शरीर पूर्ववत् मिळतें. याप्रमाणें या मंत्रांत निद्रेच्या वर्णनाबरोबर महानिद्रेच्या नंतर होणाऱ्या स्थितीचें वर्णन संकेतरूपानें केलें आहे. हीच पुनर्जन्माची कल्पना होय.

यज्जाग्रतो दूरमुदैति दैवं तदु सुप्तस्य तथैवैति ।
दूरंगमं ज्योतिषां ज्योतिरेकं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥
यजु० ३४ । १

( यत् ) जें ( जाग्रतः ) जागृतावस्थेंत ( दूरं उदैति ) दूर दूर जातें, व सुप्तावस्थेंतही तसेंच ( एति ) जात असतें, ( तत् ) तें ( दूरंगमं ) दूरवर जाणारें ( ज्योतिषां ज्योतिः ) ज्योतींनाही ज्योतिरूप ( एकं ) असें

(यस्मिन्) ज्या मनाच्या ठिकाणीं ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, तात्पर्य सर्व वेद (रथनाभौ आरा इव) रथाच्या चाकाच्या नाभीच्या ठिकाणीं असणाऱ्या आऱ्याप्रमाणें (प्रतिष्ठिता.) स्थिर झालेले आहेत, सर्व प्रजांचें चित्त (यस्मिन्) ज्याच्या ठिकाणीं (ओत) ओतप्रोत भरलेलें आहे तें माझें मन शुभसंकल्पमय बनो.

मनाच्या आंत संपूर्ण वेद व सर्व शास्त्रें, तसच इतर सर्व ज्ञान ओतप्रोत भरून राहिलें आहे, अर्थात् ज्ञानी मनुष्याच्या मनांत हें सर्व ज्ञान असतें मनाची शक्ति अशी आहे कीं त्याठायीं हें सर्व ज्ञान राहू शकतें. सर्व शहाणे लोक मनानेंच मनन करतात अशा प्रकारचें हें शक्तिशाली मन नेहमीं शुभ विचारानीं युक्त बनो.

सुषारथिरश्वानिव यन्मनुष्यान्नेनीयतेऽभीशुभिर्वाजिन इव ।
हृत्प्रतिष्ठं यदजिरं जविष्ठं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥

यजु० अ० ३४।६

"ज्याप्रमाणें (सु-सारथि) उत्तम सारथी (अश्वान्) घोडे हाकतो त्याप्रमाणें (यत्) जें (मनुष्यान्) मनुष्याच्या इंद्रियरूपी अश्वांना (अभीशुभि) लगामाच्या द्वारें चालवितें, व जें (हृत्प्रतिष्ठ) हृदयांत राहतें, जें (अजिर) अजर व (जविष्ठ) वेगवान आहे तें माझें मन उत्तम शुभसंकल्पानीं युक्त होवो."

रथाचा सारथि ज्याप्रमाणें घोडे चालवितो त्याप्रमाणें हें मन इंद्रियांना चालवित असतें म्हणून मनाच्या ठिकाणीं शुभ संकल्प पाहिजेत, नाहींतर तें इंद्रियांना कोठल्या खड्ड्यांत नेऊन टाकील याचा थांग लागणार नाहीं हृदयांत राहणाऱ्या या मनाच्या गति अनंत आहेत. अशा प्रकारचें शक्तिशाली मन नेहमीं शुभसंकल्पानें युक्त असणें हेंच उचित आहे, वरी या उपदेशाप्रमाणें प्रत्येकानें आपलं मन शुभसंकल्पयुक्त करावं व उन्नति प्राप्त करून घ्यावी एवढीच वाचकांना प्रार्थना आहे

घातल्यास त्याचा आत्मपर अर्थ पुढील प्रमाणें होईल.

" ( जागृतावस्था, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या हीं ज्याचीं ) चार शिंगें आहेत, ( सत्व, रज व तम हे ज्याचे ) तीन पाय आहेत, ( चित् व अचित् हीं ज्याचीं ) दोन शिरें आहेत व (सत्ता, कल्पना, आनंद, महत्व, प्रजनन, तेज व सत्य हे ज्याचे ) सात हात आहेत जो ( स्थूल, सूक्ष्म व कारण या ) तीन शरीरांनीं बांधला गेला आहे, जो ( अभौतिक—आत्मिक बलाचें ) सिंचन करतो, जो ( स्फुरणशब्द ) करतो असा ( हा आत्मा ) महान् देव मनुष्यां-मध्यें प्रविष्ट होतो.

याचें पुनः स्पष्टीकरण.— आत्म्याची शक्ति जागृति, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या या चार अवस्थांतून बाहेर येऊन कार्य करीत असते; ज्याप्रमाणें बैलाची शक्ति शिंगांमधून येऊन कार्य करते; आत्म्याचे पाय सत्व, रज, तम रूपी प्रकृतीच्या ठिकाणीं ठेवलेले आहेत, आत्म्याचे दोन मुख्य भाग आहेत; चित् नांवाचा भाग प्राण्यामध्यें चेतनारूपानें दिसून येतो व अचित् नांवाचा भाग वृक्षादि स्थावर पदार्थांच्या ठिकाणीं दिसून येतो; सत्ता, कल्पना इत्यादि सात शक्तींच्या योगानें आत्मा शरीरांत कार्य करीत असतो; हा आत्मा स्थूल, सूक्ष्म व कारण नांवाच्या तीन शरीरांनीं बद्ध झालेला आहे; तो आत्मिक बळ देतो; हृदयामध्यें स्फुरणरूपी गुप्त शब्दाची प्रेरणा करतो; आत्माच मोठा देव आहे जो सर्व मनुष्यामध्यें येऊन कार्य करतो, अर्थात् स्वतंत्रपणें तो आपले भाव व्यक्त करतो. सामान्य मनुष्यांत आत्मा परतंत्र असल्यासारखा राहतो; त्याची ती परतंत्रता दूर करावी व त्याला त्याचें कार्य करण्यास समर्थ करावें.

हें वरील मंत्राचें तात्पर्य " आत्मिक दृष्टीनें " आहे. याप्रमाणेंच अन्य दृष्टीनेंही अर्थ करावेत. अन्य गणांचा विचार केल्यास अन्य अर्थ वाचकांना आपोआप समजूं लागतील. म्हणून अन्य गणांपासून होणारे सांकेतिक अर्थ समजावे म्हणून अन्य गण खालीं दिले आहेत–

## २ यज्ञ–गण

(१) ब्रह्म, पितृ, भूत, देव, यज्ञ (२) अध्यात्म, अधिभूत, अधिदैव (३) अकर्म व कर्म (४) सप्त होता गण (५) विचार, उच्चार, आचार (६) सुफलता (७) प्रेरणेचा शब्द (८) यज्ञ. (सूचना—यांत भूतयज्ञांत, नरयज्ञ अंतर्भूत आहे.)

## ३ मंत्र–गण

(१) ऋक्, यजुः, साम व अथर्व (२) प्रथम, मध्यम व उच्च स्वर (३) परोक्ष व अपरोक्ष विषय (४) सात छंद (५) उदात्त, अनुदात्त व स्वरित (६) ज्ञान (७) शब्द (८) मंत्र.

## ४ शब्द–गण

(१) नाम, आख्यात, उपसर्ग व निपात (२) भूत, भविष्य व वर्तमान (३) नित्य व कार्य (४) सात विभक्ती (५) छाती, कंठ व शिर (६) ज्ञान (७) वक्तृत्व (८) शब्द.

## ५ सूर्य–गण

(१) चार दिशा (२) प्रभात, माध्यान्ह व सायंकाळ (३) प्रकाश व अंधार (४) सात प्रकारच्या रंगाचे सात किरण (५) पृथिवी, अंतरिक्ष व आकाश (६) प्रकाश (७) गतीचा शब्द (८) सूर्य.

## ६ काल–गण

(१) भूत, भविष्य, वर्तमान, अ-काल (२) उष्णता, वृष्टि, सर्दी (३) आदि व अंत (४) सात ऋतु (५) प्रातःकाल, मध्यंदिन व सायंकाळ (६) आयु (७) प्रेरणेचा शब्द (८) काळ अथवा समय

# ७ धर्म-गण

(१) धर्म, अर्थ, काम, मोक्ष (२) ज्ञान, कर्म, भक्ति (३) अभ्युदय व नि:श्रेयस् (४) श्रद्धा, दया, संतुष्टता, क्रिया, मेधा, तितिक्षा व शांति (५) स्तुति, प्रार्थना व उपासना (६) उत्कर्षाची प्रेरणा करणारा शब्द (७) धर्म

असेच कांही अन्य गण आहेत परंतु ते सर्व देण्याला येथें स्थळ नाहीं. हे गण पूर्वोक्त मंत्रांत ठिकाण्या जागत असवून त्यावासून कसे पूर्ण अर्थ होतात तें वाचकांना दिसून येइल. ज्या वाचकांना वेदाचा अभ्यास करावयाचा असेल त्यांना एवढाच प्रार्थना आहे कीं त्यांनीं ते शब्द लिहून प्रत्येक प्रकारचा अर्थ कागदावर लिहावा. तसेंच पूर्वी आध्यात्मिक अर्थाचें स्पष्टीकरण जसें लिहून दाखविलें आहे त्याप्रमाणें प्रत्येक अर्थाचें स्पष्टीकरण लिहावें, तसेंच अन्य गणाचा समह करून इतर अर्थही लिहावेत. केवळ एकदांच वाचून कार्य होणार नाहीं, वेदाच्या गूढ अर्थाच्या ज्ञानाचें आविष्करण करण्याची रीति याप्रमाणें सोपी करण्याचे प्रयत्न होणें आवश्यक आहे असो.

पूर्वोक्त दिलेल्या गणाचा व जे वेदामध्यें लिहिलेले नाहींत अशा सर्व गणाचा विचार करून, तसच ब्राह्मणप्रधानिक वचनांच्या आतरीय भावाचें अनुसंधान राखून व सर्व भाष्यकारांच्या सर्व अर्थाचें परिशीलन करून मग त्या सर्व गणाचें आविष्करण करतां येण्याचा व त्यांची एकंदर संख्या वगैरे ठरविता येण्याचा संभव आहे. कारण कांहीं ठिकाणीं शतपथादि ब्राह्मणप्रधान हे गण दिले आहेत, कांहीं ठिकाणीं नुसता उल्लेख मात्र आहे जर कधीं काळीं सर्व गणांचें संशोधन करून त्यांचें स्वरूप निश्चित व शुद्ध करता आलें तरच अशा प्रकारच्या कूटमंत्रांचा अर्थ निश्चित रीतिनें करतां येईल.

या सर्व विवेचनावरून वाचकांना दिसून आलेंच असेल कीं अशा प्रकारचे हे कूटमंत्र विशेष ( ढंगीनें ) कुशलतेने बनवलेले आहेत ज्यांना हे कूट प्रश्न समजण्याची पात्रता व बुद्धि नसते व जे अशा प्रकारच्या कूट-

शैलीला अनभिज्ञ असतात तेच लोक वेद हे गांवढळपणाचे द्योतक असें म्हणत असतात. पण त्यांस एकदां ऋषिपरंपरा कळली त्यांस त्यांतील गूढ आशय स्पष्ट होत जातो.

## पाठ ६ वा.

क इदं कस्मा अदात् कामः कामायादात् ।
कामो दाता कामः प्रतिग्रहीता कामः समुद्रमा विवेश ।
कामेन त्वा प्रतिगृह्णामि कामैतत्ते ॥

अथर्व० ३।२९।७॥

( कः ) कोणीं ( इदं ) हें ( कस्मै ) कोणाला ( अदात् ) दिलें आहे? ( कामः कामाय अदात् ) इच्छेनें इच्छेला दिलें आहे. ( कामः दाता ) इच्छा हीच देणारी आहे व इच्छा हीच ( कामः प्रतिग्रहीता ) घेणारी आहे. ( कामः समुद्रं आविवेश ) इच्छा ही या भवसमुद्रांत प्रवेश करते. हे ( काम ) इच्छे! (कामेन त्वा प्रति गृह्णामि) इच्छापूर्वक मीं तुला स्वीकार करतों, कारण ( एतत् ते ) हें सर्व तुझेंच आहे.

इच्छेनेंच सर्व कांहीं केलेलें आहे व तिनेंच सर्व कांहीं करविलें आहे. दाता व याचक हे इच्छेमुळेंच होतात; कोणी समुद्रयात्रा करतात किंवा कोणी दुसऱ्या स्थानीं जातात त्यालाही कारण इच्छाच. याप्रमाणें सर्व सृष्टि कामावर म्हणजे इच्छेवर चाललेली आहे.

कामस्तदग्रे समवर्तत मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।
स काम कामेन बृहता सयोनी रायस्पोषं यजमानाय धेहि ॥

अ० १९।५२।१

( अग्रे ) आरंभीं ( कामः ) इच्छा ( समवर्तत ) होती; कामना होती; तीच मनाचें ( प्रथमं रेतः ) पहिलें वीर्य ( आसीत् ) होय. हे काम! (सः)

सो त्वं ( बृहता कामेन ) मोठ्या इच्छेसहित ( सयोनिः ) एका स्थानीं उत्पन्न झालेल्या ( रायः पोषं ) धनाच्या पुष्टिसाठीं ( यजमानाय ) सत्कर्म करणाऱ्यासाठीं ( धेहि ) स्वत ला धारण कर.

मनाचें पहिलें वीर्य इच्छाशक्ती अर्थात् काम होय. जगाच्या प्रारंभीं ही इच्छाशक्ति होती. या इच्छाशक्तीच्या प्रेरणेनेंच जग उत्पन्न झालें. मनुष्यानें या इच्छाशक्तीला उपयोगांत आणून आपली उन्नति करून घ्यावी.

त्वं काम सहसासि प्रतिष्ठितो विभुर्विभावा सख आ सखीयते।
त्वमुग्रः पृतनासु सासहिः सह ओजो यजमानाय धेहि ॥
अथर्व० १९।५२।२

हे कामा, त्वं ( सहसा ) बलाबरोबर ( प्रतिष्ठितः असि ) प्रतिष्ठित झाला आहेस, हे ( सखे ) मित्रा, त्वं ( सखीयते ) मित्राप्रमाणें आचरण करणाऱ्याला ( विभुः विभावा ) समर्थ व प्रभावशाली आहेस. त्वं ( पृतनासु ) संग्रामांत ( उग्रः ) उग्र ( सासहिः ) विजयी असतोस. म्हणून ( यजमानाय) प्रशस्त कर्म करणाऱ्यांना(सहः ओजः) स्फूर्ति आणि बल दे.

कामांत अर्थात् इच्छाशक्तीच्या ठिकाणीं अत्यंत सामर्थ्य आहे. इच्छाशक्तीनेंच मनुष्य समर्थ,प्रभावी,शूर,उग्र, विजयी व उत्साही बनतो. म्हणून प्रत्येक मनुष्यानें योग्य रीतीनें इच्छाशक्तीचा उपयोग करून वरील गुण आपल्या अंगीं वाढविण्याचा प्रयत्न करावा.

जगाच्या प्रारंभीं परमात्म्याची प्रबळ इच्छाशक्ति स्फुरण पावती झाली. व त्या शक्तीमुळें हें जग निर्माण झालें.मनुष्यामध्यें ईश्वराच्या सन्देची अद्भुत शक्तिशालिनी इच्छाशक्ति आहे. ही इच्छाशक्ती अधिक बलवान केली असतां अशक्य कर्मेंही शक्य व सुगम होतात. म्हणून प्रत्येकानें आपली इच्छाशक्ति प्रबळ बनवून महान पुरुषार्थी व्हावें व आदर्श पुरुष बनावें.

श्रद्धयाग्निः समिध्यते श्रद्धया हूयते हविः ।
श्रद्धां भगस्य मूर्धनि वचसा वेदयामसि ॥ ऋ० १०।१५१।१

( श्रद्धया अग्निः समिध्यते ) श्रद्धाशक्तीनें अग्नि प्रदीप्त केला जातो.

श्रद्धेनेंच हवन सामग्रीनें (हूयते) हवन केलें जातें. (भगस्य मूर्धनि) ऐश्वर्याच्या शिरावरच (वचसा वेदयामसि) आम्ही सर्व श्रद्धेला गौरवयुक्त भाषणानें प्रशंसित करतों.

श्रद्धा असेल तरच मनुष्य कांहीं कर्तव्य करूं शकेल. श्रद्धेशिवाय मनुष्य कांहींही करण्यास योग्य बनत नाहीं. श्रद्धेच्या ठिकाणीं अद्भुत बल आहे. श्रद्धावान् मनुष्य श्रद्धेच्या जोरावर अद्भुत पुरुषार्थ करूं शकतो. म्हणून मन श्रद्धायुक्त बनवावें.

प्रियं श्रद्धे ददतः प्रियं श्रद्धे दिदासतः।
प्रियं भोजेषु यज्वस्विदं म उदितं कृधि ॥ ऋ० १०।१५१।२

हे श्रद्धा देवी! (ददतः प्रियं) श्रद्धेनें दान देणाऱ्याचें कल्याण कर. (दिदासतः) श्रद्धेनें देण्याची इच्छा करणाऱ्याचें प्रिय कर. (भोजेषु यज्वसु) श्रद्धेनें भोग व यज्ञ करणाऱ्यांचें कल्याण कर. (इदं मे) मला (उदितं कृधि) सर्व प्रकारच्या उदयानें पूर्ण कर.

श्रद्धाभक्तीनें पुरुषार्थ, दान व कर्म करणाऱ्यांना यश प्राप्त होतें व त्यांचे सर्व श्रमही सफल होतात.

यथा देवा असुरेषु श्रद्धामुग्रेषु चक्रिरे।
एवं भोजेषु यज्वस्वस्माकमुदितं कृधि ॥ ऋ० १०।१५१।३

(यथा) ज्याप्रमाणें देवांनीं देखील (उग्रेषु असु-रेषु) शूर असु-र अर्थात् प्राण अर्पण करणाऱ्यांच्या ठिकाणीं (श्रद्धां चक्रिरे) श्रद्धा ठेवली होती, त्याप्रमाणें भोग भोगणारे व यज्ञ करणारे जे (अस्माकं उदितं कृधि) आम्हीं सर्व त्या आमचा उदय कर.

विद्वानांनीं वीरांवर व वीरांनीं विद्वानांवर श्रद्धा ठेवावी. शूर क्षत्रिय हे भोगणारे व ज्ञानी हे यज्ञ करणारे असतात. त्यांची परस्परांवर श्रद्धा पाहिजे म्हणजे सर्वांचेंच कल्याण होतें. ब्राह्मण क्षत्रियांचें याप्रमाणें परस्पर संघटन झाल्यास राष्ट्रामध्यें विलक्षण सामर्थ्य उत्पन्न होतें. अर्थात् श्रद्धेनेंच राष्ट्रीय व जातीय उन्नतिही होऊं शकते.

# पाठ ७ वा

## देव शब्दाचा अर्थ

वैदिक भाषेंत 'देव' शब्दाचा अर्थ अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. सर्वांहून व्यापक व सर्वांहून कठीण अशी कल्पना देव शब्दाच्या द्वारें दर्शविली जाते. जोंपर्यंत देव शब्दाचा अर्थ पूर्ण रीतीनें समजत नाहीं तोंपर्यंत वेदांचें पठन पाठन करणें निरुपयोगी इतकेंच नव्हे क्वचित् प्रसंगीं भ्रामक होतें असें समजण्यास हरकत नाहीं. म्हणून देव शब्दाचा थोडासा विचार या पाठांत केला आहे.

"सर्व नामें धातुपासून बनलेलीं आहेत," असें निरुक्तकारांचें एकमतानें म्हणणें आहे व कांहीं व्याकरणकर्तेही या बाबतींत त्यांच्या म्हणण्यास पाठिंबा देतात.

"धातु व प्रत्यय" मिळून संस्कृत भाषेंतील नामें, क्रियापदें, विशेषणें इत्यादि बनत असतात; कांहींना उपसर्ग लागतात व कांहींना लागत नाहींत म्हणून शब्दांचे प्रकार खालीलप्रमाणें समजण्यांत येतात.

शब्द = [ उपसर्ग + धातु + प्रत्यय / लिंग + वचन + विभक्ति ] = शब्दाचा अर्थ

येथें देव शब्दाचा विचार करतांना त्याला उपसर्ग नाहीं. 'दिव्' धातूला 'अ' प्रत्यय लागून देव शब्द बनतो. वचनानें एक, दोन किंवा दोन्हींहून जास्त वस्तूंचा बोध होतो व विभक्तीनें त्या शब्दाचा दुसऱ्या शब्दाशीं संबंध व्यक्त होतो. लिंगाच्या मुळें वैदिक भाषेंतील काय अथवा संस्कृत भाषेंतील काय अर्थामध्यें फारसा फरक पडत नाहीं. असें—

| (पुल्लिंग) | (स्त्रीलिंग) | (नपुंसकलिंग) |
| --- | --- | --- |
| देव। | देवी, देवता | दैवतं |

| | | |
|---|---|---|
| लेखः | पत्रिका | पत्रं |
| मोक्षः | मुक्तिः | कैवल्यं |
| वेदः | श्रुतिः | ज्ञानं |
| दाराः | वनिता | कलत्रं |
| स्तवः | स्तुतिः | स्तोत्रं |

तरी कांहीं ठिकाणीं रूढीच्या योगानें लिंगभेदामुळें अर्थभेद होतात तथापि प्रारंभींच्या अवस्थेंत हा भेदभाव दिसत नाहीं. त्यामुळें वेदांमध्यें परमात्म्याला तिन्ही लिंगी शब्द आहेत. प्रकृत स्थळीं "देव, देवता व दैवतं" या तिन्ही शब्दांनीं एकच अर्थ व्यक्त होतो हीच गोष्ट येथें सांगाव-याची आहे. अन्य शब्दांत अर्थभेद सांगतांही येतो परंतु या देव शब्दापुरता तरी कोणताच अर्थभेद आड येत नाहीं. असो. पूर्वोक्त प्रकाराप्रमाणें देव शब्दाचा खालीलप्रमाणें अर्थ होतो-

$$\text{देवः} = \left[\frac{\text{उपसर्ग} + \text{दिव्} + \text{अ}}{\text{लिंग}+\text{वचन}+\text{विभक्ति}}\right] = \text{देव शब्दाचा अर्थ}$$

गणिताच्या परिभाषेंत देव शब्दाचा याप्रमाणें अर्थ आहे. या शब्दाचा अर्थ निश्चित करण्यासाठीं 'दिव्' धातूचा अर्थ काय होतो तें पाहूं—

'दिव्, धातूचे अर्थ- (१) क्रीडा करणें, मैदानी खेळ खेळणें, (२) विजिगीषा-विजय प्राप्तिची इच्छा करणें; (३) व्यवहार-व्यापार व्यवहार करणें; (४) द्युति-प्रकाशित होणें; (५) स्तुति-प्रशंसा करणें; (६) मोद - आनंदित होणें, (७) मद - संतुष्ट होणें; (८) स्वप्न - उत्तम निद्रा प्राप्त करणें; (९) कांति - प्रीति करणें; (१०) गति - हालचाल करणें; (११) दान - देणें; असे ११ अर्थ आहेत. हेच देव शब्दांत अर्थ आहेत असें समजावें.

अर्थात् ( १ ) मर्दांनी खेळ खेळण्याची प्रवृत्ति, ( २ ) विजयप्राप्तीची इच्छा, ( ३ ) व्यापार व्यवहार उत्तम प्रकारें करण्याचें चातुर्य, ( ४ ) तेजस्वी बनण्याचा स्वभाव, ( ५ ) प्रशंसनीय कर्में करणें व स्तुत्य बनणें, ( ६ ) आनंदवृत्तीत राहणें, ( ७ ) संतुष्टता राखणें, ( ८ ) उत्तम विश्रांति प्राप्त करून घेणें, ( ९ ) प्रेम करणें, ( १० ) हालचाल करणें, ( ११ ) परोपकार करणें हे देव शब्दाचे धात्वर्थ आहेत

देवाचीं हीं वरील लक्षणें होत. जर कोणास देव बनावयाचें असेल तर त्यानें उक्त गुण आपल्या अंगीं वाढविण्याचा प्रयत्न करावा.

शतपथात सांगितलें आहे कीं—

विद्वांसो हि देवा ॥ शत० ३।७।३।१०

" देव विद्वान आहेत, " ज्ञान प्राप्त करून घेणें हें देवाचें लक्षण आहे

देवतासंबंधीं विचार करतांना मनुष्यांतील ज्या अंतर्गत देवता, तसेंच पृथ्वी, आप, तेज, सूर्य, चंद्र, वायु इत्यादि बाह्य सृष्टींतील जे देव आहेत, त्यांना देव असें सर्वच एक मतानें मानतात, म्हणून यासंबधीं अधिक लिहिण्याची आवश्यकता नाहीं

मनुष्यसमाजांतील देवतागण ब्राह्मणक्षत्रियादि आहेत व बाह्य सृष्टींत अग्नि, वायु, विद्युत्, सूर्य, इत्यादि आहेत ही गोष्ट प्रसिद्ध आहे, आतां व्यक्तीच्या ठिकाणीं कोणकोणते देव आहेत ते पाहू. श्री० सायणाचार्य लिहितात—

( १ ) देवा॰ गमनवन्तो, व्यवहरन्तो वा इन्द्रियसंज्ञकाः ।

ऋ० सायणभाष्य १।१६४।३९

( २ ) देवाः द्योतनाद्देवाश्चक्षुरादीनि इंद्रियाणि ॥

ईशा उ० शांकरभाष्य ॥ मं ४॥ यजु० अ० ४०।४॥

'देव अर्थात् सर्व व्यवहाराचा साधनभूत व प्रकाशक अशीं इंद्रियें' असें सन्मान्य सायणाचार्यांनीं सांगितलें आहे हीं इंद्रियच व्यक्तीच्या आंतील

देव होत. व्यक्तिमध्यें इंद्रियें, समाजांत ज्ञानी मनुष्य व जगामध्यें अग्न्यादि पदार्थ हे देव आहेत ही गोष्ट येथें सिद्ध झाली. आतां यांचीं लक्षणें कशीं सार्थ आहेत तें पाहूं—

(१) व्यक्तींतील देव— इंद्रियांची खेळाकडे प्रवृत्ति असते. इंद्रियांच्या योगानें विजय प्राप्त करून घेतां येतो. शरीराचे सर्व व्यवहार इंद्रियद्वाराच होत असतात; इंद्रियें तेजस्वरूपी आहेत, त्यांची शक्ति प्रशंसनीय आहे; आनंद व संतोष हीं इंद्रियांमुळेंच प्राप्त होतात. इंद्रियांना विश्रांतीची व निद्रेची आवश्यकता असते. इंद्रियद्वाराच प्रेम केलें जातें, सर्व हालचाल इंद्रियांच्या द्वारेंच होते, तसेंच परोपकारही इंद्रियांच्या सहाय्यानेंच करतां येतो.

(२) राष्ट्रांतील देव— ज्ञानी, शूर, व्यापारी व कारागीर हीं राष्ट्रपुरुषाचीं इंद्रियें होत. यांची मर्दानी खेळांकडे प्रवृत्ति असते. यांच्या मुळेंच राष्ट्राला विजय प्राप्त होतो. राष्ट्राचे सर्व व्यवहार यांच्यामुळेंच चालत असतात; तेजस्वी असतात; यांची शक्ति प्रशंसनीय असते. राष्ट्रामध्यें आनंद व सुख प्रस्थापित करण्याला हेंच साधनीभूत असतात. हे गाढ निद्रेचा अनुभव घेऊं शकतात; परस्पर प्रेम व्यवहार करतात व सर्व राष्ट्रीय चळवळ यांच्यामुळेंच होत असते. हे परोपकारी असतात.

(३) जगांतील देव— अग्नि, वायु, विद्युत, सूर्य हे सर्व जगाचा संपूर्ण व्यवहार घडवून आणण्याच्या कामीं सहाय्य करीत असतात. यांच्यामुळेंच मनुष्यादि प्राणी आपआपले व्यवहार करूं शकतात.

याप्रमाणें तीन ठिकाणच्या देवांची स्थिति आहे. आतां एक उदाहरण घेऊन वर केलेले अर्थ सुसंगत आहेत किंवा नाहींत तें पाहूं—

नैनद् देवा आप्नुवन् ॥ यजु० ४०।४

"(देवाः) देव (एनद्) या ब्रह्माला (न आप्नुवन्) प्राप्त करूं शकत नाहींत" असा याचा शब्दशः अर्थ आहे. वरील तीन दृष्टींनीं याचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें होतो- (१) इंद्रियांना ब्रह्माची प्राप्ति होऊं शकत

नाहीं. ( २ ) विद्वान्, शूर, व्यापारी व कारागीर याना ब्रह्मप्राप्ति होत नाहीं ( ३ ) अग्नि, वायु, सूर्य याना ब्रह्मप्राप्ति होत नाहीं. वरील यजुर्वेदातील मन्त्राचा हा सरळ अर्थ आहे. यावर कांहीं विचारतील कीं, या अर्थाला कांहीं प्रमाणें आहेत कीं काय ? त्यांच्याकरितां उपनिषदांत प्रमाणें दिलीं आहेत तीं आता पहा—

( १ ) केनोपनिषदाच्या पहिल्या खंडांत "इंद्रिय द्वारा ब्रह्मज्ञान होत नाहीं व (२) तिसऱ्या खंडात अग्नि व वायूही त्याला जाणू शकत नाहींत, असें सांगितलें आहे. अर्थात् यजुर्वेदांतील उक्त मन्त्राच्या एका तुकड्याची व्याख्या संपूर्ण केनोपनिषद् ही होय ' नैनद्देवा आप्नुवन्'' या मन्त्रातील ' देव'' शब्दाच्या दोन अर्थांचें भाष्य याप्रमाणें केनोपनिषदांत आहे

( २ ) आतां विद्वान् असा जो देव शब्दाचा अर्थ राहिला त्याचा अर्थ छांदोग्य उपनिषद् प्र० ७।१ मध्ये पहावयास मिळतो नारद मुनि भगवान् सनत्कुमाराकडे जाऊन म्हणतात कीं "मी चारी वेद, इतिहास, पुराणें सर्व कांहीं शिकलों, परंतु मला ब्रह्मज्ञान झालें नाहीं '' शब्दांचें ज्ञान झालें परंतु आत्मानुभव मिळाला नाहीं हेंच याचें तात्पर्य होय. मोठमोठे पंडित वेदादि शास्त्रांवर उत्तम शास्त्रार्थ करू शकतात, ब्रह्माचे गुण ही सांगू शकतात, परंतु ती सर्व शब्दांची बडबड होते त्याच्या सर्व व्याख्यांना पोकळपणा असतो म्हणून त्याना स्वतः कांहींच अनुभव नसतो साखरेच्या गोडीचें वर्णन पाठ करणें निराळें व तिच्या गोडीची चव घेणें निराळें त्याच रीत्या वचनाप्रमाणें वेदांमध्यें परमात्म्याचें वर्णन आहे परंतु त्याचा अनुभव मात्र योगाच्या अनुष्ठानानेंच प्राप्त होतो जोंपर्यंत योगसाधन केलें जाणार नाहीं तोंपर्यंत शब्दांच्या वायफळ बडबडीपासून कोणताही लाभ होत नाहीं. म्हणून स्वतः वेदांनींच सांगितलें आहे कीं—

यस्तन्न वेद किमृचा करिष्यति ॥ ऋ०१।१६४।३९.

" जो त्या ब्रह्माला जाणत नाहीं, त्याला मंत्राचा काय उपयोग होणार?''
अर्थात् परमात्म्याचा अनुभव केवळ मंत्राच्या ज्ञानानें होणार नाहीं, मंत्रांचें

ज्ञान हें एक साधन अवश्य आहे; परंतु केवळ मंत्रांचा अर्थ समजणें एवढेंच पुरेसें नाहीं असें सांगण्याचा या मंत्रांचा आशय आहे.

असो. याप्रमाणें देव शब्दाचे तीन अर्थ घेऊन स्वतः उपनिषद्कारांनीं वेदाची व्याख्या केलेली आहे. म्हणून वरील अर्थ बरोबर आहेत. आतां यांचे फलितार्थ पहा—

| वैदिक शब्द | आध्यात्मिक अर्थ व्यक्तींतील देव | आधिभौतिक अर्थ राष्ट्रांतील देव | आधिदैविक अर्थ जगांतील देव. |
|---|---|---|---|
| १ देव | इंद्रियें (पंचज्ञानें-द्रियें, पंच कर्मेंद्रियें) | विद्वान् (ज्ञानी, शूर, व्यापारी, कारागीर) | अग्नि, विद्युत्, वायु, मरुत्, आदि |
| २ देवलोक देवसभा | इंद्रिय स्थान इंद्रियगण, इंद्रिय-ग्राम, मस्तिष्क. | विद्वानांचें स्थान विद्वत्परिषद्, आमं-त्रण, परिषद्, सभा. | अग्नि आदींचें स्थान आकाशातील देवतांचा समूह |
| ३ दिव्य | इंद्रियसंबंधीं | विद्वानांसंबंधीं | अग्नि आदि संबंधीं. |
| ४ स्वर्ग सु-वर्ग (उत्तमवर्ग) | उत्तम इंद्रियांचा वर्ग | उत्तम विद्वानांचा संघ. | अग्नि आदि देवतांचा उत्तम वर्ग |

याप्रकारें उक्त अर्थांचा फलितार्थ आहे. हे अर्थ लक्ष्यांत घेऊन वेदांचा अर्थ करावयास पाहिजे. देवांची सभा जशी शरीरांत आहे तशीच ती राष्ट्रांत व जगांत ही आहे. कोणत्याहि ठिकाणीं देवांच्या राज्यांत राक्षसांचें राज्य होऊं देणें उपयोगी नाहीं. विशेषतः आपलीं इंद्रियें उत्तम संस्कारांनीं सुसंस्कृत बनवावीं व त्यांना खरे देव बनवावें.

ज्या देवता वेदांमध्यें आल्या आहेत त्यांचा तीनही ठिकाणचा अर्थ पाहून नंतर वेदाचा गूढार्थ जाणण्याचा प्रयत्न करावा; तरच वेदाच्या सत्य ज्ञाना-चा प्रकाश अंतःकरणांत पडेल व मानव जातीच्या कल्याणाचा सत्य मार्ग ज्ञात होईल. विद्वान वाचक या दृष्टीनें विचार करतील अशी आशा आहे.

# पाठ ८ वा

**श्रद्धां देवा यजमाना वायुगोपा उपासते ।**
**श्रद्धां हृदय्ययाकूत्या श्रद्धया विन्दते वसु ॥ ऋ० १०।१५१।४**

( देवाः यजमानाः ) दिव्य यजमान ( श्रद्धां ) श्रद्धेप्रत प्राप्त होतात ( वायु-गोपाः ) प्राणानें सुरक्षित होणारे प्राणायामाभ्यासी योगी श्रद्धेनेंच उपासना करितात. (हृदय्यया आकूत्या) हृदयाच्या उच्च भावनेनें ( श्रद्धां) श्रद्धा प्राप्त होते व श्रद्धेनेंच ( वसु विन्दते ) धन प्राप्त होतें.

सर्व लोक श्रद्धेमुळेंच सत्कर्में करूं शकतात. योगी लोक प्राणायामानें आत्मशुद्धि करून श्रद्धेनें उपासना करितात. श्रद्धा ही कांहीं येथं प्राप्त होत नसते, तर ती हृदयाच्या एका विशेष भावनेपासून उत्पन्न होते. श्रद्धेनेंच सर्व पुरुषार्थ सफल व सुफळ होतात. म्हणून आपल्या वैयक्तिक व जातीय उन्नतिसाठीं प्रत्येकानें आपली श्रद्धा वाढवावी.

**श्रद्धां प्रातर्हवामहे श्रद्धां मध्यंदिनं परि ।**
**श्रद्धां सूर्यस्य निम्रुचि श्रद्धे श्रद्धापयेह नः ॥ ऋ० १०।१५१।५**

प्रातःकाळीं श्रद्धेनें कर्म करतों, तसेंच माध्यान्हीं व सूर्याच्या (निम्रुचि) अस्ताच्या वेळीं देखील श्रद्धेनें भक्ति करतों. हे श्रद्धे ! आम्हां सर्वांना तूं श्रद्धायुक्त कर.

श्रद्धा, विश्वास, मनाचा निश्चय व चित्ताची दृढी इत्यादी यांनीं मनुष्य मोठमोठे पुरुषार्थ करीत असतो. श्रद्धेशिवाय मनुष्य कांहीं करूं शकत नाहीं. ज्याप्रमाणें धर्माच्या ठिकाणच्या श्रद्धेनें मनुष्य मोठमोठीं धर्मकृत्यें करीत असतो, त्याचप्रमाणें सर्व अन्य व्यवसाय देखील मनुष्य श्रद्धेनेंच करीत असतो. याप्रमाणें सर्व ठिकाणीं श्रद्धेचा अधिकार चालतो. श्रद्धा ही एक मोठी शक्ति आहे. ही श्रद्धा मनुष्यांमध्यें उत्पन्न होवो व मनुष्य तिच्या द्वारें नेहमीं सत्कार्यें करीत राहो.

मनुष्याच्या ठिकाणीं कितीही शक्ति, बुद्धि तसेंच अन्य प्रकारचें सामर्थ्य असून व एक श्रद्धा जर त्याच्या ठिकाणीं नसली तर त्याचे अन्य सद्गुण हे

आपापलें कार्य उत्तम प्रकारें करण्यास समर्थ होत नाहींत. अर्थात् अश्रद्धेनें अन्य सद्गुणांचें सामर्थ्य कमी होतें व श्रद्धेमुळें आपलें सामर्थ्य वाढत असतें. यासाठीं तुसत्या धार्मिक बाबतींतच नव्हे तर इतर हरएक गोष्टींतही मनुष्यानें श्रद्धेनें कृतकार्य होऊन यश मिळवावें.

म्हणून प्रत्येकानें आपल्या अंतःकरणांत श्रद्धाभक्तीचा विकास होऊं द्यावा. तसेंच जें जें सत्कर्म करावयाचें असेल तें श्रद्धायुक्त होऊन उत्तम प्रकारें करण्याचा अभ्यास करावा. ज्याच्या अंतःकरणांत श्रद्धा नसेल तो तिला प्रयत्नानें आपल्या ठिकाणीं उत्पन्न करूं शकेल.

मेधामहं प्रथमां ब्रह्मण्वतीं ब्रह्मजूतामृषिष्टुताम् ॥
प्रपीतां ब्रह्मचारिभिर्देवानामवसे हुवे ॥२॥ अथर्व० ६।१०८

( अहं ) मी ( प्रथमां ) पहिली, (ब्रह्मण्वतीं) ज्ञानयुक्त, (ब्रह्मजूतां) ज्ञानी लोकांकडून सेवित, ( ऋषिस्तुतां ) ऋषींकडून स्तविली गेलेली, ( ब्रह्मचारिभिः प्रपीतां ) ब्रह्मचाऱ्यांकडून पान केली गेलेली जी ( मेधां ) धारणायुक्त बुद्धि तिला ( देवानां अवसे ) देवांच्या-इंद्रियांच्या व ज्ञानी लोकांच्या-रक्षणार्थ ( हुवे ) प्राप्त करून घेतों.

ज्या प्रकारच्या धारणाबुद्धीची प्रशंसा सब विद्वान लोक करीत असतात, अशा प्रकारची धारणाबुद्धि आपण आपल्या ठिकाणीं वाढवावी. धारणायुक्त बुद्धीलाच मेधा असें नांव आहे. जिच्या योगानें मनांत ज्ञान आदिकरून धारण केलें जातें त्या शक्तीचें नांव मेधा होय. ही मेधाशक्ति जितकी प्रबल होईल तितकी मनुष्याच्या ठिकाणीं बुद्धीची विशालता दिसून येईल म्हणून प्रत्येकानें आपल्या ठिकाणीं धारणाशक्ति वाढवावी.

यां मेधामृभवो विदुर्यां मेधामसुरा विदुः ॥
ऋषयो भद्रां मेधां यां विदुस्तां मय्या वेशयामसि ।३॥ अ० ६।१०८

( यां मेधां ) ज्या मेधाशक्तीला ( ऋभवः विदुः ) ज्ञानी लोक जाणतात, ज्या ( मेधां ) बुद्धीला ( असुराः विदुः ) असुर जाणतात, ( यां भद्रां मेधां ) ज्या कल्याणमय बुद्धीला ऋषि जाणतात ( तां मयि आवेशया-

मरि ) त्या श्रेष्ठ बुद्धीला माझ्या ठिकाणीं स्थापन करतों.

सर्व ज्ञानी लोकांच्या ठिकाणीं ज्या धारणाशक्तीचा अनुभव पहावयास मिळतो ती प्रत्येकानें प्राप्त करून घेतली पाहिजे.

यामृषयो भूतकृतो मेधां मेधाविनो विदुः।
तया मामद्य मेधयाग्ने मेधाविनं कृणु ॥ ४ ॥ अ० ६ । १०८

हे अग्ने ! ( या मेधा ) ज्या मेधाबुद्धीला ( मेधाविनः भूतकृतः ) ज्ञानी व पुरुषार्थी ( विदुः ) जाणते झाले त्या मेधा बुद्धीनें ( मेधाविन मा कृणु ) मला बुद्धिमान कर

ज्ञानी ऋषींची बुद्धि सूक्ष्म विचार करण्यास समर्थ असते त्याप्रमाणें आपली बुद्धि करण्याचा यत्न करावा.

मेधां सायं मेधां प्रातर्मेधां मध्यंदिनं परि ।
मेधां सूर्यस्य रश्मिभिर्वचसा वेशयामहे ॥अथर्व० ६ । १०८ । ५

( साय ) सायंकाळीं, ( प्रात ) प्रात काळीं व ( मध्यंदिनं ) माध्यान्हीं ( सूर्यस्य रश्मिभिः ) सूर्यकिरणें व (वचसा) वाचाशक्ति यांच्याबरोबर ( मेधा ) मेधा नावाच्या धारणावती बुद्धीला आम्ही धारण करतों

मेधाबुद्धीच्या वृद्धयर्थ प्रत्येकानें सकाळीं, दुपारीं, संध्याकाळीं प्रयत्न करावा. दक्षतेनें प्रयत्न केल्यास तिची वृद्धि करता येते.



## पाठ ९ वा

इयं या परमेष्ठिनी वाग्देवी ब्रह्मसंशिता ।
ययैव ससृजे घोरं तयैव शांतिरस्तु नः ॥ अथर्व० १९ । ९ । ३

( या इय ) जी ही ( ब्रह्मसंशिता ) ज्ञानानं तीक्ष्ण बनली आहे,(परमेष्ठिनी वाग्देवी ) जी परमात्म्याशीं संबंध ठेवणारी आहे, (यया)जिच्या योगानें ( घोर ससृजे ) भयंकर प्रसंग उत्पन्न होतात ( तया एव ) त्याच वाणीनें ( न शांति अस्तु ) आम्हाला शांति प्राप्त होवो

८ इदं यत् परमेष्ठिनं मनो वां ब्रह्मसंशितम् ।
येनैव ससृजे घोरं तेनैव शांतिरस्तु नः ॥ अथर्व० १९।९।४

( इदं ) हें जें ( ब्रह्मसंशितं ) ज्ञानानें तीक्ष्ण बनलेलें, (परमेष्ठिनं) परमात्म्याशीं संबंध ठेवणारें ( मनः ) मन आहे व ज्याच्यापासून ( घोरं ) भयंकर परिणाम होतात अशा त्या मनाच्या योगानेंच आम्हांला शांति प्राप्त होवो.

आमच्या ठिकाणीं मन आहे; तें आत्म्याच्या शक्तीनें येथें कार्य करीत असतें. मनाच्या दुरुपयोगानें फारच भयंकर दुष्परिणाम होतात, परंतु तेंच मन जर आपल्या ताब्यांत ठेवतां आलें तर त्या योगानें आपली उन्नति होते. म्हणून मनामध्यें कधींही वाईट विचार आणूं नयेत. मनामध्यें नेहमीं चांगले व पोषक असे विचार आणून श्रेष्ठ बनण्याचा यत्न प्रत्येकानें करावा.



## पाठ १० वा.

इमानि यानि पंचेंद्रियाणि मनःषष्ठानि मे हृदि ब्रह्मणा संशितानि ।
यैरेव ससृजे घोरं तैरेव शांतिरस्तु नः ॥ अथर्व० १९।९।५

हीं ( पंच-इंद्रियाणि ) पांच ज्ञानेंद्रियें ( मनःषष्ठानि च ) व ज्यांत मन सहावें इंद्रिय आहे, ( ब्रह्म-संशितानि ) ज्ञानानें जीं तीक्ष्ण बनून (हृदि) हृदयांत राहतात, ज्यांच्यापासून ( घोरं ) घोर परिणाम देखील होतात, त्यांच्यापासून ही आम्हांला शांति प्राप्त होवो.

मन व इंद्रियें हीं जर बहकलीं तर मनुष्याला किती संकटांत व आपत्तींत टाकतात हें प्रसिद्धच आहे. तींच जर त्याच्या आधीन राहतील तर त्याची चांगलीच उन्नति होते. म्हणून त्यांना स्वाधीन ठेवून व त्यांचा चांगला योग करून शांति प्राप्त करून घ्यावी.

मा मां प्राणो हासीन्मो अपानोऽवहाय परा गात् ।
अथर्व० १६।४।३

प्राण मला ( मा उ हासीत् ) न सोडोत व अपानही मला (अवहाय) सोडून ( मा परागात् ) दूर न जावो. प्राण व अपान हे दोन्हीही माझ्या ठिकाणी चांगले बलवान बनून राहोत

अजैष्माद्यासनामाद्या भूमानागसो वयम् । अथर्व० १६।६।१

( अद्य अजैष्म ) आज आम्ही जिंकून आणलें आहे; आज आम्ही ( असनाम ) धन प्राप्त करून आणलें आहे. ( वयं ) आम्ही ( अनागसः ) पापरहित ( अभूम ) झालों आहोंत.

( १ ) विजय संपादन करणें ( २ ) धनादि भोग प्राप्त करणें व ( ३ ) निष्पाप बनणें या तीन गोष्टी आवश्यक आहेत.

मन आदिकरून संपूर्ण यत्नांची पूर्व उपदेशानुसार वाढ करून घेतल्यास आपला विजय सर्वत्र होईल म्हणून आपल्या सर्वांगांचि उन्नतिसाठीं प्रत्येकानें पुरुषार्थ करावा. यासंबंधीं खालील सूक्त पहा—

वाङ्म आसन्नसोः प्राणश्चक्षुरक्ष्णोः श्रोत्रं कर्णयोः ।

अपलिताः केशा अशोणा दन्ता बहु बाह्वोर्बलम् ॥ १ ॥

ऊर्वोरोजो जङ्घयोर्जवः पादयोः प्रतिष्ठा ।

अरिष्टानि मे सर्वात्मानिभृष्टः ॥ २ ॥

तनूस्तन्वा मे सहे दतः सर्वमायुरशीय ॥

स्योनं मे सीद पुरुः पृणस्व पवमानः स्वर्गे ॥ ३ ॥

प्रियं मा कृणु देवेषु प्रियं राजसु मा कृणु ।

प्रियं सर्वस्य पश्यत उत शूद्र उतार्ये ॥ ४ ॥

उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते देवान् यज्ञेन बोधय ।

आयुः प्राणं प्रजां पशून् कीर्तिं यजमानं च वर्धय ॥ ५ ॥

अथर्व० कां० १९ सू० ६० । ६१ । ६२ । ६३

माझ्या ( आसन् ) मुखांत आयुष्यसमाप्तिपर्यंत अस्खलित वक्तृत्वशक्ति राहो, नाकामध्यें प्राणशक्ति संचार करीत राहो, डोळ्यांची पाहण्याची शक्ति शाबूत राहो, कानांची श्रवणशक्ति उत्तम राहो, ( अपलिताः केशाः )

केस शुभ्र न होवोत, ( अशोणाः दन्ता ) दांत मलिन न होवोत, बाहूंच्या ठिकाणीं प्रचंड सामर्थ्य राहो, माझ्या मांड्यांमध्येही ( ओजः ) शक्ति राहो, जांघांमध्यें वेग राहो, पायांच्या ठिकाणीं स्थैर्य व दृढता असो. माझे सर्व अवयव ( अरिष्टानि ) हृष्टपुष्ट होवोत, माझा आत्मा नेहमीं उत्साहपूर्ण असो, ( तनूः ) शरीराचे सर्व अवयव उत्तम स्थितींत राहोत. ( ततः ) आम्हांस दुष्टपणाच्या शत्रूंचा ( सहे ) प्रतिकार करण्याचें सामर्थ्य आमच्या अंगीं राहो, तसेंच मला (सर्वं आयुः) पूर्ण आयुष्य प्राप्त होवो. आयुष्याच्या समाप्तिपर्यंत माझे सर्व अवयव हृष्टपुष्ट रहावेत, मला ( स्योनं ) सुख प्राप्त व्हावें, ( पुरु ) बहुत ऐश्वर्य प्राप्त व्हावें, व मी शुद्ध बनून (स्वर्गे ) स्वर्गांत अर्थात् उत्तम लोकांत प्रसन्नतेनें रहावें.

(प्रियं) मला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या सर्वांमध्यें प्रिय कर, सर्व ( पश्यतः ) पहाणाऱ्यांमध्यें मी प्रिय व्हावें अर्थात् मी लोकमान्य बनावें.

हे (ब्रह्मणस्पते) ज्ञानाच्या प्रभो! (उत्तिष्ठ) ऊठ व (यज्ञेन) सत्कर्माच्या द्वारें ( देवान् बोधय ) विद्वानांमध्यें जागृति उत्पन्न कर. तसेंच, आयुष्य, जीवन, संतति, पशुपालन, कीर्ति व सत्कर्म करणाऱ्याचें बल इतक्या गोष्टी वाढव.

या सूक्ताच्या मंत्रांत मनुष्याच्या अभ्युदयाचें स्वरूप उत्तम रीतीनें वर्णिलें आहे. ( १ ) प्रथमतः आपली शारीरिक व मानसिक उन्नति उत्तम प्रकारें करावी. ज्याचें शरीर कमजोर, मन निर्बल व बुद्धि क्षीण असेल त्याच्या हातून परोपकाराचा पुरुषार्थही उत्तम प्रकारें होणें शक्य नाहीं. म्हणून सर्वांच्या अगोदर वैयक्तिक उन्नति साधली पाहिजे. (२) त्यानंतर दीर्घायुष्य प्राप्त करून घेण्यासाठीं मानसिक व आत्मिक समता प्राप्त केली पाहिजे. या समतेनेंच मनुष्य लोकोपयोगी महत्कार्य करण्यास योग्य बनतो. समतेचा भाव स्थिर राहणार नाहीं तर तो मनुष्य सार्वजनिक काम करण्यास असमर्थ होतो. मानसिक समता व स्थिरता यांपासून शारीरिक आरोग्य व दीर्घायुष्यही प्राप्त होतें अल्पायु व अस्थिर चित्ताचा मनुष्य

जनतेसाठीं कसें काम करूं शकणार ? ४०।५० वर्षेपर्यंत तर मनुष्य अनुभव प्राप्त करून घेत असतो व पुढील आयुष्यांत त्यानें तो अनुभव लोकांना द्यावयाचा असतो. जो मनुष्य अल्पायु होतो तो अनुभव प्राप्त करून घेण्याच्या वयांतच मरतो, त्यामुळें त्याच्यापासून जनतेच्या हिताचें कोणतें-ही कार्य होणें अशक्य होतें. म्हणून पुरुषार्थी मनुष्यानें आपल्या शारीरिक, मानसिक व आध्यात्मिक शक्तिबरोबरच दीर्घायु बनण्याचा यत्न करावा. (३) अशा प्रकारें योग्यता प्राप्त करून घेतल्यावर तो जनतेच्या हितार्थ काम करूं शकतो व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना उपयोगी असें महत्कार्य करून त्यांचें प्रेम संपादन करूं शकतो. तात्पर्य सर्व लोकांना हितकर असा पुरुषार्थ करूं लागल्यास सर्व जनताही त्याच्यावर प्रेम करूं लागते व तो लोकप्रिय होतो. (४) अशा वेळीं त्याचें कार्य केवळ लोकाराधन करणें एवढेंच नसून लोकांना त्यांचें कर्तव्य पार पाडण्यास योग्य उपदेश करणें हेंही असतें.

असो ! अशा प्रकारें मनुष्याची क्रमाक्रमानें उन्नति होत असते. हा मानवी उदयाच्या स्वरूपाचा उपदेश या सूक्तांचा विचार करण्यानें वाचकांना प्राप्त होतो तो त्यांनीं ध्यानांत धरून त्याप्रमाणें उन्नति करून घ्यावी.

भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥

ऋ० १।८९।८

आम्ही कानांनीं (भद्रं) कल्याणमय उपदेशच ऐकावा, (अक्षभिः) डोळ्यांनीं कल्याणकारक दृश्येंच पहावींत. हे (यजत्राः देवाः) यजन करणाऱ्या देवांनो! स्थिर अंगांनीं युक्त (तनूभिः) अशा शरीरांनीं (तुष्टु-वांसः) ईश्वराची प्रशंसा करीत (देवहितं आयुः) देवाचें हित करण्यासाठीं आपलें आयुष्य (व्यशेम) खर्च करावें. शरीराच्या सर्व अवयवांनीं श्रेष्ठांची सेवा व सत्कार करीत, तसेंच संपूर्ण श्रेष्ठ कर्तव्यें करीत आम्ही पूर्ण आयुष्य प्राप्त करावें. या मंत्रांत कर्ण व नेत्र यांचा उल्लेख आहे, तथापि इतर सर्व

अवयवांसबधीं असाच निश्चय करावयाचा असतो. अर्थात् आपल्या हरएक अवयवानें शुभ कर्म करण्याची प्रतिज्ञा या वेळीं केली पाहिजे व दक्षतेनें सर्व व्यवहार करून वर केलेली प्रतिज्ञा पूर्ण केली पाहिजे, शरिराच्या प्रत्येक अवयवानें याप्रमाणें शुभ कर्म करण्याची दक्षता जे पाळतील, तेच उन्नत होतील

वर सांगितल्याप्रमाणें कर्म करण्यानें मनुष्य कृतकृत्य असतो प्रत्येक अवयवास शुभ कर्म करण्यास प्रवृत्त केल्यास उन्नति होते व अशुभ कर्मा-कडे प्रवृत्त केल्यास अवनति होते, हा नियम ध्यानात धरून वर्तन झाल्यास मनुष्याची सर्वकाळ उन्नतिच होत राहील.

> सप्त स्वसृररुषीर्वावशानो विद्वान्मध्व उज्जभारा दृशे कम् ।
> अन्तर्येमे अंतरिक्षे पुराजा इच्छन्वव्रिमविदत्पूषणस्य ॥
>
> ऋ० १०।५।६

( सावधान विद्वान् ) इंद्रियें वश राखणा-या ज्ञानी लोकांनी (क दृशे) आनंदाच्या दर्शनासाठीं ( मध्व. ) अमृताहून ( अरुषी ) तेजस्वी अशा ( सप्त स्वसृः ) सात बहिणी-सात इंद्रियें ( उद् जभार ) वर घेतलीं आहेत, व ( पुराजाः ) प्रथम जन्मलेला जीवात्मा ( अंतरिक्षे ) अंत कर-णाच्या ( अंत ) मध्यभागीं (येमे) नियमन करीत असतो जो उन्नतीची इच्छा करीत असतो तो (पूषणस्य वव्रिं) पोषणकर्त्याचा आश्रय (अविदत्) प्राप्त करीत असतो

संयमी विद्वान आनंदप्राप्त्यर्थ आत्मशक्तीच्या योगानें सातही इंद्रियाना उन्नतीच्या मार्गावर नेत असतात ज्यानें पूर्वी देखील अनेकवार जन्म घेतले आहेत, असा हा जीवात्मा आपल्या अंत करणाच्या द्वारें सर्वांचें नि-यमन करीत असतो, अशा प्रकारचा आत्मसंयमी मनुष्य ज्याप्रकारच्या उन्नतीची इच्छा करतो, तशी उन्नति ईश्वराच्या सहाय्यानें त्याला प्राप्त होते-नाक, जीभ, डोळे, कान, त्वचा, मन व बुद्धि या सात आत्म्याच्या बहिणी होत, यांच्या संयमनानें उन्नति व असंयमनानें अधोगति होते

# पाठ ११ वा

यद्राजानो विभजन्त इष्टापूर्तस्य षोडशं यमस्यामी सभासदः।
अविस्तस्मात्प्र मुंचति दत्तः शितिपात् स्वधा॥१॥ अ०३।२९

( यमस्य ) नियम पालन करणाऱ्या राजाचे (अमी सभासदः राजानः) हे सभासद राजे ( इष्टा-पूर्तस्य षोडशं ) अन्नादि भोगाचा सोळावा भाग (विभजन्ते) विभक्त करतात. हा सोळावा भाग (दत्तः) दिला गेला असतां तो ( अविः ) रक्षक होतो व तो ( शिति+पात् ) हानीपासून मुक्त करतो व ( स्वधा ) आपलें धारण पोषण करतो.

राजसभेचे समासद खरोखर राजेच होत. ते प्रजेपासून धनधान्यादि उत्पन्नाचा सोळावा भाग राजासाठीं वेगळा काढतात. हा सोळावा भाग लोक राजाला कर म्हणून देतात; हा दिला जाणारा करच प्रजेचें संरक्षण करतो; अर्थात् हा कर घेऊन राजा सर्व प्रजेचें रक्षण करीत असतां व राष्ट्रामधील धारणशक्ति वाढवितो. उत्पन्नाचा सोळावा हिस्सा राजाला करकपानें देणें जरूर असतें.

सर्वान्कामान् पूरयत्याभवन्प्रभवन्भवन्।
आकूतिप्रोऽविर्दत्तः शितिपान्नोप दस्यति॥२॥ अथर्व० ३।२९

पूर्वोक्त कर ( दत्तः ) दिला गेलेला राजा ( अविः ) रक्षणकर्ता बनून ( शितिपात् ) हानीपासून ( न उपदस्यति ) नाश होऊं देत नाहीं. परंतु (आकूति-प्रः) संकल्प पूर्ण करणारा होऊन व (आभवन्, प्रभवन्, भवन्) विजयी, प्रभावी आणि वृद्धियुक्त बनून सर्व इच्छांना (पूरयति) पूर्ण करतो.

राजाला सोळावा भाग कर रूपानें दिला असतां तो प्रभावशाली बनून प्रजेचें नाशापासून रक्षण करीत असतो.

ता हि श्रेष्ठवर्चसा राजाना दीर्घश्रुत्तमा।
ता सत्पती ऋतावृध ऋतावाना जने जने॥ ऋ० ५।६५।२

( तौ ) ते दोन ( राजानौ ) राजे, ( श्रेष्ठवर्चसा ) अत्यंत तेजस्वी, ( दीर्घश्रुत्तमा ) अत्यंत ज्ञानी, ( सत्पती ) उत्तम पालन करणारे, (ऋता-

ऋधौ ) सत्य व सरळपणा यांच्यासह वाढणारे ( जने जने ) प्रत्येक सघात ( ऋतावानौ ) सत्याचे रक्षक आहेत राजे लोकांच्या अंगीं अशा प्रकारचे गुण असणें अवश्य आहे

> यदजः प्रथमं संबभूव स ह तत् स्वराज्यमियाय ।
> यस्मान्नान्यत् परमस्ति भूतम् ॥ अ० १०।७।३१ ॥

( अजः ) हालचाल करणारा ( प्रथम ) सर्वांहून अगोदर ( यत् ) जेव्हां ( संबभूव ) एकत्र होऊन प्रकट होतो ( तत् ) तेव्हां ( स ह ) तोच ( स्वराज्य ) स्वराज्य ( इयाय ) प्राप्त करतो. ( यस्मात् ) ज्या स्वराज्याहून ( अन्यत् ) दुसरें काहीही ( पर ) श्रेष्ठ ( भूत न अस्ति ) झालेलें नाहीं

वेदाच्या ह्या मंत्रांत स्वराज्याचा महिमा वर्णन केलेला आहे या मंत्रांतील प्रत्येक शब्द विचार करण्याजोगा आहे यातील "अज" शब्द "हालचाल करणारा, नेता, संचालक, चालना देणारा" इत्यादि भाव दर्शवितो. "अज्" धातूपासून हा शब्द झालेला आहे व त्या धातूचा अर्थ "जाणें, चालणें, नेणें, हालचाल करणें" इत्यादि आहेत. अर्थात् जो अग्रभागी जातो, जो नेता व आपली उन्नति व्हावी अशाबद्दल चळवळ करतो, जो दुसऱ्याचा नेता बनून त्यांची उन्नति व्हावी अशाबद्दल खटपट करतो त्याला "अज" असें म्हणत त

या मंत्रातील "स्वराज्य" शब्दाचा अर्थ खालीं दिलेल्या मंत्रानें अधिक स्पष्ट होतो असें—

> आ यद् वामीयचक्षसा मित्र वयं च सूरयः ।
> व्यचिष्ठे बहुपाय्ये यतेमहि स्वराज्ये ॥ ऋ० ५।६६।६

( मित्र ) हे मित्रता राखणाऱ्यानो ! अर्थात् ज्यांच्या ठिकाणीं विरोध-भाव नाहीं असे सज्जनहो ! ( ईयचक्षसो ) ज्यांची दृष्टि विशाल झालेली आहे अशा सज्जनांनो ! तुम्ही सर्व तसेंच ( वय ) आम्ही सर्व ( सूरयः ) विद्वान् मिळून ( व्यचिष्ठे ) विस्तृत तसेच ( बहुपाय्य ) अनेकांच्या मदतीनें

# पाठ ११ वा

यद्राजानो विभजन्त इष्टापूर्तस्य षोडशं यमस्यामी सभासदः।
अविस्तस्मात्प्र मुंचति दत्तः शितिपात् स्वधा ॥१॥ अ०३।२९

( यमस्य ) नियम पाळन करणाऱ्या राजाचे (अमी सभासदः राजानः) हे सभासद राजे ( इष्ट-पूर्तस्य षोडशं ) अन्नादि भोगाचा सोळावा भाग (विभजन्ते) विभक्त करतात. हा सोळावा भाग (दत्तः) दिला गेला असतां तो ( अविः ) रक्षक होतो व तो ( शिति+पात् ) हानीपासून मुक्त करतो व ( स्वधा ) आपलें धारण पोषण करतो.

राजसभेचे सभासद म्हणजे राजेच होत. ते प्रजेपासून धनधान्यादि उत्पन्नाचा सोळावा भाग राजासाठीं वेगळा काढतात. सोळावा भाग लोक राजाला कर म्हणून देतात; हा दिला जाणारा करच प्रजेचें संरक्षण करतो; अर्थात् हा कर घेऊन राजा सर्व प्रजेचें रक्षण करीत असतो व राष्ट्रामधील धारणशक्ति वाढवितो. उत्पन्नाचा सोळावा हिस्सा राजाला कररूपानें देणें जरूर असतें.

सर्वान्कामान् पूरयत्याभवन्प्रभवन्भवन्।
आकूतिप्रोऽविर्दत्तः शितिपान्नोप दस्यति॥२॥ अथर्व० ३।२९

पूर्वोक्त कर ( दत्तः ) दिला गेलेला राजा ( अविः ) रक्षणकर्ता बनून ( शितिपात् ) हानीपासून ( न उपदस्यति ) नाश होऊं देत नाहीं. परंतु (आकूति-प्रः) संकल्प पूर्ण करणारा होऊन व (आभवन्, प्रभवन्, भवन्) विजयी, प्रभावी आणि वृद्धियुक्त बनून सर्व इच्छांना (पूरयति) पूर्ण करतो.

राजाला सोळावा भाग कर रूपानें दिला असतां तो प्रभावशाली बनून प्रजेचें नाशापासून रक्षण करीत असतो.

ता हि श्रेष्ठवर्चसा राजाना दीर्घश्रुत्तमा।
ता सत्पती ऋतावृध ऋतावाना जने जने ॥ ऋ० ५।६५।२

( तौ ) ते दोन ( राजानौ ) राजे, ( श्रेष्ठवर्चसौ ) अत्यंत तेजस्वी, ( दीर्घश्रुत्तमौ ) अत्यंत ज्ञानी, ( सत्पती ) उत्तम पालन करणारे, (ऋता-

चूधो ) सत्य व सरळपणा यांच्यासह वागणारे ( जने जने ) प्रत्येक संघांत ( ऋतावानो ) सत्याचे रक्षक आहेत. राजे लोकांच्या अंगीं अशा प्रकारचे गुण असणें अवश्य आहे.

यदजः प्रथमं संबभूव स ह तत् स्वराज्यमियाय ।
यस्मान्नान्यत् परमस्ति भूतम् ॥ अ० १०।७।३१ ॥

( अजः ) हालचाल करणारा ( प्रथमं ) सर्वांहून अगोदर ( यत् ) जेव्हां ( संबभूव ) एकत्र होऊन प्रकट होतो ( तत् ) तेव्हां ( सः ह ) तोच ( स्वराज्यं ) स्वराज्य ( इयाय ) प्राप्त करतो; ( यस्मात् ) ज्या स्वराज्याहून ( अन्यत् ) दुसरें कांहींही ( परं ) श्रेष्ठ ( भूतं न अस्ति ) झालेलें नाहीं.

वेदाच्या ह्या मंत्रांत स्वराज्याचा महिमा वर्णन केलेला आहे. या मंत्रांतील प्रत्येक शब्द विचार करण्याजोगा आहे. यांतील " अज " शब्द " हालचाल करणारा, नेता, संचालक, चालना देणारा " इत्यादि भाव दर्शवितो. " अज् " धातूपासून हा शब्द झालेला आहे व त्या धातूचा अर्थ " जाणें, चालणें, नेणें, हालचाल करणें " इत्यादि आहेत. अर्थात् जो अग्रभागीं जातो, जो नेतो व आपली उन्नति व्हावी अशाबद्दल चळवळ करतो, जो दुसऱ्यांचा नेता बनून त्यांची उन्नति व्हावी अशाबद्दल खटपट करतो त्याला " अज " असें म्हणतात.

या मंत्रांतील " स्वराज्य " शब्दाचा अर्थ खालीं दिलेल्या मंत्रानें अधिक स्पष्ट होतो. जसें—

आ यद् वामीयचक्षसा मित्र वयं च सूरयः ।
व्यचिष्ठे बहुपाय्ये यतेमहि स्वराज्ये ॥ ऋ० ५।६६।६

( मित्र ) हे मित्रत्व राखणाऱ्यांनो ! अर्थात् ज्यांच्या ठिकाणीं विरोधभाव नाहीं असे सज्जनहो ! ( ईयचक्षसौ ) ज्यांची दृष्टि विशाळ झालेली आहे अशा सज्जनांनो ! तुह्मी सर्व तसेंच ( वयं ) आह्मी सर्व ( सूरयः ) विद्वान् मिळून ( व्यचिष्ठे ) विस्तृत तसेंच ( बहुपाय्ये ) अनेकांच्या मदतीनें

ज्याचें पालन होतें अशा (स्वराज्ये) स्वराज्यांत (आयतेमहि) स्वराज्यव्यवस्था ठीक चालावी म्हणून प्रयत्न करूंया.

स्वराज्यासाठीं (१) मित्रदृष्टीचे लोक, (२) विस्तृत दृष्टीचे लोक (३) ज्ञानी लोक असे तीन प्रकारचे लोक योग्य असतात. अर्थात् (१) आपसांत कलह करणारे, (२) संकुचित दृष्टीचे व (३) अज्ञानी लोक स्वराज्यास अपात्र होत.

इत्था हि सोम इन्मदे ब्रह्मा चकार वर्धनम्।
शविष्ठ वज्रिन्नोजसा पृथिव्या निःशशा अहिमर्चन्ननु स्वराज्यम्॥
ऋ० १।८०।१

हे (शविष्ठ वज्रिन्) बलवान् शस्त्रधारी! यासमाणें (मदे सोमे हि) आनंदकारक शांतिवर्धक सोमाचेंही (ब्रह्मा) ज्ञानी (इत्) नि.संशय (वर्धनं चकार) संवर्धन करतात. तूं (ओजसा) सामर्थ्याच्या जोरावर (पृथिव्याः अहिं) पृथ्वीच्या किंवा भूमीच्या शत्रूला (निः शशा) दंड कर; व (स्वराज्यं) स्वराज्याची (अनु अर्चन्) योग्य पूजा करणारा हो.

ज्ञानी लोकांनीं सुविचारांचें संवर्धन करावें, शस्त्रधारी व बलवान शत्रूंचा प्रतिकार करावा व सर्वांनीं मिळून स्वराज्याचें महत्व वाढवावें असें वरील मंत्राचें तात्पर्य आहे.

---

## पाठ १२ वा

न वा उ देवाः क्षुधमिद्वधं ददुरुताशितमुप गच्छन्ति मृत्यवः।
उतो रयिः पृणतो नोप दस्यत्युतापृणन्मर्डितारं न विन्दते॥
ऋ० १०।११७।१

(देवाः) देवांनीं मरिवांसाठींच (क्षुधं इत्) भूक नामक (वधं ददुः) मृत्यु दिला आहे, असें (न वा उ) निश्चयानें म्हणतां येत नाहीं, कारण (आशितं उत) भोजन करणाऱ्यांच्या जवळ देखील (मृत्यवः उपगच्छन्ति) मृत्यु पोहोंचतात. (उत) निश्चयानें (पृणतः रयिः) दान देणा-

त्यांचे धन ( न उप दस्यति ) नाश होत नाहीं, ( उत ) परन्तु ( अपृणन् ) दान न देणाऱ्यांना कोणीही ( मर्डितारं ) सुख देणारा मित्र ( न विन्दते ) प्राप्त होत नाहीं.

धनिक लोकही मरतात, व गरीबही पुष्कळ धष्टपुष्ट असतात; याकरितां गरीब लोक कष्ट भोगण्याकरितांच निर्माण झाले आहेत असें म्हणणें चुकीचें आहे. धनवान् लोकांनीं गरिबानां दान व सहायता देऊन त्यांनीं सुखी करावें. दान व परोपकार करण्यानें धनवानांचें धन नाश पावत नाहीं, तर तें वाढतें. दानी मनुष्यास सुख व शांति देणारे मित्र पुष्कळ मिळतात परंतु दुसऱ्यांना सहाय न करणारास सुख देणारा मित्र कोणीच सांपडत नाहीं. याकरितां परोपकार करणें प्रत्येकास उचित आहे.

य आध्राय चकमानाय पित्वोऽन्नवान्त्सन् रफितायोप जग्मुषे ।
स्थिरं मनः कृणुते सेवते पुरोऽतो चित्स मर्डितारं न विन्दते ॥
ऋ० १०।११७।२

( यः अन्नवान् सन् ) जो अन्न जवळ ठेवून वेऊन (पित्वः चकमानाय) अन्नाची इच्छा करणाऱ्या ( रफिताय ) वाईट स्थितींत पडलेल्या ( उपजग्मुषे ) जवळ आलेल्या ( आध्राय ) गरिबासाठीं आपलें ( मनः ) मन ( स्थिरं कृणुते ) कठोर करतो. अर्थात् त्याला अन्न देत नाहीं ( उत ) व त्याच्या ( पुरः सेवते ) समोर स्वतः अन्न खातो, ( चित् सः ) निश्चयपूर्वक त्याला (मर्डितारं) सुख देणारा मित्र ( न विन्दते ) प्राप्त होत नाहीं.

दरवाजावर आलेल्या गरीब मनुष्यालाही जो सहाय्य करीत नाहीं,पण स्वतः अन्नाचा उपभोग करतो, तो खरोखर मोठा स्वार्थी होय. याकरितां त्याला सुख देणारा मित्र मिळत नाहीं व नंतर त्याला पश्चात्तापांत पडावें लागतें.

स इद्भोजो यो गृहवे ददात्यन्नकामाय चरते कृशाय ।
अरमस्मै भवति यामहूता उतापरीषु कृणुते सखायम् ॥ ऋ० १०।११७।३

( यः ) जो ( कृशाय ) दुर्बल, कृश ( अन्न-कामाय चरते ) व अन्नाच्या इच्छेनें भ्रमण करणाऱ्यास (गृहवे) घरोघर जाऊन भीक मागणाऱ्या याचकास ( ददाति ) अन्न देतो, ( सः इत् भोजः ) तोच खरें भोजन करतो. ( असें ) ह्या दात्यापाशीं ( याम-हूतौ ) योग्य समयीं दान कर-

( )

भविष्यकालच्या मोठ्या लांब मार्गावर दृष्टि देवून दानास जो खरोखर आहे अशा मनुष्याला दान द्यावें. ऋ० १०।११७।५॥

मोघमन्नं विन्दते अप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य।
नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी ॥

(...यः) जो धनवान् असून सुद्धां (अर्यमण) श्रेष्ठ मन असणाऱ्यांना (...पुष्यति) सहाय करीत नाहीं. व (नो सखायं) आपल्या मित्रांनाही (...) करीत नाहीं. तो (केवल आदी) केवळ एकटाच खाणारा (... केवलाघो) केवळ पापरूप (भवति) होतो. (सत्यं ब्रवीमि) मी खरें (सांग)तों कीं, तो (अप्रचेताः) दुष्टबुद्धि (अन्नं मोघ विन्दते) अन्न व्यर्थ (प्राप्त) करतो, त्याचें अन्न खरें अन्न नव्हे; तर (स इत्) तें अन्न निश्चयानें (तस्य वधः) त्याचा नाश करतें. ऋ० १०।११७।६॥

(...) ह्याचा भोग घातला म्हणजे त्यांचाही नाश होतो. याकरितां सज्जनांना (...)य सहाय करावें.दुसऱ्यांना दान न देतां जो स्वतः भोग भोगतो त्याचें खरें अन्न नसून ते त्याच्या नाशाचा हेतु आहे. याकरितां दान केल्या-अन्नाचा उपभोग करावा.

कृषन्नित्फाल आशितं कृणोति यन्नध्वानमप वृङ्क्ते चरित्रैः।
वदन्ब्रह्माऽवदतो वनीयान् पृणन्नापिरपृणन्तमभि ष्यात् ॥

(कृषन् इत्) शेती करीत करीत (फालः) नांगराचा फाळ (आशितं (कृणो)ति) भोजनच तयार करतो जसा (यन्) चालणारा (चरित्रैः) (पाया)नीं (अध्वानं अपवृंक्ते) मार्ग समाप्त करतो. (वदन् ब्रह्मा) उपदेश (करणा)रा ज्ञानी (अ-वदतः) गप्प बसणाऱ्यांपेक्षां (वनीयान्) श्रेष्ठ (आहे). त्याचप्रमाणे (पृणन् आपिः) दाता मित्र (अपृणन्तं) अदात्या(मित्रा)पेक्षां (अभि स्यात्) श्रेष्ठ आहे. ऋ० १०।११७।७

पुरुष यीं शेतकरी धान्य उत्पन्न करतो व पुरुषार्थानेंच मनुष्य एका (स्था)नापासून दुसऱ्या स्थानास पोंचतो. उन्नतीसाठीं उपदेश न करणाऱ्या(...)प्यापेक्षां उपदेश करणारा श्रेष्ठ व दान न करणाऱ्यापेक्षां योग्य रीतिनें (दान) करणारा श्रेष्ठ आहे.